# तृतीय स्कंध

## अध्याय १ ला

शुकाचार्य परीक्षित्राजाला म्हणाले :—राजा, पूर्वी विदुर ऐश्वर्ययुक्त अशा आपल्या गृहाचा त्याग करून वनांत गेला असतां, त्यानेंहि भगवान् मैत्रेय ऋषींना असाच प्रश्न विचारिला होता ॥ १ ॥ राजा, तें विदुराचें घर म्हणजे सामान्य नव्हतें. प्रत्यक्ष जगन्नायक भगवान् श्रीकृष्ण तुमचा मंत्री होऊन ( हस्तिनापुरांत शिष्टाईला ) आला असतां, पौरवराज दुर्योधनाच्या घरीं न जातां तो विदुराकडेच उतरावयास गेला. कारण विदुराचें घर त्यानें आपलें म्हणून मानिलें होतें. ॥ २ ॥ [ हें ऐकून ] परीक्षित् म्हणाला :- महाराज, भगवान् मैत्रेयऋषि आणि विदुर यांची गांठ कोठें झाली व उभयतांचा हा संवाद केव्हां झाला तें मला तुम्ही कृपा करून सांगा ॥ ३ ॥ विदुरासारख्या निर्मळ अंतःकरणाच्या पुरुषानें भगवान् मैत्रेयासारख्या थोर ऋषीला केलेल्या प्रश्नांतील अर्थ क्षुद्र असणें शक्य नाहीं. तेव्हां त्या प्रश्नामुळें त्या दोघांत उत्तम प्रकारचा संवाद झालेला असला पाहिजे ॥ ४ ॥ सूत म्हणाला—शौनक हो, परीक्षित् राजानें शुकाचार्याला याप्रमाणें प्रश्न केला असतां, तो बहुश्रुत शुकमुनि संतुष्ट झाला आणि ' सांगतों, ऐक ' असें त्याला म्हणून त्यानें उत्तर देण्यास आरंभ केला. ॥ ५ ॥ शुकमुनि म्हणाले—हे राजा, आंधळा व त्याबरोबरच अविचारी असलेला तो धृतराष्ट्र राजा आपल्या दुष्ट मुलांचें अन्यायानें पोषण करूं लागला, आणि तसें करतांना त्यानें आपला कनिष्ठ बंधु जो पांडु त्याच्या निराश्रित झालेल्या पुत्रांना वनांत पाठविलें व तेथें त्यांना लाखेच्या घरांत ठेवून जाळून टाकण्याचा प्रयत्न केला ! ॥ ६ ॥ तसेंच, पांडवांची राणी व आपली सून जी द्रौपदी तिची वेणी धरून जेव्हां तिला सभेंत आणण्याचें निंद्य कृत्य त्या राजा धृतराष्ट्राच्या पुत्रांनीं केलें, त्या वेळीं तिच्या डोळ्यांतून दुःखाश्रूंचा लोट वाहूं लागला आणि त्यामुळें तिच्या स्तनांवरील केशराची उटी धुऊन निघूं लागली; पण अशाहि तिच्या स्थितींत या धृतराष्ट्रानें आपल्या पुत्रांचें निवारण केलें नाहीं. ॥ ७ ॥ साधुवृत्तीचा धर्मराजा नेहमीं सत्याचा अवलंब करणारा होता; त्याला कपटानें द्यूतांत जिंकिलें असतां तो वनांत गेला आणि नंतर ठरावाप्रमाणें ( तेरा वर्षांचा वनवास संपविल्यावर ) आपला वडिलोपार्जित राज्याचा भाग मागूं लागला; पण मोहानें व्याप्त झालेल्या धृतराष्ट्रानें तो त्याला दिला नाहीं ॥ ८ ॥

धर्मराजानें जगद्गुरु श्रीकृष्णाला ( शिष्टाईसाठीं दुर्योधनाकडे ) पाठविलें, त्या वेळेस त्या परमात्म्यानें लोकांना अमृतासारखीं ( मधुर आणि हितकर ) वाटणारीं अशीं जीं

भाषणें केलीं त्याविषयीं धृतराष्ट्रानें कांहींच आदर दाखविला नाहीं, कारण त्याच्यापाशीं पुण्याचा लेशहि उरला नव्हता. ( पाप्याला श्रीकृष्णाचें भाषण न रुचावें हें साहजिकच आहे ) ॥ ९ ॥ ( शेवटीं पांडवांचा राज्यभाग त्यांना द्यावा कीं काय याविषयीं ) विदुराचें मत कळावें म्हणून धृतराष्ट्रानें त्याला आपल्या घरीं बोलाविलें. त्या वेळीं विदुरानें येऊन आपल्या वडील बंधूला उचित असें मत दिलें. राजा, हिताचा उपदेश करणारांमध्यें विदुराची योग्यता फारच श्रेष्ठ आहे. त्यानें धृतराष्ट्राला केलेला उपदेश नीतिशास्त्रांमध्यें प्रसिद्ध असून त्याला ' विदुरनीति ' असें म्हणतात. ( त्या विदुरनीतीचें तात्पर्य तुला मी थोडक्यांत सांगतों ) ॥ १० ॥ विदुर म्हणाला, " धृतराष्ट्रा, युधिष्ठिराचा राज्यभाग तूं देऊन टाक; तूं त्याचे असह्य अपराध केले असतांहि ते त्यानें सहन केले आहेत. भीमसेनरूपी सर्प तर आपल्या कनिष्ठ बंधूंसह क्रोधानें फूत्कार टाकीत आहे आणि त्याची तुला साहजिकच फार भीति वाटत आहे. ( तेव्हां तुझ्या पुत्रांचा नाश त्यानें करूं नये असें तुला वाटत असेल, तर त्यांचा भाग तूं त्यांना देऊन टाकणेंच श्रेयस्कर होय. ) ॥ ११ ॥ शिवाय त्या भगवान् श्रीकृष्णाचा पांडवांवर सर्वथैव अनुग्रह आहे आणि श्रीकृष्ण कांहीं सामान्य नव्हे; तो ब्राह्मणांचाहि देव असून त्यानें सर्व राजांना जिंकून त्यांचें आधिपत्य मिळविलें आहे व यदुपतींमध्येंहि श्रेष्ठपणा प्राप्त करून घेऊन तो आपल्या द्वारकानामक नगरींत राहत असतो. ॥ १२ ॥

धृतराष्ट्रा, तूं श्रीकृष्णाकडे पाठ फिरवून पुत्रबुद्धीनें त्या दुर्योधनाचें पोषण करीत आहेस. अरे ! दुर्योधन हा कृष्णाचा द्वेष करणारा असल्यामुळें मूर्तिमंत दोषच तुझ्या घरांत शिरून त्यांत राहत आहे असें समज. आपल्या कुळाचें कल्याण व्हावें अशी तुला इच्छा असेल तर अशुभ अशा दुर्योधनाचा सत्वर त्याग कर " ॥१३॥ राजा, याप्रमाणें विदुरानें धृतराष्ट्राला त्या वेळीं उपदेश केला. विदुराचें शील साधूंनाहि स्पृहणीय होतें; पण त्याचा उपदेश ऐकून कर्ण, दुःशासन, शकुनि इत्यादिकांसह दुर्योधनाला मोठा राग आला. त्याचे ओंठ त्यामुळें थरथरूं लागले आणि त्यानें त्या आवेशांत विदुराचा अपमान केला ॥ १४ ॥ राजा, तो दुर्योधन म्हणूं लागला, ' या दासीपुत्र कपटी विदुराला येथें कोणी बोलाविलें ? अहो, ज्याच्या अन्नावर हा पोसला, त्याच्यावर उलटून हा त्याचा विरोधी बनला आहे आणि शत्रुपक्षाचें कार्य करण्यास प्रवृत्त झाला आहे. यास्तव याला ( धरा आणि तो आपला आप्त असल्यामुळें) जीव न घेता नगरांतून लवकर घालवून द्या.' ॥ १५ ॥ आपल्या भावासमक्ष याप्रमाणें कानाला टोंचणाऱ्या तीव्र शब्दांनीं विदुराच्या मर्मावर दुर्योधनानें आघात केला, तेव्हां तो विदुर आपलें धनुष्य तेथेंच दारांत टाकून तेथून निघाला. परमेश्वरी माया हीच सर्व समर्थ आहे, असें समजून त्यानें मनाला निष्कारण शीण करून घेतला नाहीं ॥ १६ ॥ शुकाचार्य म्हणतात—राजा, विदुराची प्राप्ति कौरवांना मोठ्या पुण्याईनेंच झाली होती. ( पण दुर्योधनाला त्याची योग्यता काय होय ? तेव्हां त्याच्या कटुभाषणानें कंटाळून ) विदुर हस्तिनापुरांतून बाहेर पडला आणि पुण्याची जोड करावी या इच्छेनें

त्यानें या पृथ्वीवरील अनेक तीर्थस्थानांचें दर्शन घेतलें. कारण परमेश्वर सहस्त्रावधि रूपें धारण करून अशा तीर्थक्षेत्रांच्या ठिकाणीं आपलें विशेष अधिष्ठान ठेवीत असतो. ॥ १७ ॥ विदुर एकटाच तीर्थाटन करीत फिरत होता. त्यानें अनेक नगरें, पुण्यक्षेत्रें, रमणीय उद्यानें, गिरिकंदरें तसेंच लताकुंज, स्वच्छ पाण्याचीं सरोवरें आणि नद्या इत्यादिकांचें दर्शन घेतलें आणि परमेश्वराच्या चिन्हांनीं अलंकृत झालेल्या अशा त्या तीर्थक्षेत्रांत संचार केला. ॥ १८ ॥

राजा, याप्रमाणें पृथ्वीवर फिरत असतां, विदुर पवित्र आणि शुद्ध अशाच पदार्थांचें सेवन करून शरीर रक्षण करी. प्रत्येक तीर्थांत स्नान करावें, भूमीवरच शयन करावें, निःसंग वैराग्यशील पुरुषाप्रमाणें वेष धारण करावा, शरिरावर तैलमर्दनादि संस्कार मुळींच करूं नयेत, असा त्याचा क्रम असल्यामुळें त्याच्या इष्टमित्र बांधवादिकांना तो ओळखूं येत नसे. अशा गुप्त स्थितींत त्यानें अनेक व्रतें आचरण करून परमेश्वराला संतुष्ट केलें ॥ १९ ॥ याप्रमाणें भारतवर्षांत प्रवास केल्यावर कालान्तरानें तो विदुर प्रभासक्षेत्रीं येऊन पोंचला. त्या वेळीं युधिष्ठिर हा श्रीकृष्णाच्या साहाय्यानें संपूर्ण पृथ्वीचें निष्कंटक राज्य करीत होता*॥ २० ॥ प्रभासक्षेत्रीं विदुराला कळून आलें कीं, ज्याप्रमाणें वेळूंच्या बेटांत अग्नि उत्पन्न होऊन सर्व अरण्य जळून जातें, त्याप्रमाणें एकमेकांवर चढाओढ करण्याच्या बुद्धीनें आपले बांधव जे यादव त्यांनीं परस्परांचा नाश करून घेतला. ती दुर्वार्ता ऐकून त्याला अर्थातच शोक झाला. पण मनाचें समाधान करून तेथून तो निमूटपणें पुढें गेला आणि सरस्वती नदीच्या उगमापाशी जाऊन पोंचला ॥ २१ ॥ त्या ठिकाणीं सरस्वतीच्या पात्रांत त्रित, उशना, मनु, पृथु, अग्नि, असित, वायु, सुदास, गाई, कार्तिकेय, श्राद्धदेव इत्यादि ऋषींचीं आणि देवतांचीं जीं पवित्र तीर्थें आहेत, त्यांचें त्यानें यथेच्छ सेवन केलें ॥ २२ ॥

त्या ठिकाणीं मोठमोठे द्विज आणि देव यांनी श्रीविष्णूचीं दुसरीं अनेक स्थानें करून ठेविलीं असून त्यांतील मंदिरांवर श्रीविष्णूच्या निरनिराळ्या अंगांवरील चिन्हें स्थापन केलीं आहेत. त्या स्थानांचें दर्शन घेऊन ते श्रीकृष्णपरमात्म्याचें नित्य स्मरण करीत असतात. ॥ २३ ॥ राजा, सरस्वतीच्या मुखापासून नंतर विदुर निघाला तो प्रथम समृद्धीनें युक्त अशा सौराष्ट्र देशाला व तेथून पुढें सौवीर आणि मत्स्य या देशांना गेला आणि तें पाहून मग कुरु आणि जांगल या देशांना आला. हे सर्व ओलांडून योग्य अवधींत तो यमुनेच्या तीरावर येऊन पोंचला आणि तेथें त्याला भगवद्भक्त उद्धवाचें दर्शन घडलें. ॥ २४ ॥ उद्धव हा बृहस्पतीपासून नीतिशास्त्र शिकलेला होता आणि श्रीकृष्णाचा अत्यंत शांत वृत्तीचा असा प्रसिद्ध भक्त होता. त्याची गांठ पडल्यावर विदुरानें त्याला

* विदुर तीर्थाटनाला गेल्यापासून प्रयागक्षेत्रीं येईपर्यंत भारती युद्ध सुरू होऊन कौरवांचा नाश झाला होता व युधिष्ठिराची हस्तिनापुरच्या सिंहासनावर सार्वभौम चक्रवर्ती म्हणून स्थापना झाली होती.

प्रेमानें गाढ आलिंगन दिलें आणि आपले जे बांधव श्रीकृष्णाच्या आश्रयानें राहिले आहेत, त्यांच्या खुशालीचें वर्तमान त्याला विचारिलें ॥ २५ ॥ विदुर म्हणाला—हे उद्धवा, श्रीकृष्ण आणि बलराम हे शूरसेनाच्या घरीं खुशाल आनंद करीत नांदत आहेत ना ? ते त्या आदि पुरुषाचे अवतार असून आपला नाभिकमलोत्पन्न पुत्र जो ब्रह्मदेव याच्या प्रार्थनेवरून ते अवतार त्यांनीं घेतले आहेत. त्यांनीं पृथ्वीचें कल्याण करण्याचें आपलें अवतारकृत्य केलें असेलच ? ॥ २६ ॥

उद्धवा, आमच्या कौरवकुळाचा मोठा सन्मान्य मित्र असा तो वासुदेव खुशाल आहे ना ? त्याचें औदार्य काय वर्णन करावें ? त्यानें आपल्या बहिणींना योग्य वर देऊन संतुष्ट केलें आणि अद्यापिहि लागतील त्या वस्तु त्यांना देऊन आपल्या पित्याप्रमाणेंच त्यांच्याशीं तो उदारपणें वागत असतो ॥ २७ ॥ उद्धवा, आणि तो यादवांचा सेनापति पराक्रमी प्रद्युम्नहि खुशाल आहे ना ? तो पूर्वजन्मींचा मदन असून उत्तम ब्राह्मणांच्या आराधनेमुळें पुत्र म्हणून भगवान् श्रीकृष्णापासून रुक्मिणीला त्याची प्राप्ति झाली आहे ॥ २८ ॥ तसाच उग्रसेन राजाहि खुशाल आहे ना ? तो सात्वत, वृष्णि, भोज, दाशार्ह, या यादवकुळांचा राजा असून प्रत्यक्ष श्रीकृष्णानेंच स्वतः राज्याचा अभिलाष पार सोडून त्याची त्या पदावर स्थापना केलेली आहे ॥ २९ ॥ उद्धवा, श्रीकृष्णासारखाच दिसणारा त्याचा पुत्र सांबहि खुशाल आहे ना ? पराक्रमी वीरांचा तो नायक असून पूर्वजन्मीं पार्वतीच्या पोटीं जन्मलेला तो कार्तिकेयच होता, व जन्मीं जांबवतीनें अनेक व्रतांचें आचरण करून पुत्र म्हणून त्याची प्राप्ति करून घेतली आहे ॥ ३० ॥ अर्जुनापासून धनुर्वेदाच्या साऱ्या खुब्या ज्यानें समजून घेतल्या तो सात्यकी खुशाल आहे ना ? मोठ्या साधूंनाहि जें मिळण्यास कठीण तें परमेश्वरविषयक ज्ञान त्यानें श्रीकृष्णाच्या सेवेनें तत्काळ प्राप्त करून घेतलें ॥ ३१ ॥ तसाच तो श्वफल्काचा निष्पाप आणि बुद्धिमान् पुत्र अक्रूर खुशाल आहे ना ? तो श्रीकृष्णाचा मोठा भक्त आहे. त्याची भक्ति इतकी उत्कट आहे कीं, तीमुळें कृष्णाचीं पावलें ज्यावर उमटलेलीं आहेत अशा रस्त्यांतील धुळींत तो सारी जनलज्जा सोडून लोळला ॥ ३२ ॥ देवमाता जी अदिति तिच्याप्रमाणेंच कृष्णस्वरूपी श्रीविष्णूची जननी जी देवकराजाची कन्या देवकी तिचेंहि क्षेम आहे ना ? ज्याप्रमाणें ऋग्वेदादि त्रयी यज्ञविस्ताररूप अर्थ धारण करते, त्याप्रमाणें त्या देवकीनें कृष्णपरमात्म्याला आपल्या गर्भात धारण केलें ॥ ३३ ॥ उद्धवा, तसाच तो तुमच्या यादवांची इच्छा परिपूर्ण करणारा भगवान् अनिरुद्ध खुशाल आहे ना ? अंतःकरणाच्या चार वृत्ति ज्या चित्त, अहंकार, बुद्धि आणि मन त्यांपैकीं चौथ्या मनोरूप तत्त्वाचा तो अधिष्ठाता असून मनोरूपीच[1] आहे; आणि त्याच्यापासूनच शब्दाची उत्पत्ति होते, असें वेदादिकांनीं

---

१ सत्त्व म्हणजे अंतःकरण, त्याच्या चित्त, अहंकार, बुद्धि आणि मन या चार वृत्ति असून त्याचे क्रमानें वासुदेव, संकर्षण, प्रद्युम्न आणि अनिरुद्ध असे चार अधिष्ठाते होत, असें भागवतधर्मांत म्हटलें आहे.

सांगितलें आहे ॥ ३४ ॥ उद्धवा, तसेंच हृदीक, सत्यभामेचा पुत्र चारुदेष्ण, गद इत्यादि जे दुसरे यादव आपलें परमदैवत म्हणून श्रीकृष्णाची अनन्य भक्ति करतात, तेहि सारे खुशाल आहेत ना ? ॥ ३५ ॥ आपले जणूं डावे उजवे बाहूच असे जे अर्जुन आणि श्रीकृष्ण, त्यांसह युधिष्ठिर राजा, धर्ममर्यादेला अनुसरून राज्य करीत आहे ना ? त्या युधिष्ठिराच्या राजसभेंत पूर्वीं अर्जुनानें मोठमोठे विजय संपादन करून मिळविलेलें साम्राज्यवैभव पाहून दुर्योधनाच्या अंगाचा तिळपापड झाला होता ॥ ३६ ॥ उद्धवा, त्या तारट भीमानें आपल्याशीं दुष्टवर्तन करणाऱ्या दुर्योधनादिकांवर सर्पाप्रमाणें फार दिवसांचा सूड घेतला ना ? तो भीमसेन हातीं गदा घेऊन अद्‌भुतरीतीनें ती फिरवीत फिरवीत चालूं लागला म्हणजे त्याच्या पावलांचा आघात सहन न होऊन रणभूमि थरारूं लागत असे ॥ ३७ ॥ सेनापतींमध्यें मोठी कीर्ति संपादन केलेला गाण्डीवधारी अर्जुन शत्रूंचा नाश केल्यामुळें स्वस्थचित्त झाला आहे ना ? एका वेळीं त्या अर्जुनाच्या बाणवृष्टीनें झांकून गेल्यामुळें दिसेनासा झालेला मायावेषधारी किरातस्वरूपी शंकर संतुष्ट झाला होता S ॥ ३८ ॥ उद्धवा, पापण्या ज्याप्रमाणें डोळ्यांचे सभोंवार राहून त्यांचें रक्षण करतात, त्याप्रमाणें धर्म, भीम आणि अर्जुन हे पृथापुत्र ज्यांच्या भोंवतीं रक्षणार्थ असतात, ते कुंतीनें आपले जुळे पुत्र म्हणून मानिलेले नकुल आणि सहदेव हे रणांत शत्रूंपासून आपलें राज्य परत मिळवून आतां आनंदानें विहार करीत आहेत ना ? कौरवांपासून त्यांनीं राज्य परत मिळविणें म्हणजे इंद्राच्या मुखांतून गरुडांनीं अमृत काढून घेण्याप्रमाणेंच आहे ॥ ३९ ॥ काय आश्चर्य सांगावें ? ज्या महापराक्रमी * आणि अद्वितीय अशा धनुर्धारी राजर्षीनें चारी दिशा जिंकल्या होत्या; त्या पांडुराजाच्या पश्चात् त्याची पत्नी कुंती केवळ आपल्या कोंवळ्या मुलांकरतांच म्हणून प्राण धरून राहिली. पण आतां ती जिवंत आहे काय ? ॥ ४० ॥ बा उद्धवा; अधोगतीला जाणाऱ्या त्या माझ्या धृतराष्ट्राला पाहून मला फार वाईट वाटतें. त्यानें आपला मृतबंधु जो पांडु त्याचा तर अत्यंत द्रोह केलाच; पण मीं त्याच्याशीं मोठ्या प्रेमानें वागत होतों, तरी केवळ पुत्रांच्या मनाप्रमाणें वागण्याच्या इच्छेमुळें त्यानें मलाहि नगरांतून घालवून दिलें ॥ ४१ ॥

---

S वनवासांत असतांना अर्जुनानें उग्र तपश्चर्या करून शंकराला प्रसन्न केलें व तेथें मूक दानवाला दोघांनीं एकदम बाणांनीं विद्ध केल्यामुळें त्यांचें युद्ध होऊन त्यांत किरात-वेषधारी शंकर त्यावर संतुष्ट झाला व त्यानें अर्जुनाला पाशुपतास्त्र दिलें, अशी कथा भारताच्या वनपर्वांत आहे.

* रथ, महारथ, अतिरथ व अधिरथ अशा पराक्रमी पुरुषांच्या पराक्रमानुसार मिळणाऱ्या पदव्या आहेत जो एकटा शंभर शत्रूंबरोबर युद्ध करूं शकतो, त्यास रथ किंवा रथी म्हणतात. हजारांबरोबर जो एकटा लढतो त्याला महारथ किंवा महारथी म्हणतात. दहा हजारांबरोबर जो एकटा शूर युद्ध करतो त्यास अतिरथ किंवा अतिरथी म्हणतात, व एक लक्ष योद्ध्यांबरोबर लढणाराला अधिरथ किंवा अधिरथी म्हणतात.

अशा स्थितींत सांपडलों असतां, मी श्रीकृष्णाच्या कृपेनें उत्तम मार्गाचें ज्ञान करून घेतलें आणि कोणाला ओळख पटणार नाहीं असा वेष धारण करून कोणत्याहि गोष्टींचें आश्चर्य न मानतां येथें फिरत आहे. तो श्रीकृष्णपरमात्मा मनुष्यरूपानें अवतरला असून मनुष्यांच्या दृष्टीला तोच चाळवीत असतो आणि जगाचें रक्षणहि तोच करितो. (हें ज्ञान मला झाल्यामुळें मला कसलेंच आश्चर्य वाटत नाहीं.) ॥ ४२ ॥ उद्धवा, मला तर असें वाटतें कीं, राजेलोकांना तीन[१] प्रकारचा मद उत्पन्न होऊन ते दुराचरणी झाल्यामुळें आपल्या सैन्याच्या सामर्थ्यानें ते पृथ्वीला वारंवार हलवून सोडूं लागले; तेव्हां त्यांचा नाश करून शरणागतांचें दुःख एकदांच नाहींसें करावें, अशी त्या भगवान् श्रीकृष्णाची इच्छा होती; म्हणून आरंभींच कौरवांचा नाश करण्याचें सामर्थ्य असूनहि कांहीं काळ त्यांच्या पापाकडे त्यानें दुर्लक्ष केलें ॥ ४३ ॥

परमात्मा वस्तुतः जन्मरहित असतां जन्माला येतोसा जो दिसतो, तो दुराचरणी लोकांचा नाश करण्याकरितांच; तसाच तो सर्वथा अकर्ता असतांहि कर्में करतोसें वाटतें, तेंहि लोकसंग्रह करण्यासाठींच होय. तसें नसेल तर सत्त्वरजादि गुणांहून निराळा असलेला कोणता पुरुष देह धारण करण्याची आणि कर्मविस्ताराची इच्छा करून त्यांच्यामागें लागेल? ॥ ४४ ॥ मित्रा उद्धवा, जन्मरहित असलेल्या परमेश्वरानें जो यादवांमध्यें जन्म धारण केला, तो शरण आलेल्या सर्व राजांच्या आणि शास्त्रविहित मार्गानें चालणाऱ्या सज्जनांच्या कल्याणासाठींच केवळ होय. यास्तव पवित्रकीर्ति अशा त्या श्रीकृष्णाच्या कथा तूं मला कथन कर ॥ ४५ ॥

---

१ एकंदर मद तीन प्रकारचा. '**विद्यामदो धनमदस्तृतीयोऽभिजनो मदः ॥ मदा एते मदान्धानां त एव तु सतां दमाः** ॥ विद्या, धन व सत्कुल ह्या तीन गोष्टींबद्दल उन्मत्तांना मद उत्पन्न होतो; पण ह्याच तीन गोष्टी सज्जनांना मद न करण्यास कारणीभूत होतात. दम व मद हे दोन शब्द परस्पर विपर्यस्तरूपानें बनलेले आहेत.

## पहिला अध्याय समाप्त

---

# अध्याय २ रा

शुकाचार्य म्हणाले—राजा, याप्रमाणें विदुरानें उद्धवाला आपल्या आवडत्या श्रीकृष्णाचा वृत्तांत सांगण्याची विनंति केली असतां, उद्धवाला श्रीकृष्णाचें स्मरण होऊन त्याचा गळा दाटून आला आणि त्यामुळें थोडा वेळ विदुराच्या प्रश्नाचें उत्तरहि त्याला देववलें नाहीं ॥ १ ॥ राजा, उद्धव हा पांच वर्षांच्या वयाचा असतां एकदां त्याच्या मातेनें सकाळच्या भोजनासाठीं त्याला हाक मारिली; पण त्या वेळीं तो आपल्या बालपणींचे खेळ खेळण्याच्या मिषानें श्रीकृष्णाची पूजा करीत असल्यामुळें त्या जेवणाचीहि चाड त्याला वाटली नाहीं. ( इतकें उद्धवाचें प्रेम श्रीकृष्णाच्या ठिकाणीं जडलेलें होतें ) ॥ २॥ तेव्हां अशा त्या श्रीकृष्णाच्या सेवेंत त्याचें आयुष्य जाऊन त्यांतच तो म्हातारा झाला असल्यामुळें, श्रीकृष्णाचा वृत्तांत सांगण्याची त्याला विदुरानें जेव्हां विनंति केली, तेव्हां त्याच्या पदकमलांचें उद्धवाला स्मरण व्हावें आणि प्रेमामुळें गळा दाटून येऊन त्याच्या तोंडून थोडा वेळ कांहीं उत्तर येऊं नये, यांत नवल काय ? ॥३॥ श्रीकृष्णाच्या चरणकमलरूपी अमृताचा चांगला आस्वाद घडल्यामुळें उद्धव आत्मानंदांत पूर्ण मग्न झाला होता आणि अत्यंत उत्कट अशा कृष्णभक्तीमुळें त्यांतच तो गर्क असे. तेव्हां विदुराचा प्रश्न ऐकून तो थोडा वेळ अगदीं स्तब्धच राहिला ॥४॥ त्याच्या सर्व अंगावर रोमांच उभे राहिले, त्यानें आपले डोळे मिटून धरिले आणि कृष्णप्रेमाचा त्याच्या हृदयांत पूर लोटल्यामुळें त्याच्या डोळ्यांतून अश्रुप्रवाह सुरू झाला. हें पाहून उद्धव खरोखर धन्य होय असें विदुराला वाटलें ॥५॥ नंतर थोड्या वेळानें उद्धवाचें चित्त भगवान् श्रीकृष्णाच्या लोकाहून पुनः या मानवी लोकांत येऊन तो देहभानावर आला आणि डोळे पुसून सखेदाश्चर्ययुक्त होऊन विदुराच्या प्रश्नाचीं उत्तरें देऊं लागला ॥ ६ ॥

उद्धव म्हणाला,—विदुरा, श्रीकृष्णरूप सूर्य अस्तास गेला असतां आणि कालरूपी अजगरानें गिळून टाकल्यामुळें आमचीं घरें सौभाग्यहीन झालीं असतां आमच्या खुशालीविषयीं मी तुला काय रे सांगूं ? ॥ ७ ॥ खरोखर हा सारा मानवलोक दुर्दैवी होय आणि त्यांतहि हे यादव तर विशेषच दुर्दैवी. त्यांचा व श्रीकृष्णाचा इतका काळ एकत्र वास असतां श्रीकृष्णाची ओळख त्यांना कांहीं झाली नाहीं. मासे आणि नक्षत्रपति चंद्र एकत्र होते; पण जशी त्यांना त्या चंद्राच्या स्वरूपाची ओळख नव्हती, त्यांतलाच हा प्रकार होता. ॥ ८ ॥ श्रीकृष्णाचें सारें रहस्य यादवांना ठाऊक होतें, तसेच ते अगदीं पोक्त असून श्रीकृष्णाशीं ते नित्य हंसतखेळत एकत्र वास करीत होते; पण श्रीकृष्ण हा आपल्या यादवांपैकींच एक श्रेष्ठ यादव आहे, असें ते समजत. तो सर्वांच्या अंतर्यामीं वास

करणारा असा परमात्मा आहे, अशी त्यांची कल्पनाच नव्हती ॥ ९ ॥ विदुरा, दुसरे जे कित्येक परमेश्वराच्या मायेनें मोहित होऊन दुष्ट विचारांचा आणि आचारांचा मार्ग आक्रमीत होते, त्यांच्या भाषणांनीं माझ्या बुद्धीला भ्रम पडला नाहीं. कारण माझी बुद्धि सर्वान्तर्यामी श्रीकृष्णाच्या ठिकाणीं स्थिर झालेली होती ॥ १० ॥ ज्यांनीं तपाचें आचरण केलेलें नव्हतें त्यांना दर्शन देण्यासाठीं श्रीकृष्णाचा अवतार होता; पण त्याच्या दर्शनानें त्यांच्या नेत्रांची तृप्ति झाली नसतांच तो आपलें तें स्वरूप घेऊन अन्तर्धान पावला. विदुरा, श्रीकृष्णाचें स्वरूप म्हणजे लोकांचे जणूं डोळेच होते. ( म्हणूनच कृष्ण निजधामास गेल्यावर लोक आंधळ्यासारखे होऊन गेले ) ॥ ११ ॥ तें स्वरूप योगमायेचें बल दाखविण्यासाठीं परमात्म्यानें घेतलें होतें. मानवी लीला करून दाखविण्याचें तें उत्कृष्ट साधन असून त्यामुळें स्वतः श्रीकृष्णालाहि आश्चर्य वाटत असे. सौंदर्य आणि ऐश्वर्य यांची तें स्वरूप म्हणजे केवळ अगाध खाण असून अलंकारांनाहि ज्यांच्या योगानें शोभा येईल अशा अवयवांनीं युक्त होतें ॥ १२ ॥

विदुरा, युधिष्ठिराच्या राजसूययज्ञांत तें अत्यंत मोहक असें स्वरूप पाहून सार्‍या त्रिभुवनाला वाटलें कीं, हें स्वरूप निर्माण करण्यांत सृष्टिकर्त्या ब्रह्मदेवाच्या सर्व नैपुण्याची पराकाष्ठा होऊन तें संपलें असावें व म्हणून त्याला आतां यापुढें सृष्टि करतां येणार नाहीं ॥ १३ ॥ विदुरा, प्रेमानें ओथंबलेल्या हंसण्यानें, रासक्रीडेनें आणि लीलायुक्त कटाक्षांनीं श्रीकृष्णानें आपला बहुमान केला, असें समजून गोकुळांतील स्त्रिया त्याच्याकडे सारखी दृष्टि लावीत आणि ( तो मार्गानें जाऊं लागला म्हणजे ) मनानें त्याच्याबरोबर जात; अर्थात् त्या वेळीं त्यांच्या हातांतील कामें तशींच राहून त्या स्तंभित होत असत ॥ १४ ॥ विदुरा, स्वतः जन्मरहित असलेल्या परमेश्वराचीं, देव, साधु इत्यादि शांत, आणि दैत्य, दानव इत्यादि अशांत अशीं रूपें आहेत. त्यांत शांत रूपांना दुसर्‍या अशांत रूपांकडून पीडा झाली म्हणजे त्याच्या अंतःकरणांत दया उत्पन्न होते. आणि मग निर्गुण आणि सगुण अशा दोन्ही स्वरूपांचा तो स्वामी परमेश्वर महत्तत्त्व हें जिचा केवळ अंश आहे, अशा आपल्या प्रकृतीनें युक्त होऊन अग्नीप्रमाणें जन्मास येतो. ( वस्तुतः अग्नि जसा काष्ठांना व्यापून असतो; पण घर्षणानें मात्र व्यक्त होतो, त्याप्रमाणें परमेश्वर सर्व स्वरूपांना व्यापणारा असून शांत व अशांत रूपांच्या घर्षणानें केवळ व्यक्तरूपास येतो ) ॥ १५ ॥

तो भगवान् जन्मरहित असून त्यानें वसुदेवाच्या घरीं ( कारागृहांत ) जन्म घेतलासें दाखविलें. नंतर तेथून पुढें तो गोकुळांत राहावयास गेला आणि स्वतः अनंतपराक्रमी असतांहि कालयवनरूप शत्रूची भीति वाटते असें दाखवून मथुरानगरींतून दूर पळून गेला. हें पाहून विदुरा, मला खरोखर वाईट वाटतें ॥ १६ ॥ तसेंच ( गोकुळांतून मथुरेस गेल्यावर ) तो आपल्या मातापित्यांच्या पायां पडून म्हणाला कीं, 'हे तात, हे आई, कंसाची आम्हांला अतिशय भीति वाटल्यामुळें आमच्या हातून तुमची सेवा होऊन

उपकराची फेड करण्याचें कार्य झालें नाहीं, तरी आमच्यावर तुम्ही कृपा करून रागावूं नका!' विदुरा, ह्या गोष्टीचें स्मरण झालें कीं,माझ्या मनांत दुःखानें कशी कालवाकालव होते ॥ ७॥ पण विदुरा, ( असल्या त्याच्या गोष्टींवरून श्रीकृष्ण ही व्यक्ति सामान्य होती असें मात्र ठरत नाहीं; कारण ) ज्यानें आपल्या तेजस्वी भुवया वक्र केल्याबरोबर काळशक्तीच्या योगें भूमीचा भार दूर झाला, अशा त्या श्रीकृष्णाच्या चरणांच्या धुळीचा वास ज्यानें एकदां घेतला, असा कोणता बरें पुरुष त्याला मग विसरूं शकेल ? ॥ १८ ॥ विदुरा, तुम्ही सर्वांनीं पाहिलेंच आहे कीं, युधिष्ठिराच्या राजसूययज्ञांत शिशुपालाला देखील श्रीकृष्णाकडून उत्तम गति मिळाली. वास्तविक शिशुपाल श्रीकृष्णाचा द्वेष्टा होता; तथापि, योगी लोक उत्तम प्रकारच्या योगसाधानानें जी सिद्धि मिळवूं पाहतात, ती त्याला श्रीकृष्ण-कृपेनें सहज मिळाली. अशा त्या भगवान् कृष्णाचा विरह कोणाला बरें सहन होईल ? ॥ १९ ॥ विदुरा, आणखीहि जे दुसरे वीर पुरुष रणभूमीवर अर्जुनाच्या अस्त्रांनीं मृत्यु पावल्यामुळें पवित्र झाले, त्यांना श्रीकृष्णाच्या मनोहर मुखकमलाचें अंतीं दर्शन झाल्यामुळें तेहि कृष्णलोकाला प्राप्त झाले ॥ २० ॥ श्रीकृष्णाचें स्वतःचें ऐश्वर्य अनुपम असून तो त्रैलोक्यांचा स्वामी आहे. आत्मस्वरूपाचें साम्राज्य तो भोगीत असल्यामुळें त्याचे कोणतेहि मनोरथ पूर्ण व्हावयाचे राहिले अशी स्थिति नाहीं; इंद्रासारखे चिरस्थायी लोकपालसुद्धां त्याला करभार अर्पण करतात आणि आपल्या किरीटयुक्त मस्तकानें त्याच्या पाय ठेवण्याच्या स्थानाची पूजा करतात ॥ २१ ॥ पण, विदुरा, श्रीकृष्ण एवढा ऐश्वर्यशाली असतांहि उच्च सिंहासनावर बसलेल्या उग्रसेनापुढें उभा राहून ' महाराज, इकडे लक्ष ठेवा ' अशी ललकारी देऊन राजसभेंत जागृति ठेवीत असे; हें त्याचें सेवकपण माझ्यासारख्या त्याच्या भक्तांना फारच कष्टप्रद होतें ॥ २२ ॥

फार काय सांगावें ? कृष्णाचा वध करण्याच्या इच्छेनें आलेल्या दुष्ट पूतनेनें आपल्या स्तनांतील कालकूट विष त्याला पाजिलें; तथापि तिलाहि मातेला मिळावयास उचित अशी जी गति ती मिळाली. तेव्हां अशा त्या श्रीकृष्णापरत्या दुसऱ्या कोणाला दयाळू म्हणून आम्हीं शरण जावें बरें ? ॥ २३ ॥ विदुरा, हातांत सुंदर आंसाचें सुदर्शन-चक्र धारण करणाऱ्या श्रीकृष्णाला स्कंधावर घेऊन गरुड रणभूमीवर आपल्यावर धावून येत आहे, असें ज्या असुरांनीं पाहिलें. त्यांनीं त्रैलोक्याधिपति अशा श्रीकृष्णाशीं विरोध करण्याचा मनांत निश्चय केलेला होता, तरी भगवद्भक्तांचीच गति त्यांना मिळाली, यास्तव ते त्याचे भक्तच होते, असें मला वाटतें ॥ २४ ॥ ( त्या श्रीकृष्णाचें चरित्र मी आतां आरंभापासून थोडक्यांत सांगतों. )

पृथ्वीचें कल्याण करावें यासाठीं ब्रह्मदेवानें विनंती केली, तेव्हां त्या परमेश्वरानें वसुदेव-देवकी हीं भोजदेशाचा राजा जो कंस याच्या कारागृहांत असतां त्यांच्या पोटीं जन्म घेतला ॥ २५ ॥ तेथून वसुदेव पित्यानें त्याला कंसाच्या भीतीमुळें नंदाच्या गोकुळांत नेलें आणि तेथें तो कोणास उमगू न येतां बळरामासह गोकुळांत अकरा वर्षे राहिला.

॥ २६ ॥ आपल्या भोंवतीं गोपाळांचा थवा घेऊन तो श्रीकृष्ण यमुनेच्या कांठीं असलेल्या उपवनांत मधुर गायन करणाऱ्या पक्ष्यांनीं गजबजून गेलेल्या वृक्षराजीखालीं वासरें चारीत क्रीडा करीत असे ॥ २७ ॥ गोकुळांतील मनुष्यांना तो आपल्या प्रेक्षणीय अशा बाललीला दाखवी. मधून रडावें, मधून हंसावें असें तो करी; तेव्हां त्याची दृष्टि सुंदर बालसिंहाच्या दृष्टीसारखी पाणीदार दिसे ॥ २८ ॥ त्याचे गाई–बैल शुभ्रवर्णाचे असत आणि सौंदर्य तर त्यांच्या ठिकणीं मूर्तिमंत वास करीत होतें. त्या आपल्या गाईबैलांना चारीत तो श्रीकृष्ण आपली मुरली वाजवून बरोबरच्या गोपांची करमणूक करीत असे ॥ २९ ॥ (आपला शत्रु कृष्ण हा गोकुळांत नांदत आहे, असें कळल्यावरून) भोजराज कंसानें त्याचा वध करण्यासाठीं इच्छेस येईल तसें रूप धारण करणाऱ्या मायावी दैत्यांची योजना केली होती; पण त्या बालकृष्णानें ते दैत्य म्हणजे खेळांतल्या बाहुल्याच जणूं काय, अशा सहज लीलेनें त्यांचा नाश केला ॥ ३० ॥ (पुढें त्या श्रीकृष्णानें आणखीहि चमत्कार केले.) कालिया सर्पाच्या विषानें दुष्ट झालेलें यमुनेचें पाणी पिऊन एकदां तेथील गाईवासरें मरण पावलीं. तेव्हां त्यानें त्या कालियाचा दर्प नाहींसा करून त्याला तेथून घालवून दिलें व गाईंना जिवंत करून त्यांना यमुनेचें पाणी पाजिलें ॥ ३१ ॥ तसेंच गोपांचा राजा जो नंद यानें साठविलेल्या द्रव्याचा उत्तम प्रकारचा व्यय व्हावा या इच्छेनें त्यानें उत्तम ब्राह्मणांच्या साहाय्यानें त्याच्याकडून गोसव * नांवाचा यज्ञ करविला ॥ ३२ ॥ विदुरा, (त्या बाल श्रीकृष्णाचा आणखींहि एक महापराक्रम तुला सांगतों.) नंदानें गोसव[1] केलेला पाहून इन्द्राला आपला अपमान झालासा वाटलें व त्यामुळें मोठ्या रागानें त्यानें गोकुळावर भयंकर पाऊस पाडण्यास आरंभ केला. तेव्हां गोकुळांतील सारे लोक भयानें व्याकुळ झाले; पण त्यांच्यावर श्रीकृष्णानें कृपा करून त्यांचें रक्षण केलें. तें कसें तर, गोवर्धन पर्वत त्यानें छत्रीप्रमाणें सहज लीलेनें त्या गोकुळावर उचलून धरिला ॥ ३३ ॥ विदुरा, तो बाल श्रीकृष्ण गोपींच्या समूहांत फारच शोभत असे आणि शरदृतूंत आवशीस स्वच्छ चांदणें पडलें म्हणजे त्या रमणीय प्रसंगीं तो मधुरस्वरयुक्त गायन करून क्रीडा करीत असे. ॥ ३४ ॥

* या यज्ञांत गाई व त्यांचें पोषण ज्यावर होई तो गोवर्धन पर्वत यांची पूजा होती.

१ हा गोसव कृष्णानें नवीनच सुरू केला. त्याच्यापूर्वीं सर्व गोप इन्द्राचीच पूजा करीत. आपली पूजा गोपांनीं बंद केलेली पाहून इंद्राला राग आला.

दुसरा अध्याय समाप्त.

# अध्याय ३ रा

उद्धव विदुराला म्हणतो,–विदुरा, नंतर श्रीकृष्ण बलरामासह मथुरेस आला आणि आपल्या मातापितरांचें कल्याण करावें म्हणून आपला शत्रुगणांतील मोठा शत्रु जो कंस, त्याला त्यानें पराक्रमानें उच्चासनावरून खालीं पाडून ठार केलें आणि गतप्राण झालेल्या त्याला मग जमिनीवर ओढिलें ॥ १ ॥ विदुरा, ( श्रीकृष्णाची बुद्धि फारच प्रखर होती. ) सांदीपनीनें एकएकदांच सांगावें आणि कृष्णानें तें पाठ करावें अशा रीतीनें वेदांचें त्यानें सविस्तर अध्ययन केलें. नंतर त्या गुरूला गुरुदक्षिणारूप वर म्हणून त्याचा जो पुत्र मृत झाला होता, त्याला पंचजन नांवाच्या दैत्याच्या उदरांतून परत आणून दिलें ॥ २ ॥ पुढें त्यानें लक्ष्मीसमान जिचें सौंदर्य होतें, अशा भीष्मक राजाच्या रुक्मिणी नामक कन्येशीं उत्कर्षाच्या हेतूनें गांधर्व विधीनें विवाह केला. त्या विवाहासाठीं जे अनेक राजे बोलाविलेले होते, त्यांच्या समक्ष त्यांच्या मस्तकांवर पाय देऊन त्या पराक्रमी श्रीकृष्णानें रुक्मिणीरूप आपला भाग उचलून नेला ॥ ३ ॥

नंतर त्यानें नग्नजित् राजाची कन्या जी सत्या तिच्याशीं स्वयंवरांत विवाह केला. त्या प्रसंगीं त्यानें मोठीं वशिंडें असलेल्या सात बैलांना त्यांचीं नाकें टोंचल्याशिवायच वठणीवर आणिलें. ( नग्नजित् राजानें आपल्या मुलीच्या स्वयंवरासाठीं तसा पणच केला होता. तो इतर राजांना जिंकतां आला नाहीं; पण कृष्णानें तो जिंकिला व सत्येचें पाणिग्रहण केलें.) तेव्हां आपला अपमान झालासें वाटून त्या सत्येची इच्छा करणारे ते राजे सशस्त्र होऊन कृष्णावर चालून आले असतां, त्यानें स्वतः सुरक्षित राहून त्या मूर्ख राजांचा आपल्या शस्त्रांनीं वध केला ॥ ४ ॥ विदुरा, या सत्यानामक स्त्रीला जें प्रिय वाटेल तें करावें, असें कृष्णाला एखाद्या प्राकृत मनुष्याप्रमाणें वाटे. तेव्हां त्यानें एका प्रसंगीं पारिजातक वृक्ष स्वर्गांतून आपल्याबरोबर आणिला. तें पाहून इंद्रानें क्रोधांध होऊन त्याच्यावर आपल्या देवगणांसह चाल केली. इंद्र हा आपल्या स्त्रियांच्या खेळांतील केवळ पशु असाच होता. ( तसें नसतें तर त्यानें आपल्या उपकारकर्त्या श्रीकृष्णाशीं असें वर्तन केलें नसतें * )॥५॥

पृथ्वीचा पुत्र जो भौमासुर तो आपल्या प्रचंड शरिरानें आकाशाला ग्रासून टाकीत असतां, श्रीकृष्णानें त्याबरोबर युद्ध करून सुदर्शनचक्रानें त्याचा शिरच्छेद केला. तें पाहून पृथ्वीनें त्या श्रीकृष्णाची प्रार्थना केली. तेव्हां श्रीकृष्णानें भौमासुराच्या भगदत्तनामक पुत्राला त्याचें उरलेलें राज्य दिलें आणि मग तो भौमासुराच्या अंतःपुरांत गेला ॥ ६ ॥ त्या

---

* देवमाता अदितीचीं कुंडलें भौमासुर दैत्यानें पळविल्यावरून तीं परत मिळवून तिला द्यावीं, या हेतूनें इंद्राच्या निमंत्रणावरून श्रीकृष्ण सत्यभामेसह स्वर्गीं गेला व अदितीचीं कुंडलें त्यानें तिला मिळवून दिलीं, अशी कथा पुढें दशम स्कंध ६९ व्या अध्यायांत आहे.

ठिकाणीं त्या भौमासुरानें किती तरी राजकन्यांना आणून कोंडून ठेविलें होतें. दुःखितांचा कैवारी श्रीकृष्ण आंत येतांच त्याला पाहून त्या राजकन्या चटकन उठून उभ्या राहिल्या आणि आनंदयुक्त पण लज्जान्वित अशा कटाक्षांनीं त्यांनीं त्याचा ( पति म्हणून ) स्वीकार केला ॥ ७ ॥ मग ( श्रीकृष्णानें त्यांना द्वारकेस नेलें व ) यथाविधि त्यांची पृथक् मंदिरामध्यें स्थापना केली. नंतर अवश्य तितकीं रूपें आपल्या मायेनें धारण करून त्यांचें त्यानें यथाविधि पाणिग्रहण केलें ॥ ८ ॥ त्याला त्या प्रत्येक स्त्रीपासून दहा दहा मुलें झालीं व तीं सर्व श्रीकृष्णासारखींच होतीं. अशा रीतीनें त्यानें आपल्या मायेचा उत्कर्ष दाखविला ॥९॥ कालयवन, मगध देशाचा राजा जरासंध, तसेंच शाल्व इत्यादि राजांनीं सैन्यासह त्याच्या द्वारकानगरीवर चाल करून तिला वेढा दिला, तेव्हां त्यानें आपल्या मुचकुंद, भीम आदिकरून भक्तांना आपलें दिव्य तेज देऊन त्यांच्या द्वारा आपणच त्या राजांचा वध केला ॥ १० ॥ तसेंच त्यानें शंबरासुर, द्विविद नामक वानर, बाणासुर, मुर, दैत्य, बल्वल आणि दुसरे दंतवक्र, शिशुपाल आदिकरून जे दुष्ट होते त्यांपैकीं कांहींचा आपल्या भक्तांकडून वध करविला व कांहींना स्वतः मारिलें ॥ ११ ॥ विदुरा, तुझ्या बंधूचे पुत्र जे कौरव आणि पांडव त्यांच्यांत दोन पक्ष होऊन त्यांनां अनेक राजे युद्धासाठीं येऊन मिळाले. त्यांचीं सैन्यें कुरुक्षेत्रांत एकमेकांवर चाल करूं लागलीं असतां पृथ्वी कांपूं लागली. ( पण त्या सर्वांचाहि त्यानें तसाच नाश करविला ) ॥ १२ ॥ कर्ण, दुःशासन व शकुनि यांच्या दुष्ट मसलतीचा परिणाम म्हणून दुर्योधनाचें वैभव आणि आयुष्य नष्ट झालें आणि आपल्या अनुयायांसह मांडी फुटून तो रणांगणावर पडला; पण तें पाहूनहि श्रीकृष्णाचें समाधान झालें नाहीं ॥ १३ ॥ विदुरा, श्रीकृष्णाला वाटलें कीं, माझे अंशभूत जे यादव, त्यांचें पृथ्वीला असह्य झालेलें सैन्य जिवंत असतांना, द्रोण, भीष्म, अर्जुन, भीम आदिकरून वीरांसह अठरा अक्षौहिणी सैन्याचा नाश झाला तरी, त्यानें पृथ्वीचा भार तो कितीसा नाहींसा होणार ? ॥ १४ ॥ हे यादव मद्यपानानें डोळे लाल करून उन्मत्तपणानें आपसांत कलह करतील तर त्यांचा नाश होणें शक्य आहे. त्यांच्या नाशाला याहून दुसरा उपाय नाहीं आणि तो करावयास मी स्वतः उद्युक्त झालों, तरच ते यादव नष्ट होतील ॥ १५ ॥ असा विचार केल्यावर श्रीकृष्णानें धर्मराजाची त्याच्या राज्यावर स्थापना केली आणि सदाचरणाच्या मार्गाचें उदाहरण घालून मित्रांना संतोष दिला ॥ १६ ॥ पुरुवंशाचा अंकुर म्हणून अभिमन्यूपासून उत्तरेच्या पोटीं जो उत्तम गर्भ राहिला होता, तो वास्तविक अश्वत्थाम्याच्या अस्त्रानें नष्टच झाला होता, पण भगवंतानें त्याचें पुनर्जीवन केलें ॥ १७ ॥ मग त्यानें युधिष्ठिराकडून तीन अश्वमेध यज्ञ करविले आणि युधिष्ठिरानें आपल्या बंधूंच्या साहाय्यानें राज्याचें रक्षण करून, कृष्णाच्या सांगण्याप्रमाणें वर्तन ठेविलें आणि सुखानें कालक्रमणा केली ॥ १८ ॥ विदुरा, श्रीकृष्ण विश्वाचा अंतर्यामी असूनहि लोकव्यवहार आणि वैदिक मार्ग यांना अनुसरून वागत असे. सांख्यज्ञानांत तो मुरलेला असल्यामुळें द्वारकानगरींत तो जरी नाना विषयांचा उपभोग घेई, तरी त्याची त्यांत गुंतीच

आसक्ति नसे ॥ १९ ॥ तो कोणाकडेहि मधुर स्मित करूनच पाही व कोणाशीं झालें तरी अमृता-सारख्या गोड शब्दांनीं बोले. त्याचें आचरण अगदीं निर्दोष असून त्याचा देह म्हणजे प्रत्यक्ष लक्ष्मीचें निवासस्थान होता ॥ २० ॥ तो इह आणि पर अशा दोन्ही लोकांनां संतुष्ट करून यादवांनाहि आनंद देत असे आणि स्वतःहि विषयांचा उपभोग घेई. रात्र ही स्त्रियांना आनंदाचा अवसर देणारी असल्यामुळें श्रीकृष्णहि त्या वेळीं आपल्या स्त्रियांना क्षणभर आपल्या प्रेमाचा लाभ देत असे ॥ २१ ॥ याप्रमाणें कित्येक वर्षें गृहस्थाश्रमाचा उपभोग घेत आनंदानें राहिल्यावर त्या श्रीकृष्णाच्या मनांत संसारभोगांविषयीं वैराग्य उत्पन्न झालें ॥ २२ ॥ सर्व विषयच मुळीं दैवाच्या आधीन असल्यामुळें स्वतः मनुष्यहि दैवाच्या आधीन असल्यासारखाच होय. तेव्हां ज्ञानयोगाच्या विषयांत श्रीकृष्णाचें अनुकरण करणारा कोणता पुरुष त्या विषयभोगावर विश्वास ठेवील ? ॥ २३ ॥ असो. विदुरा, एकदां यादव आणि भोज या कुळांतील मुलें द्वारकेंत खेळत असतां त्यांनीं ऋषींना राग येईल असें आचरण केलें व त्या ऋषींनीं सुद्धां ( यादवांचा नाश करण्याचें ) भगवंताचें मत जाणून त्या मुलांना शाप दिला ॥ २४ ॥ मग कांहीं महिन्यांनीं वृष्णि, भोज, अन्धक इत्यादि यादवकुळांतील सर्व पुरुष मोठ्या आनंदानें रथांत बसून प्रभासक्षेत्रास गेले. या वेळीं श्रीकृष्णाच्या मायेनें त्यांच्यावर आपल्या मोहनीचा पगडा बसविला होता ॥ २५ ॥ येथें ( शापापासून मुक्त होण्याकरितां ) त्यांनीं तीर्थावर स्नान करून तेथील पवित्र उदकानें पितर, देव आणि ऋषि यांचें तर्पण केलें आणि ब्राह्मणांना उत्तम गुणयुक्त अशा गाईचें दान केलें ॥ २६ ॥ तसेंच सोनें, रुपें, शय्या, वस्त्रें, हरिणाचीं कातडीं, घाबळ्या, पालख्या, रथ हत्ती, दासी, आणि निर्वाहापुरती भूमि अशींहि दानें त्यांनीं त्यांना दिलीं ॥ २७ ॥ आणि अन्न, अनेक प्रकारचा रस इत्यादि पदार्थहि देऊन त्यांनीं तें सर्व दानफल भगवंताला अर्पण केलें आणि आपलें जीवित गाई आणि विप्र यांच्या-साठींच आहे असें दर्शवून त्यांनीं भूमीवर पडून त्या ब्राह्मणांना साष्टांग नमस्कार घातले ॥ २८ ॥

## तिसरा अध्याय समाप्त

---

# अध्याय ४ था

उद्धव म्हणाला,—विदुरा, ( याप्रमाणें दानें केल्यावर ) ब्रह्मदेवाची अनुज्ञा घेऊन यादवांनीं भोजन केलें आणि त्यांत मद्यपान करून त्यामुळें ज्ञानभ्रष्ट झाल्यावर एकमेकांना मर्मभेदक शब्दांनीं बोलूं लागले ॥ १ ॥ त्या मद्याच्या दोषामुळें त्या यादवांचीं मनें क्षुब्ध झालीं होतीं म्हणून ( एकमेकांचे मर्मभेदक शब्द ऐकून ) रानांत वेळूवर वेळू घांसून ज्याप्रमाणें अग्नि उत्पन्न होतो, त्याप्रमाणें सूर्य अस्तास गेला असतां त्या यादवांमध्यें कलहाग्नीचा भडका उडाला ॥ २ ॥ तेव्हां हा आपल्याच मायेचा प्रताप होय असें पाहून तो भगवान् श्रीकृष्ण सरस्वतीच्या उदकानें आचमन करून एका पिंपळाच्या वृक्षाच्या बुंध्याशीं बसून राहिला ॥ ३ ॥ विदुरा, श्रीकृष्णाचें ब्रीद शरणागताचें रक्षण करणें हेंच होय. आपल्या कुळाचा नाश करण्याची सिद्धता केल्यावर तो मला म्हणाला होता कीं, उद्धवा, तूं येथून बदरिकाश्रमाला जा ! ॥ ४ ॥ विदुरा, असें करण्यांत श्रीकृष्णाचा काय अभिप्राय आहे हें मीं जाणिलें, तरीसुद्धां त्याच्या पायांचा विरह सहन करणें मला अशक्य असल्यामुळें ( बदरिकाश्रमाला न जातां या गडबडींत मी ) श्रीकृष्णाच्या मागोमाग चाललों ॥ ५ ॥ त्याचा शोध करितां करितां, लक्ष्मीचें निवासस्थान व विश्व व्यापून पुरणारा असा तो आमचा प्रिय स्वामी सरस्वतीच्या कांठीं एकटाच बसला आहे असें मला आढळलें ॥ ६ ॥

त्याची कांति श्याम वर्णाची असून तो रजस्तमांनीं विरहित अशा शुद्ध सत्त्वाची मूर्ति दिसत होता. त्याचे नेत्र अत्यंत शांत आणि आरक्त वर्णाचे असून चार हात आणि रेशमाचा पीतांबर यामुळें त्याची सहज ओळख पटत होती ॥ ७ ॥ आपल्या डाव्या मांडीवर उजवा पाय ठेवून तो एका लहानशा पिंपळाच्या झाडाला टेकून बसला व त्यानें सर्व भोगेच्छा सोडिली असतांहि त्याचें शरीर मुळींच कृश दिसत नव्हतें ॥ ८ ॥ या संधीस महान् भगवद्भक्त आणि व्यासांचा प्रिय मित्र असा जो भोगसिद्धि प्राप्त करून घेतलेला मैत्रेयमुनि, तो अनेक प्रदेश फिरत फिरत सहज येथें आला ॥ ९ ॥ विदुरा, मैत्रेयमुनींचें भगवान् श्रीकृष्णावर फार प्रेम होतें. तेथें आल्याबरोबर आनंद आणि भक्तिभाव यामुळें त्यांनीं श्रीकृष्णापुढें मस्तक वांकविलें आणि आमचा संवाद ते ऐकूं लागले. तेव्हां भगवान् श्रीकृष्ण मजकडे पाहून प्रेमानें हंसला आणि माझे श्रम दूर करण्यासाठीं मला म्हणाला ॥ १० ॥ " उद्धवा, तुझ्या मनांतील इष्ट काय आहे, हें मला ठाऊक आहे. यास्तव इतरांना मिळण्यास सर्वथैव कठीण असें कांहीं मी तुला देतों. उद्धवा, तूं वसुनामक देवांचा अवतार आहेस व पूर्वीं सृष्टि उत्पन्न करणाऱ्या वसूंच्या यज्ञांत माझी प्राप्ति व्हावी म्हणून तूं माझें पूजनहि केलें होतेंस ॥ ११ ॥ हे सदाचरणी उद्धवा, आतां प्राप्त झालेला हा तुझा जन्म सर्वांत शेवटचाच होय. माझी कृपा तूं

संपादन केलेली आहेस, आणि म्हणूनच हा मनुष्यलोक मी सोडून जात असतां, या एकांताच्या ठिकाणीं सुदैवानें माझें दर्शन तुला घडलें. माझ्याविषयीं तुझी भक्ति अगदीं निर्मळ आहे ॥ १२ ॥ पूर्वीं सृष्टि उत्पन्न होतांना, माझ्या नाभीपासून निघालेल्या कमळावर ब्रह्मदेव बसला असतां, त्याला मीं श्रेष्ठ अशा ज्ञानाचा उपदेश केला होता. त्यांत माझ्या माहात्म्याचें वर्णन होतें व त्याला ज्ञानी पुरुष 'भागवत' असें म्हणतात, (उद्धवा, तें ज्ञान मी आतां तुलाहि सांगतों)" ॥ १३ ॥ विदुरा, याप्रमाणें त्या परम-पुरुषानें मला आदरानें सांगितलें आणि माझ्याकडे पाहून कृपेला मी पात्र आहें असें दर्शविलें. तेव्हां माझ्या अंगावर प्रेमानें रोमांच उभे राहिले आणि नेत्रांतून आनंदाश्रूंचा लोट वाहूं लागला. माझा कंठ दाटून आल्यामुळें शब्दोच्चार नीट होईना. तथापि तशाच स्थितींत हात जोडून मी बोलूं लागलों ॥ १४ ॥ "हे जगन्नायका, तुझ्या चरण-कमलाची जे सेवा करतात त्यांना धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष या चारी पुरुषार्थांपैकीं कोणताहि पुरुषार्थ दुष्प्राप्य नाहीं. तथापि, हे परमपुरुषा, मी त्यांपैकीं एकहि मागत नाहीं. केवळ तुझ्या चरणकमलाची सेवा करावी एवढीच मला उत्कट इच्छा आहे! ॥ १५ ॥ देवा, तुला कसलीहि इच्छा नाहीं; तरी तूं प्रत्यक्ष कालस्वरूपी असतांहि शत्रूचें भय प्राप्त झालें असें दाखवून आश्रयस्थान शोधिलेंस आणि तेथें पळून गेलास. स्वतःच्या स्वरूपांतच पूर्ण आनंदाचा अनुभव घेत असतांहि सहस्रावधि स्त्रियांना तूं आश्रय दिलेला आहेस. अशा या तुझा विचार करूं लागलें म्हणजे ज्ञानी पुरुषाची देखील मति कुंठित होते ॥ १६ ॥

हे सर्वसमर्थ श्रीकृष्णा, तुझ्या सर्वश्रेष्ठ आत्मज्ञानाला केव्हांहि खंड नाहीं व तें कोठेंहि कुंठित होणारें नव्हे. तरी पण सल्लामसलतीसाठीं मला बोलावून एखाद्या अज्ञानी माणसाप्रमाणें तूं मला प्रश्न करीत असस आणि बोलतांना प्रमाद न व्हावा म्हणून जपून बोलतोसें दाखवीत असस. देवा, ही गोष्ट मनांत आली म्हणजे माझें अंतःकरण विचारमूढ होतें ॥ १७ ॥ हे जगत्पते, आत्मरहस्याचें उद्घाटन करणारें जें श्रेष्ठ ज्ञान तुम्हीं ब्रह्मदेवाला सांगितलें, तें सर्व जर आम्हांलाहि ग्रहण करतां येण्यासारखें असेल, तर तें आम्हांला सांगा, म्हणजे तेणेंकरून आम्ही पापापासून त्वरित तरून जाऊं." ॥ १८ ॥ विदुरा, याप्रमाणें मी आपलें अंतःकरण मोकळें करून बोललों असतां, सर्वश्रेष्ठ अशा त्या कमल-नेत्र भगवंतानें आपल्या स्वरूपाविषयींच्या उत्तमोत्तम ज्ञानाचा मला उपदेश केला ॥ १९ ॥ विदुरा, याप्रमाणें मी श्रीकृष्णाची चरणसेवा करून त्याला संतुष्ट केलें आणि त्याच्यापासून आत्मज्ञानाच्या मार्गाचें रहस्य समजावून घेतलें. नंतर त्याच्या चरणांचें वंदन करून त्याला मीं प्रदक्षिणा घातली आणि त्याच्या विरहामुळें दुःखित अन्तःकरणाचा असा होऊन येथें आलों आहें ॥ २० ॥ विदुरा, त्या प्रभूच्या दर्शनामुळें प्रथम मी आनंदित झालों, पण पुढें वियोगामुळें दुःखित झालों. तेव्हां आतां पुढें त्याला प्रिय असलेला जो बदरिका-श्रमाचा प्रदेश त्यांत जाऊन मी राहणार आहें ॥ २१ ॥ त्या ठिकाणीं लोकांचें संरक्षण

करणारे देवस्वरूपी जे भगवान् नरनारायणऋषि त्यांनीं पुष्कळ काळ तपश्चर्या केली होती. त्यांची तपश्चर्या त्यांच्या स्वतःच्या दृष्टीनें खडतर असली, तरी लोकांना मात्र सुख व्हावें म्हणून ती ते करीत होते ॥ २२ ॥ शुकाचार्य म्हणतात,— राजा, याप्रमाणें आपल्या बांधवांचा नाश झाल्याचें दुःसह वर्तमान विदुरानें उद्धवापासून ऐकिलें, तेव्हां त्याच्या मनांत दुःखाचा उमाळा आला; पण त्याचें त्या ज्ञानी विदुरानें आत्मज्ञानाच्या योगानें शमन केलें ॥ २३ ॥ उद्धव महान् भगवद्भक्त होता. श्रीकृष्णाच्या परिवारापैकीं तो मुख्य असल्यामुळें विदुराला सहजच त्याच्याविषयीं विशेष विश्वास वाटत होता व त्यामुळें तो बदरिकाश्रमास जावयास निघाला असतां त्यानें त्याला कांहीं प्रश्न केला ॥ २४ ॥ विदुर म्हणाला,—' उद्धवा, योगेश्वर श्रीकृष्णानें आत्मस्वरूपाचें रहस्य प्रकट करणारें असें जें श्रेष्ठ ज्ञान तुला सांगितलें, तें तूं आम्हांला अवश्य सांग. कारण ( तुझ्यासारख्या ) श्रीकृष्णाच्या भक्तांचा आचारच असा आहे कीं, त्यांनीं आपल्या सेवकांचे मनोरथ पूर्ण करीत फिरावें ॥२५॥ उद्धव म्हणाला,–विदुरा, श्रीकृष्णानें हा मृत्युलोक सोडून जातांना स्वतःच मैत्रेयाला माझ्या देखत ( या ज्ञानाचा उपदेश तुला देण्याची ) आज्ञा केली आहे. यास्तव या ज्ञानाविषयीं खरें म्हणशील तर त्या मैत्रेयाचीच आराधना करणें तुला योग्य आहे ' ॥२६॥ शुकाचार्य म्हणतात, राजा, याप्रमाणें विदुरापाशीं श्रीकृष्णाचे गुणानुवाद गायिल्यावर त्या अमृतमय गुणकीर्तनानें उद्धवाचें सर्व दुःख शांत झालें. मग त्या यमुनेच्या वाळवंटा-वर ती रात्र क्षणासारखी घालवून तो तेथून निघून गेला ॥ २७ ॥ परीक्षित् म्हणाला,— शुकमुने, ( यादवांनीं एकमेकांशीं युद्ध केलें व त्यांत ) वृष्णि, भोज इत्यादि यादव-कुळांतील महापराक्रमी वीरांचे अग्रणी असे मोठमोठे सेनानायक तर नष्ट झालेच; पण त्रैलोक्यनायक अशा श्रीकृष्णानें देखील त्या वेळीं देहाचा त्याग केला. असें असतां त्यांतील मुख्य असा उद्धव मात्र जिवंत कसा राहिला बरें ? ॥ २८ ॥ शुकाचार्यांनीं उत्तर केलें,– ( त्याचें कारण सांगतों ). श्रीकृष्णाचा संकल्प केव्हांच व्यर्थ जाणारा नव्हे. तेव्हां आपल्या इच्छेनुसार त्यानें ब्राह्मणाच्या शापाचें मिष करून आपल्या कुळाचा संहार तर केला; पण देहत्याग करतेवेळीं मनांत त्यानें खरोखर असा विचार केला कीं, ॥ २९ ॥ ' मी या लोकांतून गेल्यावर आत्मस्वरूपासंबंधानें जें ज्ञान मजजवळ आहे तें ग्रहण करण्यास ( व त्याचा पुढें प्रसार करण्यास ) आत्मज्ञान्यांमध्यें श्रेष्ठ असा उद्धवच सत्पात्र आहे ॥३०॥ शिवाय, तो भक्तश्रेष्ठ उद्धव माझ्याहून कोणत्याहि प्रकारें अणुमात्र कमी नाहीं. त्रिगुणां-मुळें होणाऱ्या विकारांची त्याला केव्हांहि पीडा होत नाहीं. यास्तव माझ्या आत्मस्वरूप-विषयक ज्ञानाचा लोकांना उपदेश करण्यासाठीं त्यानें मृत्युलोकीं राहावें, हें योग्य होय ॥ ३१ ॥ त्रैलोक्यांचा गुरु जो श्रीकृष्ण त्यानें असा विचार केला आणि ' बदरिकाश्रमांत जा ! ' अशी उद्धवाला आज्ञा केली. त्याप्रमाणें उद्धव त्या ठिकाणीं गेला आणि समाधीच्या योगानें त्यानें श्रीहरीचें पूजन केलें ॥ ३२ ॥ राजा, उद्धवानें सांगितल्याप्रमाणें भगवान् श्रीकृष्णानें लीलेसाठीं देह धारण करून कशीं स्तुत्य कार्यें केलीं, तें सर्व वर्तमान विदुरानें

ऐकिलें ॥ ३३ ॥ तसेंच ज्ञानी पुरुषांचें धैर्य वृद्धिंगत करणारा, पण पशुवृत्तीनें वागणाऱ्या चंचल मनाच्या मनुष्यांना मात्र करावयास कठीण, असा देहत्याग त्यानें केल्याचेंहि त्यानें ऐकिलें ॥ ३४ ॥ मग भक्तराज उद्धव तेथून निघून गेल्यावर तो प्रेमानें विव्हळ झाला व श्रीकृष्णानें आपलें मनानें कसें स्मरण केलें तें वारंवार मनांत आणून त्यानें फारच शोक केला ॥ ३५ ॥ हे कुरुश्रेष्ठ परीक्षिता, नंतर कांहीं दिवसांनीं तो सिद्ध असा भरतकुलश्रेष्ठ विदुर यमुनातीर सोडून जेथें तो मैत्रेयमुनि राहात होता, त्या गंगातीरावर ( हरिद्वार नांवाच्या ) ठिकाणीं प्राप्त झाला. ॥ ३६ ॥

## चौथा अध्याय समाप्त

# अध्याय ५ वा

शुकाचार्य म्हणाले—राजा, श्रीकृष्णावरील प्रेमानें पवित्र झालेला अशा कुरुश्रेष्ठ विदुर मैत्रेयऋषीच्या सुस्वभावादि गुणांनीं संतुष्ट होऊन हरिद्वारीं बसलेल्या ज्ञानी मैत्रेया-जवळ जाऊन त्यास प्रश्न करूं लागला ॥ १ ॥ तो म्हणाला– हे लोक सुख व्हावें म्हणून कर्मे करीत असतात; परंतु त्यांना सुख मिळत नाहीं आणि त्यांच्या दुःखाचें निवारणहि होत नाहीं. उलट कर्मामुळें त्यांना वारंवार दुःखच भोगावें लागतें. तेव्हां, अशा दुःखमय संसारांत मनुष्यानें कसें वागावें ( म्हणजे त्याला सुखप्राप्ति होईल ) तें आचरण आम्हांला कृपा करून सांगावें ॥ २ ॥ खरोखर पूर्वकर्मामुळें जे लोक श्रीकृष्णापासून पराङ्मुख झालेले असतात आणि म्हणून ज्यांच्या स्वभावाची साहजिक पापाकडेच प्रवृत्ति असत्ये, अशा अत्यंत दुःखी लोकांवर अनुग्रह करण्याकरितां आपल्यासारख्या भगवंताच्या शुभकारक विभूति भूतलावर फिरत असतात ॥ ३ ॥

यास्तव, हे साधुश्रेष्ठ मैत्रेयमुने, तुम्ही आम्हांला असा कांहीं कल्याणाचा मार्ग सांगा कीं, जेणेंकरून भगवान् संतुष्ट होऊन मनुष्यांच्या भक्तीनें पवित्र झालेल्या अशा हृदयांत वास करील आणि पुरातन कालापासून चालत आलेलें आत्मसाक्षात्काराचें ज्ञान प्राप्त करून देईल ॥ ४ ॥ परमेश्वर हा त्रिगुणात्मक मायेचा स्वामी आहे, म्हणून तो स्वतंत्रच आहे. पण तो अवतार घेऊन कोणतीं कृत्यें करतो व स्वतः निरपेक्ष राहून ही सृष्टि प्रथम उत्पन्न कशी करतो आणि मग तिचें संरक्षण करून विश्वाच्या उपजीविकेचीहि व्यवस्था कशी लावितो ? ॥ ५ ॥ नंतर पुनः तो आपल्या वृत्ति काढून घेऊन हृदयाकाशांत सृष्टीचा लय कसा करतो आणि आत्ममायेच्या ठिकाणीं शमन कसें करतो ? तो योगि-राजांचा अधिपति ईश्वर मूळ एक असूनहि ह्या जगांत प्रवेश करून ( ब्रह्मा, विष्णु, महेश्वर इत्यादि ) अनेकविध रूपें कशीं धारण करतो ? ॥ ६ ॥ तो भगवान्, राम-कृष्ण इत्यादि भिन्नभिन्न अवतार घेऊन क्रीडा करीत ब्राह्मण, गाई व देव यांच्या कल्याणाकरितां कशीं कर्मे करतो ? ( तें सर्व आम्हांला सांगा. ) कारण पुण्यकीर्ति पुरुषांमध्यें श्रेष्ठ अशा त्या परमेश्वराचीं अमृततुल्य चरित्रें कितीहि श्रवण केलीं, तरी आमचें मन तृप्तच होत नाहीं. ॥ ७ ॥ तो परमेश्वर लोकांचे रक्षणकर्ते राजे किंवा इन्द्रादि लोकपाल यांचाहि अधिपति आहे. त्यानें हे लोक व त्यांचे राजे आणि लोकालोक पर्वताच्या बाहेर असलेले प्रदेश हें सारें कोणकोणत्या भिन्नभिन्न तत्त्वांनीं निर्माण केलें ? या सर्व सृष्टीमध्यें विविध प्राण्यांच्या समुदायाचे अनेक भेद उत्पन्न झालेले प्रत्ययास येतात ॥ ८ ॥ हे ब्राह्मणश्रेष्ठ मैत्रेयमुने, सृष्टीचा उत्पादक असा जो स्वयम्भू परमेश्वर, त्यानें जीवाचे आणि आपलीं कर्मे, रूपें व नांवें यांचे विविध भेद उत्पन्न केले. ते कोणत्या प्रकारें हेंहि आम्हांला सांगा ॥९॥

हे मुने, श्रेष्ठ आणि कनिष्ठ अशा सर्व वर्णांच्या लोकांचे जे धर्म आहेत, ते मीं व्यासांच्या मुखांतून महाभारतांत वारंवार ऐकिले आहेत; पण त्यांत कृष्णाकथारूपी अमृताचा प्रवाह नसल्यामुळें ते आणखी ऐकावेत असें मात्र वाटत नाहीं. कारण क्षुद्र सुखें देणाऱ्या त्या धर्मांच्या श्रवणानें आम्ही कंटाळून गेलों आहों ॥ १० ॥ मुने, श्रीकृष्णाचे चरण तीर्थांप्रमाणें पवित्र असून तुमच्या सभेंत नारदादि ज्ञानी पुरुष त्याचें नामसंकीर्तन करीत असतात. त्याचें नाम मनुष्याच्या कर्णरंध्रांत प्रविष्ट झालें असतां तें त्याला संसारांत गुंतविणारें त्याचें गृहप्रेम नाहीसें करतें. अशा त्या श्रीकृष्णाच्या नांवाचा कंटाळा कोणाला येईल बरें ? ॥ ११ ॥ तुमचे मित्र जे व्यासमुनि त्यांनीं देखील भगवंताच्या गुणांचें वर्णन करावें या इच्छेनेंच महाभारताची रचना केली. त्या महाभारतांत अर्थ, काम इत्यादि क्षुद्र सुखांचें वर्णन केलें आहे खरें; पण त्याचा उद्देश मनुष्याची बुद्धि त्या मार्गानें तरी श्रीकृष्णपरमात्म्याच्या कथेकडे लागावी हाच आहे ॥ १२ ॥ श्रीकृष्णकथेंत एकदां बुद्धि जडली म्हणजे ती वाढत वाढत जाऊन श्रद्धाळू पुरुषाच्या मनांत वैषयिक सुखाविषयीं वैराग्य उत्पन्न करते आणि श्रीकृष्णाच्या चरणकमलाच्या स्मरणानें त्याला सुखी करून त्याच्या संपूर्ण दुःखाचा तत्काळ नाश करिते ॥ १३ ॥ पण जे पूर्वजन्मार्जित पापानें हरिकथेविषयीं पराङ्मुख झालेले असतात अशा अज्ञ लोकांची ती शोचनीय स्थिति पाहून मला अत्यंत दुःख होतें. कारण ज्यांचें बोलणें निष्फळ, चालणें निष्फळ आणि मनोव्यापारहि निष्फळ अशा त्या लोकांचें आयुष्य, कार्यतत्पर असलेला भगवान् काळ नित्य नष्ट करीत असतो ॥ १४ ॥ हे दीनबंधो, मैत्रेया, ईश्वर सर्वांना सुख देणारा असून त्याची कीर्ति तीर्थाप्रमाणें पवित्र आहे. भ्रमर जसा फुलांतून मध काढून घेतो, तसा तूं सर्व कथांमध्यें सारभूत अशा ज्या श्रीकृष्णकथा त्या निवडून काढ आणि आमच्या कल्याणाकरितां त्या आम्हांला सांग ! ॥१५॥ तसेंच या जगाची उत्पत्ति, रक्षण आणि संहार हीं करण्याकरितां त्रिगुणात्मक अशा मायाशक्तीचा आश्रय करून आणि राम-कृष्ण इत्यादि अवतार घेऊन त्या परमेश्वरानें जीं जीं अमानुष कृत्यें केलीं तीं मला सांग ! ॥ १६ ॥

शुकाचार्य म्हणतात—राजा, लोकांचें आत्यंतिक कल्याण व्हावें या इच्छेनें विदुरानें याप्रमाणें भगवान् मैत्रेयऋषीला प्रश्न केला असतां, त्या मैत्रेयमुनीनें त्याला बहुमानपुरस्सर उत्तर दिलें ॥ १७ ॥ मैत्रेय म्हणाला,—विदुरा, तूं सज्जन आहेस व तुझें मन परमेश्वराकडे लागलेलें आहे. तूं जो प्रश्न केलास तो फार चांगला आहे; कारण त्यापासून लोकांचें कल्याण होणारें आहे आणि तुझ्या यशाचा विस्तार होणार आहे ॥ १८ ॥ हे विदुरा, तूं व्यासापासून उत्पन्न झालेला असल्यामुळें सर्व दुःखांचा परिहार करणाऱ्या श्रीकृष्णपरमात्म्याचा अनन्यभावानें आश्रय केलास तें सर्वस्वीं योग्यच होय. ( उत्तम बीजाला अनुसरून फलहि उत्तम निघालें, तर त्यांत नवल कसलें ? ) ॥ १९ ॥ विदुरा, तूं सर्व लोकांना दंड करून त्यांचें नियमन करणारा जो भगवान् यमधर्म तोच प्रत्यक्ष आहेस. मांडव्यऋषीचा शाप झाल्यामुळें तो तूं सत्यवतीचा पुत्र जो व्यासमुनि त्याच्यापासून त्याच्या विचित्रवीर्यनामक बंधूच्या दासीच्या पोटीं जन्मास आलास ॥२० ॥ विदुरा,

तूं भगवंताला आणि त्याच्या सर्व मंडळींना नित्य प्रिय होतास, म्हणूनच त्यानें निजधामाला जातेवेळीं तुला तत्त्वज्ञानाचा उपदेश करण्याकरितां मला आज्ञा केली ॥२१॥ विदुरा, योगमायेनें ज्यांचा विस्तार केला आहे आणि सृष्टीची उत्पत्ति, रक्षण व संहार यांशिवाय दुसरें ज्यांचें प्रयोजनच नाहीं, अशा ज्या भगवन्ताच्या लीला त्यांचें मी आतां तुला अनुक्रमानें वर्णन करून सांगतों ॥ २२ ॥ भगवान् परमात्मा हा सर्व जीवांचें स्वरूप असून त्यांचा स्वामी आहे. सृष्टीपूर्वी तो विविध रूपांनीं व्यक्त झालेला नसतो, त्या वेळीं इच्छारूपी त्याच्या मायेचा लय असल्यामुळें तो एकटाच असतो ॥ २३ ॥ तेव्हां तो एकटाच प्रकाशमान असून दुसरें दृश्य कांहींच पहात नाहीं. त्याच्या इतर सर्व शक्ति सुप्त असून चिच्छक्ति मात्र जागृत असल्यामुळें त्या वेळीं तो स्वतः असूनहि नसल्यासारखाच त्याला वाटतो ॥ २४ ॥ हे भाग्यशाली विदुरा, त्या विश्वव्यापक साक्षीरूप परमेश्वराची कार्यकारणरूप मायानामक शक्ति आहे व तिच्या योगानें तो हें विश्व निर्माण करतो ॥ २५ ॥ कालशक्तीच्या योगानें त्या त्रिगुणात्मक प्रकृतीची साम्यावस्था मोडून तींत क्षोभ उत्पन्न केला म्हणजे चिच्छक्तियुक्त असा तो परमेश्वर आपल्याच अंशापासून पुरुष उत्पन्न करून त्या पुरुषाकडून तिच्यांत चिदाभासरूप वीर्याची स्थापना करतो ॥ २६ ॥ नंतर कालानें प्रेरित झालेल्या मायेपासून महत्तत्त्व उत्पन्न होतें. अनुभवज्ञान हें त्याचें स्वरूप असून अज्ञानाचा नाश करणें हा त्याचा धर्म आहे. तें महत्तत्त्व आपल्याच शरिरांत समाविष्ट असलेल्या विश्वाला व्यक्त स्वरूप देतें ॥ २७ ॥

त्या आदिपुरुषाचें चिदाभासरूप वीर्य, सत्त्वादि तीन गुण आणि काल यांनीं युक्त असें तें महत्तत्त्व भगवंताच्या दृष्टिक्षेत्रांत आल्यावर सृष्टीची उत्पत्ति करण्याच्या इच्छेनें स्वतःचें रूपांतर करूं लागलें ॥ २८ ॥ तसें रूपान्तर होऊं लागलें, तेव्हां त्या महत्तत्त्वापासून अहंकार उत्पन्न झाला. पंचमहाभूतें, दहा इंद्रियें, मन आणि त्या इन्द्रियांच्या देवता, हें त्या अहंकाराचें स्वरूप असल्यामुळें आधिभौतिक स्वरूपी असें कार्य, आधिदैविक असें कारण आणि आध्यात्मिक असा कर्ता यांचा तो आश्रय असतो ॥ २९ ॥ पुढें तो अहंकार सात्विक, राजस आणि तामस असा तीन प्रकारचा होतो. त्यांपैकीं सात्त्विक अहंकार विकृत होऊन त्यापासून मन आणि सत्त्वप्रधान अशा इंद्रियांच्या देवता उत्पन्न होतात व त्यामुळें, शब्द आदिकरून विषयांचा अनुभव येऊं लागतो ॥ ३० ॥ पञ्च ज्ञानेंद्रियें आणि पञ्च कर्मेन्द्रियें हीं राजस अहंकारापासूनच उत्पन्न झालेलीं होत. तामसाहंकारापासून सूक्ष्मभूत जो शब्द त्याची उत्पत्ति झाली. आणि त्या शब्दापासून पुढें त्याला व्यक्त रूप देणारें असें आकाश उत्पन्न झालें ॥३१॥ मग भगवन्तानें आकाशाकडे पाहिल्यावर त्यापासून काल, माया आणि चैतन्यांश यांच्या साहाय्यानें स्पर्श उत्पन्न झाला आणि त्या स्पर्शाचें रूपान्तर करून आकाशानें वायूस उत्पन्न केलें ॥ ३२ ॥ नंतर महाबलाढ्य अशा वायूनें देखील स्वतःचें रूपान्तर करून आकाशाच्या साहाय्यानें सूक्ष्म असें रूप आणि यापासून लोकांच्या दृष्टीला प्रकाशित करणारें तेज उत्पन्न केलें ॥३३॥ ईश्वरानें प्रेरित झालेलें

वायूनें युक्त असें तें तेज नंतर काल, माया आणि चैतन्यांश यांच्या योगानें विकृत होऊन त्यापासून सूक्ष्म असा रस उत्पन्न झाला आणि त्या सूक्ष्मरसापासून स्थूल असें उदक उत्पन्न झालें ॥३४॥ नंतर परमेश्वरानें प्रेरित असें तें उदक तेजाशीं मिळाल्यामुळें काल,माया आणि चैतन्यांश यांच्या साहाय्यानें विकृत होऊन त्यापासून गन्धनामक गुणानें युक्त अशी पृथ्वी उत्पन्न झाली ॥३५॥ हे श्रेष्ठ विदुरा, याप्रमाणें उत्पन्न झालेल्या आकाश आदिकरून भूतां-मध्यें जें जें भूत मागून उत्पन्न झालें, त्या त्यामध्यें त्याच्या पूर्वी उत्पन्न झालेल्या सर्व भूतांचा संबंध असल्यामुळें उत्तरोत्तर एकेक गुण अधिक आहे असें समजतात ÷ ॥३६॥ महत्त-त्वादि देवता म्हणजे विष्णूच्या कलाच होत. त्यांमध्यें काल, माया आणि चैतन्यांश यांचें रूपांतरचांचल्य आणि चेतना हे धर्महि होते; परंतु त्या महत्तत्वादि देवता पृथक् पृथक् वागत असल्यामुळें त्या आपलें उत्पन्न करण्याचें कार्य करण्यास असमर्थ होत्या; म्हणून त्या हात जोडून परमेश्वराला म्हणाल्या ॥ ३७ ॥ हे परमेश्वरा, तुझें चरणकमल शरण आलेल्या प्राण्यांचा ताप दूर करणारें असें जणुं छत्रच आहे. त्याला आम्हीं नमस्कार करितों. योगी लोक तुझ्या चरणकमलाचाच आश्रय करून संसाररूपी मोठ्या दुःखाचा देखील तत्काल निरास करतात ॥ ३८ ॥

हे परमेश्वरा, तूं सृष्टिकर्ता असून षड्गुणैश्वर्यसंपन्न आहेस. तूंच या विश्वाचें नियंत्रण करितोस; ह्या संसारांतील प्राणी आधिदैविक, आधिभौतिक आणि आध्यात्मिक ह्या त्रिविध दुःखानें पीडिलेले असल्यामुळें त्यांना आत्मसुख मिळत नाहीं. यास्तव हे सर्वव्यापका, आम्हीं तुझ्या चरणकमलाच्या छायेचा आश्रय करतों. कारण तुझ्या चरणा-पाशीं ज्ञानाचा संचय आहे ॥ ३९ ॥

( हे भगवन् ) तुझें चरणकमल तीर्थाप्रमाणें पवित्र आहे. भागीरथीचे पाणी सर्व पापांचा नाश करणारें असून ती सर्व नद्यांत श्रेष्ठ आहे; पण ती तुझ्या त्या चरणकमला-पासूनच उत्पन्न झाली. ऋषि एकान्तांत बसून वेदांच्या साह्यानें तुझ्या चरणकमलाचाच मार्ग शोधण्याचा प्रयत्न करितात. कारण तुझें मुख म्हणजे वेदरूपी पक्ष्यांचें आश्रयस्थान होय. परमेश्वरा, अशा तुझ्या त्या चरणांला आम्हीं शरण आलों आहों ॥ ४० ॥

धैर्यशाली पुरुष श्रद्धापूर्वक तुझी श्रवणभक्ति करतात व त्यामुळें त्यांचें मन शुद्ध होतें. अशा शुद्ध झालेल्या अन्तःकरणानें तुझें ध्यान केलें म्हणजे त्यांना प्रबल वैराग्ययुक्त ज्ञान प्राप्त होऊन ते कृतार्थ होतात. अशा तुझ्या चरणकमलाचा महिमा असल्यामुळें त्यास

---

÷ आदिपुरुषापासून महत्तत्त्व, अहंकार, शब्द आदिकरून पंचसूक्ष्मभूतें, आका-शादि पंचमहाभूतें, देवता, मन, कर्मेंद्रियें, ज्ञानेंद्रियें, ही सृष्टि कशी झाली हें पूर्वी द्वितीय स्कंधांत पांचव्या अध्यायांत सांगितलें आहे व त्याच्या स्पष्टीकरणार्थ त्या स्कंधांत सर्गवृक्ष काढून दाखविला आहे, तो पाहावा.

आम्हीं शरण आलों आहों ।। ४१ ।। हे ईश्वरा, विश्वाची उत्पत्ति, पालन आणि संहार हीं कार्ये करण्याकरितांच तूं अवतार घेतोस. तुझ्या चरणकमलाला आम्ही शरण आलों आहों. तुझ्या चरणकमलाचें माहात्म्य असें आहे कीं, जे त्याचें स्मरण करितात त्यांस तूं मोक्ष देतोस ।। ४२ ।।

हें देहरूपी घर आपल्या सर्व परिवारासह नाशिवंत आहे; असें असतांहि 'हें माझें आहे व मीं असा आहे, असा दुराग्रह त्या गृहादिकांच्या ठिकाणीं जे धारण करतात, ते लोक शरीर धारण करून राहणाऱ्या तुझ्या * चरणकमलापासून फार दूर असतात. हे भगवन् , त्या तुझ्या चरणकमलाचें आम्ही भजन करतों ।। ४३ ।। हे परमेश्वरा, तुझी कीर्ति विश्व व्यापून राहिली आहे. तूं जेथें जेथें पाऊल टाकून लीला प्रगट केलीस तें स्थान आपलें वैभवच होय असें तुझे भक्त मानितात; पण सामान्य पुरुषांचीं इन्द्रियें बहिर्मुख होऊन त्यांना विषयांच्या दुमार्गाकडे मनाला ओढून नेलेलें असल्यामुळें, त्यांचें लक्ष तुझ्या भक्तांकडे मुळीं जातच नाहीं ।। ४४ ।।

हे परमेश्वरा, अमृतासारख्या मधुर अशा तुझ्या कथा श्रवण करून जे आपली तुझ्याविषयींची भक्ति दृढ करतात, त्यांचीं अंतःकरणें शुद्ध होऊन वैराग्याचें रहस्य असें जें ज्ञान तें त्यांना प्राप्त होतें, व ते तत्काल तुझ्या वैकुंठस्थानाला प्राप्त होतात ।। ४५ ।। तसेंच दुसरे जे योगी आहेत, तेहि परमात्म्याच्या ठिकाणीं चित्ताची एकाग्रता करून त्या सामर्थ्यानें बलिष्ठ अशा मायेवर विजय मिळवितात आणि शेवटीं तुझ्याच स्थानाला प्राप्त होतात; पण त्या योग्यांना असें करण्यात फार श्रम होतात आणि जे तुझी सेवा करतात त्यांना तसे श्रम पडत नाहींत. ( असा त्या दोन मार्गांमध्यें विशेष आहे ) ।। ४६ ।।

हे आदिपुरुषा, तूं जगाची उत्पत्ति करावी या इच्छेनें सत्त्व, रज आणि तम या तीन गुणांनीं आम्हांस पृथक् पृथक् उत्पन्न केलें. त्यामुळेंच आम्ही विभक्त झालेले आहोंत. याच कारणास्तव आम्हीं तुझे असून सुद्धां तुझ्या क्रीडेचें साधन जें ब्रह्मांड, तें उत्पन्न करून तें तुला आम्ही अर्पण करूं शकत नाहीं ।। ४७ ।। यास्तव हे स्वयंभू परमेश्वरा, आम्ही तुला वेळोवेळीं यथास्थित भोग अर्पण करावा आणि आम्हांलाहि अन्न भक्षण करण्यास मिळावें; तसेंच या जीवांनीं सुद्धां निर्विघ्नपणें तुला व आम्हांला भोग अर्पण करून अन्नाचें सेवन करावें; ( अशी योजना तूं आतां कर ) ।। ४८ ।।

---

* अवतार घेणारा परमेश्वर आणि जीव हे दोघेहि शरीरधारी असले, तरी परमेश्वर देहादिकांच्या व्यवहारांनीं बांधलेला नसतो व जीव बांधलेले असतात; म्हणून परमेश्वराचें चरणकमल विषयासक्त जीवांपासून दूर असतें, असा भाव.

हे देवा, सर्व परिवारासह आम्ही जे देव त्यांचे तूं मूळ कारण असा निर्विकारी पुराणपुरुष आहेस. तूं स्वतः जन्मरहित असतांहि सत्त्व, रज आणि तम हे तीन गुण जन्मादि कर्मे यांचें उत्पत्तिस्थान अशी जी अनादि मायारूप शक्ति, तिच्याठिकाणीं सर्वज्ञ महत्त्वरूप वीर्य तूं स्थापन केलेंस ॥ ४९ ॥ हे विश्वव्यापका, सत्त्वगुणप्रधान अशा आम्हांस ज्या कार्याकरितां तूं उत्पन्न केलेंस, तें तुझें कोणतें कार्य आतां आम्ही करूं तें सांग. हे देवा, आम्हांवर तुझा पूर्ण अनुग्रह आहे. तरी सृष्टि उत्पन्न करण्यासाठीं अवश्य असलेलें तुझें ज्ञान तूं आम्हांला आतां दे ! ॥ ५० ॥

**पांचवा अध्याय समाप्त**

---

# अध्याय ६ वा

मैत्रेयऋषि म्हणाले,—विदुरा, याप्रमाणें एकमेकींपासून भिन्न असल्यामुळें ज्यांचें लोकरचनारूप कार्य बंद पडलेलें होतें अशा आपल्या महत्तत्त्वादि शक्तींची ती स्थिति परमेश्वरानें पाहिली ॥ १ ॥ त्या वेळीं महापराक्रमी अशा परमेश्वरानें कालनामक शक्तिदेवीला धारण करून महत् आदिकरून तेवीस तत्त्वांच्या समुदायांत एकदम प्रवेश केला ॥ २ ॥ त्यांत प्रवेश केल्यावर या षड्गुणैश्वर्यसंपन्न परमेश्वरानें लीन असलेल्या कर्माला जागृत करण्यासाठीं एकमेकांपासून पृथक् असलेल्या त्या तेवीस तत्त्वांच्या समुदायास क्रियारूप शक्तीच्या साहाय्यानें एकत्र जुळविलें ॥ ३ ॥

परमेश्वराच्या क्रियाशक्तीनें त्या तत्त्वांस प्रेरणा केली असतां त्यांचीहि क्रियाशक्ति जागृत झाली व तत्त्वांनीं आपल्या अंशानें विराट्पुरुष उत्पन्न केला ॥ ४ ॥ सृष्टीची उत्पत्ति करणाऱ्या त्या तत्त्वांच्या समूहांत परमेश्वर अंशमात्रानें प्रविष्ट झाल्यावर त्या तत्त्वांत क्षोभ उत्पन्न होऊन तीं एकमेकांशीं संयुक्त झालीं व त्यांचेंच परिणतरूप म्हणजे विराट् पुरुष होय. त्या पुरुषांतच सारी स्थावरजंगम सृष्टि आहे ॥ ५ ॥ विराट्पुरुषाला हिरण्य-गर्भ म्हणतात. तो उत्पन्न झाल्यावर अव्यक्ततत्त्वरूपांत असलेल्या जीवांसहमर्तमान ब्रह्माण्डाच्या मध्यभागीं उदकामध्यें हजार वर्षेपर्यंत राहिला ॥ ६ ॥

खरोखर विश्व उत्पन्न करणाऱ्या तेवीस तत्त्वांपासून निर्माण झालेल्या त्या हिरण्य-गर्भानें ज्ञानशक्ति, क्रियाशक्ति आणि भोक्तृशक्ति यांनीं युक्त होऊन आपण आपले एक दहा आणि तीन असे विभाग केले. ॥७॥ हाच हिरण्यगर्भ सर्व प्राण्यांचा अंतर्यामी नियंता असून परमात्म्याचा अंशरूप आद्य अवतार होय ! त्याच्या शरिरांत सर्व प्राण्यांचा समूह सुरक्षित असतो ॥८॥ हा विराट् पुरुष अध्यात्म, आधिदैव व आधिभूत असा तीन प्रकारचा; प्राण, अपान इत्यादि भेदांनीं दहा प्रकारचा आणि हृदयरूपानें एक प्रकारचा आहे ॥ ९ ॥

मैत्रेयमुनि म्हणतात,—विदुरा, विश्वाची उत्पत्ति करूं लागलेल्या तत्त्वांचा नियामक अशा त्या परमेश्वराला "यावद्बलि" इत्यादि श्लोकांनीं देवतांनीं केलेल्या आपल्या प्रार्थनेचें जेव्हां स्मरण झालें, तेव्हां त्यांची अनेक प्रकारची वृत्ति चालविण्याकरितां त्यानें आपल्या ज्ञानशक्तीनें हिरण्यगर्भाच्या शरिराची अमुक रचना असावी असा विचार केला ॥ १० ॥ असा विचार केल्यावर त्या हिरण्यगर्भाला देवांना राहण्यास योग्य अशीं किती स्थानें उत्पन्न झालीं, तीं मी आतां तुला सांगतों; श्रवण कर ॥ ११ ॥ प्रथम त्या विराट्पुरुषाला मुख उत्पन्न झालें व त्या मुखरूपी स्थानांत अग्निदेवतेनें आपली अंशभूत जी वाणी तिच्यासह प्रवेश केला. त्या वाणीमुळें पुरुषाला भाषण करतां येतें ॥ १२ ॥

मग त्या हिरण्यगर्भाला तालुनामक इन्द्रिय उत्पन्न झालें आणि त्यांत लोकपाल वरुणानें आपलें अंशभूत जें जिव्हेन्द्रिय त्यासह प्रवेश केला. त्या जिव्हेनें जीवांना रसांचें ज्ञान होतें ॥ १३ ॥ नंतर विष्णुरूपी त्या हिरण्यगर्भाला दोन नाकपुड्या उत्पन्न झाल्या व त्यांत अश्विनीकुमारांनीं आपला अंश जें घ्राणेन्द्रिय त्याला घेऊन प्रवेश केला. त्या घ्राणेन्द्रियामुळें जीवाला गंधाचा अनुभव येतो ॥ १४ ॥ पुढें त्या सर्वव्यापक हिरण्यगर्भाला दोन डोळे उत्पन्न झाले व त्यांत लोकरक्षक सूर्यदेवतेनें आपल्या अंशभूत नेत्रेन्द्रियासह प्रवेश केला. त्या नेत्रेन्द्रियाच्या साहाय्यानें जीवांस रूपांचें ज्ञान होतें ॥ १५ ॥

मग हिरण्यगर्भाला चर्म उत्पन्न झालें व त्यामध्यें वायुदेवता आपल्या अंशभूत त्वगिन्द्रियासह जाऊन राहिली. ह्या त्वगिन्द्रियानें जीवाला स्पर्शाचा अनुभव येतो ॥ १६ ॥ नंतर त्या विराट्पुरुषाला कान उत्पन्न झाले; ते दिशानामक देवतांचें स्थान होत; म्हणून त्या आपल्या श्रवणेन्द्रियरूप अंशात्मक शक्तीसह त्यांत शिरल्या. श्रवणेन्द्रियानें जीवाला शब्दांचें ज्ञान होतें ॥ १७ ॥ पुढें विराट्पुरुषाला त्वचा उत्पन्न झाली; ती औषधींचें स्थान होय. म्हणून औषधि त्यांत आपल्या अंशभूत अशा रोमांसह प्रविष्ट झाल्या. त्या रोमांनीं पुरुषाला कंडूचा अनुभव मिळतो ॥ १८ ॥

मग विराट्पुरुषाला शिश्न उत्पन्न झालें. तें प्रजापतीचें स्थान असल्यामुळें प्रजापति तेथें रेतोरूप शक्तीसह येऊन राहिला. त्या रेतोरूप शक्तीनें पुरुषाला अपत्यप्राप्तीचा आनंद होतो ॥ १९ ॥ नंतर विराट्पुरुषाला गुदद्वार उत्पन्न झालें. त्या स्थानीं लोकरक्षक मित्रदेव गुदेन्द्रियरूप शक्तीनें पुरुष मलत्याग करतो ॥ २० ॥ पुढें विराट्पुरुषाला दोन हात उत्पन्न झाले. त्या हातांत स्वर्गाचा राजा असा इंद्र क्रयविक्रय करणाऱ्या शक्तीसह शिरला. त्या क्रयविक्रयरूप शक्तीच्या योगानें पुरुषाला उपजीविकासाधन प्राप्त होतें ॥ २१ ॥

नंतर ह्या विराट्पुरुषाला पाय उत्पन्न झाले व लोकपाल विष्णु गतिरूप आपल्या शक्तीला घेऊन त्यांत शिरला. त्या गतिरूप शक्तीमुळें पुरुषाला जावयाचें असेल तेथें जातां येतें ॥ २२ ॥ मग त्या पुरुषाला हृदय उत्पन्न झालें. तें चंद्रमाचें स्थान असल्यामुळें तो मनोरूपी आपल्या शक्तीसह त्या हृदयांत शिरला. त्या मनोरूप शक्तीनें जीवाच्या संकल्प-विकल्पादि विविध क्रिया घडून येतात ॥ २३ ॥ पुढें विराटाला अहंकार उत्पन्न झाला. अहंकार हें रुद्राचें स्थान होय. त्यामुळें रुद्रदेवता आपल्या अहंकाररूप शक्तीसह तेथें येऊन राहिली. त्या अहंकाररूप शक्तीच्या योगानें पुरुषाला मला अमुक गोष्ट करावयाची आहे, असें ज्ञान होतें ॥ २४ ॥

शेवटीं, त्या विराट्पुरुषाला बुद्धि आणि चित्त हीं उत्पन्न झालीं. तें ब्रह्मदेवाचें स्थान असल्यामुळें ब्रह्मदेव त्यांत आपल्या अंशभूत चेतनाशक्तीसहवर्तमान येऊन राहिला. त्या चेतनाशक्तीमुळें पुरुषाला विशिष्ट प्रकारचें ज्ञान प्राप्त होतें ॥ २५ ॥ त्या विराट्पुरुषाच्या मस्तकापासून स्वर्ग उत्पन्न झाला, पायांपासून पृथ्वी उत्पन्न झाली आणि नाभीपासून

आकाश उत्पन्न झालें. त्या स्वर्ग, पृथ्वी व आकाश यांमध्यें सत्त्व, रज व तम या तीन गुणांपासून झालेले देव, मनुष्यें, भूतें यांचीं तत्त्वें अनुक्रमें दिसून येतात ॥ २६ ॥ सत्त्व गुणाच्या आधिक्यामुळें देवांना स्वर्गाची प्राप्ति झाली. मनुष्यांमध्यें रजोगुणाचें प्राबल्य असल्यामुळें यज्ञादिक क्रिया ते देवघेवीच्या व्यवहारानें करतात, यास्तव ते व त्यांना अनुसरणारे प्राणी पृथ्वीवर राहूं लागले ॥ २७ ॥

तसेंच शंकराचे जे भूत आदिकरून परिवारगण ते तिसऱ्या म्हणजे तमोगुणाच्या आधिक्यामुळें तामस स्वभावाचे झाले आणि म्हणून ते भगवंतांच्या नाभीचा आश्रय करून पृथ्वी व स्वर्ग यांमधील अंतराळांत राहिले ॥ २८ ॥ हे कुरुकुलश्रेष्ठ विदुरा, वेद आणि ब्राह्मण हे विराट्पुरुषाच्या मुखांतून उत्पन्न झाले. ब्राह्मण परमेश्वराच्या मुखांतून निघाल्यामुळें तो चारी वर्णांचा श्रेष्ठ असा गुरु झाला ॥ २९ ॥ विराट्पुरुषाच्या बाहूंपासून क्षात्रवृत्ति व त्या वृत्तीनें राहाणारा क्षत्रियवर्ण हे उत्पन्न झाले. क्षत्रिय हे विष्णूच्या अंशापासून उत्पन्न झाले असल्यामुळें चोर इत्यादिकांपासून होणाऱ्या उपद्रवापासून चारहि वर्णांचें ते संरक्षण करितात ॥ ३० ॥

सर्वव्यापी विराट्पुरुषाच्या मांड्यांतून लोकांच्या उपजीविकेचें साधन असे जे शेतकी इत्यादि धंदे ते उत्पन्न झाले. वैश्य हा त्याच्या मांड्यांपासून उत्पन्न झाला व आपल्या शेतकी, व्यापार इत्यादि साधनांनीं मनुष्यांच्या उपजीविकेचे धान्यादि पदार्थ उत्पन्न करितो ॥ ३१ ॥ धर्ममार्गाची सिद्धि होण्याकरितां त्या विराट्पुरुषाच्या पायांपासून सेवाधर्म उत्पन्न झाला व त्या सेवाधर्माकरितां त्याच्या पायांपासून शूद्रवर्ण उत्पन्न झाला. त्या सेवाधर्मानें परमेश्वर संतुष्ट होतो ॥ ३२ ॥ हे ब्राह्मणादि चारहि वर्ण आपआपल्या उपजीविकेसह ज्या परमेश्वरापासून उत्पन्न झाले, त्या आपल्या गुरुरूप परमेश्वराची ते सर्व लोक आपल्या शुद्धीसाठीं श्रद्धापूर्वक आराधना करितात ॥ ३३ ॥

हे विदुरा, काल, कर्म आणि स्वभाव ह्या ज्या या तीन शक्ति आहेत, त्या परमेश्वराच्या योगमायेच्या सामर्थ्यानें वृद्धिंगत झालेल्या विराट्स्वरूपाचें पूर्णपणें वर्णन करणें शक्य आहे असें निश्चयानें कोण म्हणेल ? ॥ ३४ ॥ तरी सुद्धां हे विदुरा, ईश्वराव्यतिरिक्त विषयांच्या चर्चेनें मलिन झालेल्या माझ्या वाणीला पवित्र करण्याकरितां त्या श्रीहरीची कीर्ति जशी ऐकिली आहे, तशी यथामति वर्णन करितों ॥ ३५ ॥ कारण, पुण्यकीर्ति पुरुषांमध्यें श्रेष्ठ असलेल्या श्रीहरीचे गुण वर्णन करणें हाच मनुष्याच्या वाणीचा मुख्य लाभ होय, आणि विद्वान् लोक त्या अमृतासारख्या कथा गात असतां जवळ जाऊन त्या श्रवण करण्यांत तत्परता दाखविणें हेंच कर्णेंद्रियाचें इतिकर्तव्य होय, असें ज्ञानी पुरुषहि म्हणतात ॥ ३६ ॥

वत्सा विदुरा, आदिकवि ब्रह्मदेवानें हजार वर्षेंपर्यंत योगाभ्यासानें बुद्धि परिपक्व केली व परमात्म्याचा महिमा वर्णन केला; पण त्याला सुद्धां त्याचा अंत लागला

नाहीं ॥३७॥ तात्पर्य, भगवंताची माया मायी लोकांना देखील भुरळ पाडणारी आहे;कारण परमात्मा भगवान् सुद्धां स्वतः आपल्या मायेची शक्ति पूर्णपणें जाणत नाहीं; मग इतरांना तिचें ज्ञान कोठून होणार ? ॥ ३८ ॥ यास्तव मन, वेद, अहंकाराची देवता रुद्र, इंद्रियांचे अधिपति आणि इतर देव, हे ज्या परमेश्वराचें ज्ञान व्हावें म्हणून उद्योगाला लागले; पण शेवटीं तें न झाल्यामुळें तसेच माघारे फिरले, त्या षड्गुणैश्वर्यसंपन्न परमात्म्याला मी नमस्कार करितों ॥ ३९ ॥

**सहावा अध्याय समाप्त**

---

# अध्याय ७ वा

शुकाचार्य म्हणाले—राजा, ज्ञानसंपन्न असा व्यासपुत्र विदुर याप्रमाणें मैत्रेयाचें भाषण ऐकून त्याला प्रश्न करूं लागला व त्या प्रश्नांनीं मैत्रेयाला मोठा आनंद वाटला ॥ १ ॥ विदुर म्हणाला, हे ब्रह्मनिष्ठ मुने, परमात्मा ज्ञानस्वरूप असून निर्गुण आहे. तेव्हां लीलेनें कां होईना, पण सत्त्वादि गुणांचा संबंध त्याला कसा घडतो ? आणि तो स्वतः निर्विकल्प असल्यामुळें त्याच्या हातून सृष्टीची उत्पत्ति, लय इत्यादि क्रिया तरी कशा घडतात ? ॥ २ ॥ लहान बालकाची खेळण्याविषयीं जी प्रवृत्ति होते, तिचें कारण त्याची इच्छा हेंच होय. ही खेळ खेळण्याची इच्छा त्याला दुसऱ्या वस्तूमुळें अथवा दुसऱ्या मुलांच्या संगतीनें होत असते; परंतु परमेश्वर हा तर आत्मज्ञानानेंच तृप्त झालेला व दुसऱ्यापासून नेहमीं निवृत्त असा आहे. तेव्हां त्याच्या ठिकाणीं क्रीडा करण्याची इच्छा तरी उत्पन्न कशी होते ? ॥ ३ ॥

भगवंतानें आपल्या त्रिगुणात्मक मायेच्या योगानें हें विश्व उत्पन्न केलें. त्या मायेच्या योगानेंच तो जगाचें पालन करतो आणि पुनः जगाचा संहारहि त्या मायेनेंच तो करणार ॥ ४ ॥ ( ही तुम्हीं सांगितलेली गोष्ट जर खरी आहे, तर या जीवाला अविद्येचा संबंध घडला पाहिजे, पण तो घडणें शक्य नाहीं ); कारण जीवाचें ज्ञानस्वरूप देशभेदानें, कालभेदानें व अवस्थाभेदानें स्वतःच्या योगानें किंवा दुसऱ्या कोणत्याहि वस्तूमुळें लुप्त होत * नाहीं. ( कारण तो ब्रह्मरूपच आहे ) ; तेव्हां त्यास मायेचा संबंध कसा घडतो ? ॥ ५ ॥ सर्व प्राणिमात्रांच्या शरिरांत षड्गुणैश्वर्यसंपन्न असा एकच ईश्वर

---

* जीव हा ब्रह्मस्वरूप आहे व ब्रह्म सर्वव्यापी, त्रिकालाबाधित, कोणत्याहि कारणानें विकार न पावणारें आणि अद्वितीय असें आहे. त्यामुळें ब्रह्माप्रमाणेंच जीवांच्या ठिकाणींहि स्थानभेद, कालभेद, अवस्थाभेद इत्यादि होणें शक्य नाहीं. असा भाव या शंकेंत गृहीत धरला आहे. या भेदांचीं व्यावहारिक उदाहरणें दिव्याचा प्रकाश, विद्युत् इत्यादि होत. दिव्याचा प्रकाश, स्थानानें मर्यादित असल्यामुळें एका ठिकाणीं तो असेल तर दुसऱ्या ठिकाणीं नसतो. विद्युत् कालानें मर्यादित असल्यामुळें एका क्षणीं असलेली विजेची चमक दुसऱ्या क्षणाला नसते. स्मृति ही अवस्थेनें मर्यादित असते. म्हणून लहानपणाच्या गोष्टी मोठेपणीं आठवत नाहींत, स्वतःच्या योगानें लोप होण्याचें उदाहरण स्वप्नसृष्टीचें. स्वप्नांत दिसणाऱ्या गोष्टी जागृतपणीं आपोआपच नाहींशा होतात. इतर वस्तूंच्या योगें लोप होण्याचें उदाहरण प्रत्येक मर्यादित वस्तूचें. एक वस्तु आहे त्या ठिकाणीं दुसरीचा लोप असतो. घट हा पटांत नाहीं आणि पट घटांत नाहीं; पण या मर्यादा ब्रह्मस्वरूपी जीवाला नसल्यामुळें त्यांच्यांत ह्या भेदांनाहि जागा नसावी असा भावार्थ.

जर भरलेला आहे, तर त्या ( ईश्वरांश असलेल्या ) जीवांना दुःख व कर्मे केलीं असतां क्लेश हीं कां प्राप्त होतात ? ॥ ६ ॥

हे ज्ञानसंपन्न मैत्रेया, ह्या ज्ञानरूपी कठिण मार्गांत माझें मन दुःख पावत आहे. ( त्यांतून त्याला बाहेर काढण्यास तूं समर्थ आहेस ) यास्तव माझ्या मनांत उत्पन्न झालेला हा मोह तूं दूर कर ! ॥ ७ ॥ शुकाचार्य म्हणाले—राजा, विदुराच्या मनांत तत्त्व जाणण्याची उत्कट इच्छा असल्यामुळें त्यानें मैत्रेयाला याप्रमाणें प्रश्न केले. तेव्हां अहंकारापासून सर्वथा मुक्त असलेल्या त्या भगवंताच्या ठिकाणीं आपलें चित्त स्थिर करून त्यानें हंसतच जणूं काय विदुराच्या प्रश्नांचीं उत्तरें देण्यास प्रारंभ केला ॥ ८ ॥

मैत्रेय म्हणाला;—विदुरा, जीव वस्तुतः सर्वस्वीं मुक्त असतांना त्याला बंधन किंवा दुःख होतें असें म्हणणें हें तर्काशीं विरुद्ध आहे खरें; पण तसा प्रत्यय जिच्या योगानें येतो तिलाच षड्गुणैश्वर्यसंपन्न परमेश्वराची माया म्हणतात ॥ ९ ॥

एखादा पुरुष स्वप्नांत आपलें शिर तुटलें, हात तुटले, पाय तुटले असें पाहतो; पण वस्तुतः जसें कांहीं देखील झालेलें नसतें, तसा जीवाला बन्ध किंवा क्लेश होतो ही गोष्ट सुद्धां केवळ आभास होय ॥ १० ॥ ज्याप्रमाणें पाण्यांत चंद्रबिंब पडलें म्हणजे पाणी हालतांच तेंहि हालल्याप्रमाणें वाटतें; पण खरा चंद्र कांहीं हालत नसतो, त्याप्रमाणें देह, इन्द्रियें इत्यादि अनात्मवस्तूंचे धर्म त्यांचा अभिमानी झालेला जो साक्षीभूत जीव त्याचेच जणूं काय आहेत, असें भासतें. वस्तुतः ते त्याचे नसतात ॥ ११ ॥ पण सर्वसंगपरित्याग करून परमेश्वराची कृपा संपादन केली, म्हणजे त्याच्या ठिकाणीं दृढ भक्ति जडते आणि तीमुळें आत्मस्वरूपी जीवावर देहादि अनात्मवस्तूंच्या धर्माचा हा आभास या लोकींहि हळूहळू नष्ट होतो ॥ १२ ॥

विदुरा, परमात्मा साक्षीरूपानें हृदयांत राहून सर्व दुःखें हरण करणारा आहे. त्याच्या ठिकाणीं सर्व इन्द्रियें आपापल्या बाह्य विषयांना सोडून विराम पावलीं म्हणजे निजलेल्या मनुष्याला जसा दुःखांचा अनुभव येत नाहींसा होतो, तसा त्या स्थितींतहि दुःखाचा लय होतो ॥ १३ ॥ श्रीकृष्णाचें गुणकीर्तन किंवा गुणश्रवण सुद्धां संपूर्ण दुःखांना शांत करितें; मग त्याच्या चरणकमलावरील धुळीचें सेवन करावें अशी उत्कृष्ट इच्छा मनांत उत्पन्न झाल्यास, शांति प्राप्त होणार नाहीं असें कसें होईल ? ॥ १४ ॥ मैत्रेयाचें हें उत्तर ऐकून विदुर म्हणाला—हे समर्थ मैत्रेयमुने, तुमच्या या उत्तम भाषणरूप तरवारीनें माझा संशय तुटून नष्ट झाला. आतां ईश्वराला स्वातंत्र्य कां आहे, आणि जीवाला पारतन्त्र्य कसें आहे, या दोहोंविषयींची समजूत माझ्या मनांत चांगली पटली ॥ १५ ॥

हे ज्ञानसंपन्न मैत्रेयमुने, स्वप्नांत दिसणारें शिर तुटणें इत्यादि प्रकार जसे खोटे असतात, तसे जीवाला दुःख होणें, बंधन होणें हे प्रकार देखील आभासरूपच होत. तसेच परमेश्वराच्या मायेमुळेंच जगाची उत्पत्ति, स्थिति व लय इत्यादि प्रकार, त्यांना वास्तविक

कांहीं आधार नसतांहि, भासमान होतात; पण विश्वाचें मूळ असें या मायेच्या बाहेर कांहींच नाहीं; असें हें आपण सर्व कांहीं चांगल्या रीतीनें समजावून दिलें आहे ॥ १६ ॥ मुने, जगांत तीन प्रकारचे लोक दिसत असतात. त्यांपैकीं जे अत्यंत मूर्ख आहेत किंवा उलट जे ज्ञानाच्या सीमेला पोंचलेले आहेत, अशांनाच मात्र सुखाचा आस्वाद घेतां येतो. पण या दोहोंमधला तिसरा जो अर्धवटांचा वर्ग तो नेहमीं दुःखाचाच वांटेकरी असतो. ॥ १७ ॥ मैत्रेया, हा देहादि प्रपंच आत्मस्वरूपी नाहीं यास्तव त्याचा अनुभव जरी येतो, तरी तो खोटा आहे, ही गोष्ट तुमच्या चरणसेवेनें मला समजून आली आहे. आतां तो अनुभव मी दूर सारिल्याशिवाय कसा राहीन ? ॥ १८ ॥

मुने, तुमच्यासारख्या साधूंची सेवा केल्यानें निर्विकार अशा भगवान् मधुसूदनाच्या पायीं अत्यंत उत्कट असें प्रेम जडतें व त्यामुळें सर्व संकटांचा परिहार होतो ॥ १९ ॥ पण ज्यांनीं फारशी तपश्चर्या केली नाहीं, त्यांना साधुसेवा तरी कशी घडणार ? ती घडणें त्यांना कठीणच असतें. साधु जन वैकुंठाचा मार्ग दाखवितात आणि देवांचाहि देव असा जो सर्वांचा अंतर्यामी भगवान्, त्याची कीर्ति सतत गात असतात ॥२०॥ प्रथम परमेश्वरानें महत्तत्त्व, अहंकार आणि त्यांचीं विकारभूत इन्द्रियें व देवता, इत्यादि उत्पन्न केलीं. तसेंच पुढें त्यांच्यापासून विराट्पुरुषाला उत्पन्न करून भगवान् स्वतः त्या विराट् स्वरूपांत प्रविष्ट झाला ॥ २१ ॥

हजारों पाय, मांड्या व हात असलेल्या अशा त्या विराट्पुरुषाला वेद आदिपुरुष असें म्हणतात. त्याच्या ठिकाणीं सर्व लोक आपल्या परिवारासह राहिले आहेत ॥ २२ ॥ इन्द्रियें, त्यांचे विषय आणि त्यांच्या देवता या तीन वृत्तींसह दहा प्रकारचा प्राण त्या विराट्पुरुषाच्या ठिकाणीं आहे व त्या विराट्पुरुषापासून ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र असे चार वर्ण उत्पन्न झाले, असें तुम्हीं सांगितलें. आतां त्या विराट्पुरुषाच्या, ब्रह्मदेव आदिकरून आणखी कोणकोणत्या विभूति आहेत तें मला सांगा ॥ २३ ॥ त्या विभूतींच्या ठिकाणीं पुत्र, नातु, पणतु आणि दुसरे गोत्रज इत्यादि भेदांनीं निरनिराळीं स्वरूपें धारण करणाऱ्या प्रजा उत्पन्न झाल्या आणि त्यांच्या योगानें जगाचा विस्तार होत गेला ॥ २४ ॥

सर्व प्रजापतींचा स्वामी जो ब्रह्मदेव त्यानें मग कोणते प्रजापति निर्माण केले, प्रथम कोणती सृष्टि केली, मागाहून तिचे कोणते भाग उत्पन्न केले, तसेंच मन्वंतरांचे राजे असे कोणते मनु उत्पन्न केले, तें सर्व मला सांगा ॥ २५ ॥ तसेंच त्या राजांचे वंश व त्या वंशांतील पुरुषांचीं चरित्रेंहि सांगा. मैत्रेयमुने, या भूलोकाच्या वर व खालीं जे लोक आहेत, त्यांची व भूलोकाची रचना कशी आहे, आणि त्यांच्या विस्ताराचें प्रमाण कसें आहे, त्याचेंहि वर्णन करा ॥ २६ ॥ तसेंच पशु, मनुष्यें, देव, सर्प व पक्षी इत्यादि प्राणी व गर्भज, स्वेदज, द्विज व उद्भिज्ज या प्राणिकोटी यांची कशीकशी उत्पत्ति झाली, तेंहि सांगा ॥ २७ ॥

मुने, तो भगवान् लक्ष्मीचें निवासस्थान आहे. तो सत्त्व, रज आणि तम या गुणांच्या योगानें ब्रह्मा, विष्णु, शंकर इत्यादि अवतार घेऊन सृष्टीची उत्पत्ति, स्थिति व संहार करतो आणि त्यांचा आश्रयहि उत्पन्न करतो. अशा त्या नारायणाचे उत्कृष्ट पराक्रम मला सांगा ॥ २८ ॥ तसेंच ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र हे चार वर्ण व ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ आणि संन्यास हे चार आश्रम, यांचीं बाह्य चिन्हें कोणतीं, त्यांचे आचार कसे असतात व त्यांच्या स्वभावांत कसे भेद असतात, आणि ऋषींची उत्पत्ति कशी झाली व त्यांनीं कोणतीं कृत्यें केलीं, तसेंच वेदाचे विभाग कसे झाले? ॥ २९ ॥ हे प्रभो मैत्रेया, यज्ञाचे निरनिराळे प्रकार कोणते किंवा योगाचे मार्ग कसे आहेत, कर्मत्यागाचा उपदेश करणाऱ्या सांख्यशास्त्राचें मत काय आहे व भगवंतानें सांगितलेला भक्तिमार्ग कसा आहे, या सर्व गोष्टी मला समजावून सांगा ॥ ३० ॥

हे मैत्रेयमुने, वेदविरुद्ध जो पाखण्डमार्ग त्याकडे होणारी प्रवृत्ति कशी होते, सृष्टीच्या उपक्रमाच्या उलट सर्वांचा पुनः आपापल्या कारणामध्यें लय कसा होतो? गुण आणि कर्में या दोहोंमुळें जीवाला कोणत्या व किती गति प्राप्त होतात? ॥ ३१ ॥ धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष या चार पुरुषार्थांचे उपाय कोणते? त्यांचें कोणत्या रीतीनें आचरण केलें असतां एकाचा उपाय दुसऱ्याच्या प्राप्तीस अपाय करणार नाहीं, तसेंच उपजीविकेचीं साधनें, राजनीति आणि शास्त्राभ्यास, यांचे निरनिराळे प्रकार किती आहेत? ॥ ३२ ॥ हे ब्रह्मज्ञानसंपन्न मैत्रेया, श्राद्धाचा विधि कसा असतो? पितरांची उत्पत्ति कशी होते? तसेंच ग्रह, नक्षत्रें आणि तारा यांची कालचक्रांत रचना कशी केलेली आहे? या सर्व गोष्टी आम्हांला आपण सांगाव्या ॥ ३३ ॥

दान, तप, यज्ञयागादि वैदिक कर्में आणि धर्मशाळा. तलाव इत्यादि लौकिक कृत्यें यांचें फल काय? प्रवासी लोकांनीं कोणते धर्म पाळावे व संकटांत सांपडलेल्या लोकांनीं कोणते पाळावे? ॥ ३४ ॥ हे निष्पाप मैत्रेया, ईश्वरच धर्माचा उत्पादक होय. यास्तव तो कोणत्या आचरणानें संतुष्ट होईल, तसाच तो कोणावर प्रसन्न होतो, हें सर्व ज्ञान मला सांगा ॥ ३५ ॥ हे ब्राह्मणश्रेष्ठा, तुमच्यासारखे जे दीनांवर दया करणारे गुरु आहेत ते, आपले शिष्य आणि पुत्र आपल्या आज्ञेला अनुसरून वागत असतील तर, त्यांनीं न विचारतां देखील त्यांच्या कल्याणाच्या गोष्टी त्यांना सांगत असतात ॥ ३६ ॥

हे भगवन् मैत्रेयमुने, तत्त्वांचा लय किती प्रकारांनीं होतो? प्रलयकाळीं भगवंताची सेवा कोण करीत असतात? आणि भगवान् योगनिद्रा घेत असतां त्याच्या स्वरूपांत कोण लीन होत असतात? ॥३७॥ जीवाची शरीररचना व स्वरूप हीं कशीं आहेत? तशींच परमेश्वराचींहि कशीं आहेत? (हें कळल्यानें त्या दोघांचें ऐक्य कसें घडतें हें समजेल.) तसेंच गुरुशिष्यसंबन्धानें प्राप्त होणारें उपनिषदांतील ज्ञान कोणत्या प्रकारचें आहे? ॥ ३८ ॥ या मृत्युलोकांत विद्वानांनीं त्या ज्ञानाचीं साधनें कोणतीं सांगितलीं आहेत? कारण हे निष्पाप मैत्रेयमुने, हें ज्ञान, भक्ति किंवा वैराग्य हीं मनुष्यांना आपो-आप प्राप्त होणें शक्य नाहीं ॥ ३९ ॥

मैत्रेयमुने, मला मायेनें ग्रासलें आहे, त्यामुळें क्षणोक्षणीं मला मोह उत्पन्न होतो. तूं माझा मित्र आहेस. तर माझ्यावर स्नेहभाव ठेवून श्रीहरीच्या लीला जाणण्याच्या इच्छेनें मीं जे प्रश्न केले आहेत, त्यांचें योग्य उत्तर देऊन माझें समाधान कर ! ॥ ४० ॥ हे निष्पाप मैत्रेयमुने, ( मला आपण अभयदान द्या. ) सर्व वेदांचें अध्ययन, अनेक यज्ञांचें अनुष्ठान, तीव्र तप किंवा पुष्कळ दानें हीं जरी केलीं, तरी त्यामुळें होणाऱ्या पुण्यप्राप्तीला प्राण्यांना अभदान दिल्यानें जोडणाऱ्या पुण्याच्या अंशाचीहि सर येणार नाहीं * ॥ ४१ ॥ शुकाचार्य म्हणाले—राजा, याप्रमाणें पुराणांतील विषयांचें ज्ञान व्हावें म्हणून कुरुकुलश्रेष्ठ अशा विदुरानें प्रश्न केले असतां, श्रीहरीच्या लीला ऐकण्याविषयींची त्याची मोठी इच्छा आहे असें जाणून मैत्रेयऋषीचा आनंद दुणावला आणि त्यानें विदुराच्या प्रश्नांचीं उत्तरें देण्यास प्रारंभ केला ॥ ४२ ॥

---

* द्वितीय स्कंधाच्या ८ व्या अध्यायांत परीक्षित्‌राजानें शुकाचार्यांना जे अनेक प्रश्न केले, तशाच प्रकारचे हे विदुरानें मैत्रेयाला विचारलेले प्रश्न आहेत.

### सातवा अध्याय समाप्त

---

# अध्याय ८ वा

मैत्रेयमुनि म्हणाले—विदुरा, खरोखर पुरुराजाचा वंश साधूंना देखील पूज्य आहे. कारण त्याच्या वंशांत लोकपाल यमराजाचा अवतार जो तूं, त्या तुझा जन्म झाला. तूं परमेश्वराचा अनन्यभक्त आहेस आणि भगवंताच्या चरित्राविषयीं प्रश्न करून त्याच्या कीर्तिरूपी मालेला क्षणोक्षणीं व पावलोपावलीं नवीनवी टवटवी आणीत आहेस ।। १ ।। विदुरा, या संसारांतील क्षुद्र सुखाकरितां प्रयत्न करीत असतां सुख मिळणें बाजूला राहून मनुष्यें मोटमोठ्या दुःखांत मात्र सांपडतात, हें पाहून त्यांचीं दुःखें दूर होण्याकरितां मीं भागवत नांवाचें पुराण सांगण्यास आतां आरंभ करितों. पूर्वीं हें भागवतपुराण प्रत्यक्ष भगवान् शेष'नें सनत्कुमारादि ऋषींना सांगितलें होतें ।। २ ।।

त्या भगवान् आदिदेव अशा शेषाला संकर्षण असेंहि म्हणतात. त्याचें ज्ञान अकुंठित आहे. एकदां तो शेष पातालाच्या तळीं बसला असतां, त्याच्याहूनहि श्रेष्ठ अशा परमात्म्याचें यथार्थ स्वरूप कळावें या हेतूनें सनत्कुमारप्रभृति ऋषींनीं त्याला प्रश्न केला ।। ३ ।। आपला स्वतःचा आश्रय असा जो भगवान् वासुदेव त्याला शेष फारच पूज्य मानीत असल्यामुळें तो आपले नेत्र अंतर्मुख करून भगवंताचें ध्यान करीत होता; पण सनत्कुमारांचा प्रश्न ऐकून त्या ज्ञानी ऋषींचा अभ्युदय व्हावा म्हणून त्यानें आपल्या नेत्ररूपी कमलांच्या कळया किंचित् उघडल्या ।। ४ ।।

भगवान् शेषाचे पाय ठेवण्याचें स्थान म्हणजे एक कमळ होतें. मोठमोठ्या नागांच्या कन्या आपणांस अनुरूप पति मिळावा या इच्छेनें अनेक प्रकारच्या उपहारांनीं प्रेमपूर्वक त्या कमळाची पूजा करीत असत. सनत्कुमारप्रभृति ऋषींनीं जवळ आल्यावर गंगेच्या पाण्यानें भिजलेल्या आपल्या जटामंडित मस्तकांनीं त्या कमळाला स्पर्श केला ( आणि भगवान् शेषाला वंदन केलें ) ।। ५ ।। ते ऋषि शेषाचें सामर्थ्य पूर्णपणें जाणत असल्यामुळें त्याचीं चरित्रें ते गाऊं लागले. तीं वर्णन करतांना प्रेमाच्या भरानें त्यांचा कंठ सद्गदित झाला व त्यामुळें त्यांच्या तोंडांतून येणारे शब्द अडखळूं लागले. विदुरा, त्या नागराजाचें वर्णन किती करावें ? त्याच्या हजार मस्तकांवर हजार मुकुट होते व त्यांत उत्तमोत्तम रत्नें जडविलेलीं असल्यामुळें त्यांच्या कान्तीनें त्याच्या उभारलेल्या हजार फणा चमकत होत्या. ( अशा त्या भगवान् शेषाला सनत्कुमारऋषीनें प्रश्न केला ) ।। ६ ।।

विदुरा, त्या वेळीं त्या सर्वश्रेष्ठ भगवान् शेषानें हें भागवत निवृत्तिधर्मांत आसक्त असलेल्या सनत्कुमारास सांगितलें. पुढें व्रतनिष्ठ अशा सांख्यायनमुनीनें तें आपल्याला सांगावें अशी सनत्कुमाराला विनंति केली असतां, त्यानें तें सांख्यायनाला सांगितलें ।। ७ ।। सांख्यायन हा परमहंसाच्या धर्मांत निष्णात होता आणि त्याला भगवंताच्या अवतारलीला

वर्णन करण्याची आवड होती. म्हणून त्यानें आपल्या मनाप्रमाणें आचरण करणारे आमचे गुरु जे पराशरमुनि व बृहस्पति या दोघांस तें भागवत नंतर सांगितलें ॥ ८ ॥

विदुरा, पराशरमुनींना पुलस्त्यऋषीनें 'तूं मोठा पुराणवक्ता होशील' असा वर दिलेला होता. ते दयाळू असल्यामुळें त्यांनीं मला हें सर्वश्रेष्ठ असें भागवतपुराण सांगितलें तेंच तुला मी आतां सांगतों; कारण तूं श्रद्धावान् आहेस आणि व्रतानुष्ठानासंबंधानें तुझी आस्थाहि नित्य दिसून येते ॥ ९ ॥ परमेश्वराची चैतन्यशक्ति केव्हांहि मावळत नाहीं; पण आत्मप्रेमांत एकट्यानेंच रममाण होणाऱ्या त्या निरिच्छ परमेश्वरानें शेषरूपी शय्येवर निजून योगनिद्रेनें जेव्हां डोळे मिटून घेतले, तेव्हां हें सर्व विश्व उदकांत बुडालेलें होतें ॥ १० ॥ अग्नि बाहेरून दिसत नसला तरी, त्याची दाहकशक्ति लांकडांत गुप्तरूपानें असतेच. त्याप्रमाणें प्रलयकाळीं परमेश्वरानें सूक्ष्म भूतें आपल्या शरिरांत लीन करून ठेवलीं आणि कालशक्तीला जागृत ठेवून तो आपल्या जलरूपी स्थानावर स्वस्थ पडून राहिला ॥ ११ ॥ विदुरा, याप्रमाणें परमेश्वर आपल्या जलशय्येवर झोंपी गेला असतां हजार युगचौकड्यांचा काल निघून गेला. तेव्हां पूर्वी प्रेरणा केल्याप्रमाणें नित्य जागृत असलेल्या त्याच्या कालशक्तीनें त्यास जागृत केलें आणि (पुनः सृष्टि करावी म्हणून) अदृष्टरूपी कर्मसामग्री त्याच्या पुढें दाखवून दिली. तिचा स्वीकार करून तो पाहतो, तों आपल्या शरिरांत सर्व लोक लीन आहेत असें त्याला दिसलें ॥ १२ ॥ त्या वेळीं परमेश्वराला सृष्टि उत्पन्न करावी अशी इच्छा झाली व त्यानें आपल्या शरिरांत बीजरूपानें लीन असलेल्या शब्द, स्पर्श इत्यादि सूक्ष्म भूतांना पाहिलें. तेव्हां सृष्टि उत्पन्न करण्यास अनुकूल असा काल व त्याला अनुकूल असा रजोगुण या दोघांनीं त्या सूक्ष्म भूतांमध्यें चलन उत्पन्न केलें व त्यामुळें तीं सूक्ष्मभूतें परमेश्वराच्या नाभिप्रदेशांतून बाहेर पडलीं ॥ १३ ॥ तीं सूक्ष्मभूतें कमळाच्या कळ्यांच्या रूपानें एकाएकीं वर आलीं. कारण प्राण्यांच्या अदृष्टरूपी कर्माला जागृत करणाऱ्या काळानें त्यांस प्रेरणा केली होती. तीं वर आलीं तेव्हां सूर्य जसा आपल्या तेजानें सर्व जग प्रकाशित करतो, तसा त्या कमलकोशाच्या तेजानें तो अफाट उदकप्रदेश प्रकाशित झाला. ॥ १४ ॥ मैत्रेयमुनि म्हणतात—विदुरा, सर्व प्राण्यांना भोग्य पदार्थ निर्माण करून देणाऱ्या अशा त्या लोकरूपी कमळांत स्वतः विष्णूनें अंतर्यामिरूपानें प्रवेश केला, तेव्हां त्यांतून, ज्याला स्वयंभू असें म्हणतात, तो प्रत्यक्ष वेदमूर्ति असा ब्रह्मदेव उत्पन्न झाला॥१५॥ तो ब्रह्मदेव त्या कमळाच्या गाभ्यांत बसून पाहूं लागला; पण कोणतेच लोक त्याला दिसले नाहींत. तेव्हां त्यानें प्रदक्षिणा करून आकाशांत चोंहींकडे डोळे फिरवून पाहिलें, तोंच त्याला चार दिशांकडे चार मुखें प्राप्त झालीं ॥ १६ ॥

विदुरा, त्या वेळीं प्रलयकाळाच्या वाऱ्यानें तें पाणी उसळत असून त्यावर हजारों तरंग उठत होते. अशा त्या क्षुब्ध झालेल्या उदकांत उगवलेल्या कमळावर तो आदिदेव ब्रह्मा बसला असतां लोकरचना कशी असते याची, किंबहुना आपण स्वतः कोण आहों याचीहि कल्पना त्याला होईना ॥ १७ ॥ तेव्हां तो मनांत विचार करून म्हणाला, 'जो

हा मी कमळपृष्ठावर बसलों आहें तो कोण ? हें एकटेंच कमल येथें आलें कोठून ? हें कमल ज्याच्यावर राहिलें आहे, ती खरोखर कांहीं तरी खरी वस्तु आधारभूत असली पाहिजे. ॥ १८ ॥ असा विचार करून तो ब्रह्मदेव त्या कमलाच्या देंठाच्या छिद्रांतून पाण्यांत शिरला आणि त्याच्या भक्कम देंठाला आधार काय आहे, याचा शोध करीत खालीं गेला; परंतु त्याला तो शोध कांहीं लागला नाहीं ॥ १९ ॥ तेव्हां त्या ब्रह्मदेवाला अपरंपार मोहांत सांपडल्यासारखें झालें व आपला उत्पन्नकर्ता कोण, याचाच शोध तो करूं लागला. विदुरा, हा त्याचा शोध चालला असतां फारच मोठा काळ निघून गेला. काळ हा ईश्वराचें एक शस्त्रच आहे; कारण त्याच्या योगानें जीवांस भय उत्पन्न होऊन त्यांचें आयुष्य क्षीण होत जातें ॥ २० ॥ इतक्या काळानंतर देखील आपल्या जनकाचा शोध ब्रह्मदेवाला न लागल्यामुळें तो तेथून परत फिरून आपल्या कमळासनावर येऊन बसला. तेथें त्यानें हळूहळू प्राणांचा निरोध करून आपलें चित्तच अन्तर्मुख केलें आणि समाधि लावून तो तप करीत बसला ॥ २१ ॥ अशा स्थितींत शंभर वर्षे निघून गेलीं आणि त्याचा समाधियोग पूर्ण होऊन त्यास ज्ञान उत्पन्न झालें. तेव्हां पूर्वी शोध करून सुद्धां जें दिसलें नव्हतें, तें आतां अपोआप स्वतःच्या हृदयांतच प्रकाशित झालेलें त्याला दिसूं लागलें ॥ २२ ॥

हे विदुरा, युगान्तकालीन उदकामध्यें कमळतंतूप्रमाणें शुभ्रवर्ण आणि विस्तृत अशा शेषाच्या शरिराची शय्या करून त्यावर एकट्याच पुरुषानें शयन केलें आहे, असें त्या ब्रह्मदेवानें पाहिलें. त्या पुरुषाच्या मस्तकावर शेषाच्या फणांचीं छत्रें उभारलीं असून मुकुटावरील रत्नांनीं त्या प्रलयकलीन उदकांतील अंधकार नष्ट करून त्याला प्रकाशित केलें होतें ॥ २३ ॥ त्या पुरुषानें रत्नें, वनमाळा इत्यादि धारण केलीं होतीं व त्यामुळें संध्याकालीन अभ्रांनीं वेष्टिलेला, विस्तृत अशा सुवर्ण शिखरांनीं मंडित आणि रत्नें, जलधारा, वनस्पति व पुष्पांनीं भरलेल्या वृक्षांच्या रांगा ज्याच्यावर आहेत आणि वेळू हे ज्याचे बाहु व इतर वृक्ष हे ज्याचे पाय, अशा पाचूच्या पर्वताची शोभा देखील त्याच्या शोभेपुढें तुच्छ वाटत होती ॥ २४ ॥

हे विदुरा, त्या भगवंताच्या देहांत स्वर्ग, मृत्यु व पाताळ हे तिन्ही लोक समाविष्ट झाले होते. त्याच्या लांबीचें व रुंदीचें प्रमाणहि सुंदर व निरुपम होतें. त्यानें जीं विचित्र व तेजस्वी वस्त्रें आणि भूषणें देहावर धारण केलीं होतीं, (त्यांनीं त्याच्या देहाला शोभा येण्याऐवजी) त्यांनाच त्या शरिरामुळें शोभा आली होती ॥ २५ ॥ त्याचें चरणकमल सर्व इच्छा परिपूर्ण करणारें आहे, म्हणून आपल्या इच्छा पूर्ण व्हाव्या यास्तव जे लोक एकांतवासांत मार्ग स्वीकारून त्याचें पूजन करीत होते, त्यांना तो भगवान् तें आपलें चरणकमळ कृपा करून दाखवीत होता. चंद्रासारख्या नखांच्या तेजानें खुलून दिसणारीं त्याचीं बोटेंहि जणु काय त्या चरणकमळाचीं रमणीय पानेंच असें भासत होतें ॥ २६ ॥ त्याच्या मुखावर लोकांची पीडा दूर करणारें मंदहास्य झळकत होतें, तसेंच तेजस्वी कुण्डलांनीं तें सुशोभित झालें असून बिंबफलासारखा अधरोष्ठाच्या प्रभेनें तें आरक्त वर्ण दिसत होतें. त्याची नासिका आणि भुवया याही सुंदर होत्या. अशा त्या मुखानें तो पुरुष आपल्या भक्तांचा प्रतिसत्कार

करीत होता ॥ २७ ॥ हे विदुरा, त्याच्या कमरेंत कमरपट्टा आणि कदंबवृक्षाच्या फुलांतील केसाप्रमाणें पिंगट वर्णाचें वस्त्र होतें. तसेंच त्याच्या वक्षःस्थलावर श्रीवत्सनामक चिन्ह असून त्यावर शोभादायक असा अतिमोलाचा हार धारण केलेला होता व या अलंकारामुळें तो फारच शोभत होता ॥ २८ ॥

हे विदुरा, त्या परमेश्वराचा देह म्हणजे सर्व विश्वाचा समावेश करणारा असा चंदनवृक्षच जणूं काय होता. बहुमोल बाहुभूषणें व श्रेष्ठ रत्नें यांनीं भरलेले त्याचे बाहु हेच त्या वृक्षाच्या फलें व पुष्पें यांनीं भरलेल्या अनंत शाखा होत्या. ज्याप्रमाणें त्या वृक्षाचें मूळ स्पष्ट दिसत नाहीं, त्याप्रमाणें त्या पुरुषाचें मूळ, जें ब्रह्म तेंहि अव्यक्तच आहे. शेषाच्या फणांनीं वेष्टिलेले त्याचे स्कंध म्हणजे त्या वृक्षाच्या मोठमोठ्या सर्पांनीं वेष्टिलेल्या खांद्याच होत्या ॥ २९ ॥ स्थावर व जंगम अशा विश्वाचा आधार असलेला तो भगवान् म्हणजे पर्वतहि समजावा. पर्वताप्रमाणें तोहि मोठ्या सर्पाचें आवडीचें स्थान आहे. मैनाकपर्वताप्रमाणें तोहि पाण्यानें वेष्टित होता. त्याच्या मस्तकावरील अनंत मुकुट हींच त्या पर्वताचीं अनेक सुवर्णशिखरें होतीं व त्याच्या वक्षःस्थलावरील कौस्तुभमणि म्हणजे त्या पर्वताच्या अंतर्भागांतील रत्नसमूह होता ॥ ३० ॥

सर्व संकटें हरण करणाऱ्या त्या आदिपुरुषाच्या कंठांत, मूर्तिमंत कीर्तिच अशी वनमाळा झळकत होती व वेदरूपी भ्रमरांनीं तिला सुशोभित केलें होतें. सूर्य, चंद्र, वायु आणि अग्नि यांनाहि त्याचें ज्ञान होणें शक्य नव्हतें. तसेंच तिन्ही लोकांत चमकणारीं व सभोंवतीं सतत फिरत राहणारीं जीं सुदर्शनादि आयुधें यांच्या योगानें तो अजिंक्य झाला होता ॥ ३१ ॥ हे विदुरा, अशा त्या ईश्वराचें दर्शन झाल्याबरोबर जगाची उत्पत्ति करणाऱ्या त्या ब्रह्मदेवाला नारायणाच्या नाभिरूपी सरोवरांतून उत्पन्न झालेलें कमळ, त्यांत असलेले आपण स्वतः, सभोंवतीं असलेलें उदक, तसेंच वायु आणि आकाश हीं दिसूं लागलीं; पण यापेक्षां अधिक मात्र कांहीं त्याला दिसलें नाहीं ॥ ३२ ॥

या पांचच वस्तु आपल्या सृष्टिरचनारूप कार्याचें मूळ साहित्य होत, असें पाहून, सृष्टिकर्माला आरंभ करण्याची इच्छा करणारा तो रजोगुणविशिष्ट ब्रह्मदेव उत्पत्तिकार्याविषयीं तत्पर झाला आणि ज्याची गति कोणाला कळत नाहीं, अशा त्या स्तवनास योग्य असलेल्या परमेश्वराच्या ठिकाणीं चित्त स्थिर करून त्याचें स्तवन करूं लागला ॥ ३३ ॥

## आठवा अध्याय समाप्त

# अध्याय ९ वा

ब्रह्मदेव म्हणाला—हे परमेश्वरा, मीं तुझी पुष्कळ काळपर्यंत उपासना केली, त्यामुळें आज मला तुझें ज्ञान झालेलें आहे. हे भगवन्, तुझें स्वरूप मनुष्यें जाणत नाहींत, हा त्यांचाच दोष आहे. तुझ्यावांचून दुसरी सत्य वस्तु नाहींच. एखादी वस्तु तशी भासत असली तरी ती खरी नाहीं. कारण प्रकृतीच्या सत्त्व आदिकरून गुणांच्या तारतम्यामुळें तूंच अनेक रूपांनीं प्रकट झालेला आहेस ॥ १ ॥ देवा, तुझ्या ठिकाणीं ज्ञानशक्ति सदैव जागृत असते. त्यामुळें अज्ञान तुझ्यापासून दूर असतें. सृष्टीच्या आरंभीं तूं आपल्या भक्तांवर अनुग्रह करण्याकरितां हें रूप प्रगट केलेंस. हें जें तुझें रूप आहे तें शेंकडों अवतारांचें मूलकारण आहे आणि मीही त्याच रूपाच्या नाभिकमलरूप आश्रयापासून उत्पन्न झालों ॥ २ ॥

हे परमेश्वरा, तुझें हें स्वरूप स्पष्ट प्रकाशमान असून भेदरहित व आनन्दमय असें आहे. या स्वरूपाहून निराळें असें तुझें स्वरूप मला दिसतच नाहीं. म्हणून मी ह्या तुझ्या एका स्वरूपाचा आश्रय केला आहे. हें तुझें स्वरूप पंचभूतें व इंद्रियें यांचें मूळ कारण असून तें सर्व सृष्टीला उत्पन्न करितें आणि तीपासून अलिप्तहि राहतें ॥ ३ ॥ हे त्रैलोक्यमंगला, तुझी आम्ही उपासना करतों, म्हणून तूं आमच्या कल्याणाकरितां हें आपलें स्वरूप आम्हांला ध्यानामध्यें दाखविलेंस. जे लोक निरीश्वरवादप्रभृति कुतर्कांच्या चर्चेनें तुझी अवहेलना करतात, त्यांना नरक भोगावा लागतो. परमेश्वरा, तुला आम्हीं सेवकभावानें नमस्कार करितों ॥ ४ ॥

परमेश्वरा, वाऱ्यानें वाहून आणलेल्या कमलकलिकेच्या सुगन्धाप्रमाणें वेदांनीं गाइलेल्या तुझ्या कथा जे कोणी तुझे भक्त आपल्या कर्णरंध्रांनीं ऐकतात, त्यांच्या हृदयकमलांतून तूं कधीं दूर होत नाहींस. कारण, आपल्या दृढ भक्तीनें ते तुझे पाय घट्ट धरून ठेवितात ॥ ५ ॥ जोंपर्यंत निर्भय अशा तुझ्या चरणांचा आश्रय लोक करीत नाहींत, तोंपर्यंतच त्यांना द्रव्य, घर व आप्त यांच्यामुळें भीति, शोक, इच्छा, अनादर व अतिलोभ हे होत असतात आणि तोंपर्यंत सर्व दुःखांचें मूळ कारण असलेला 'अमुक हें माझें' असा खोटा अभिमान उत्पन्न होत असतो ॥ ६ ॥

देवा, मन्दबुद्धि लोक लोभानें आपलीं अंतःकरणें खिन्न करून घेतात आणि विषयसुखाच्या स्वल्प प्राप्तीकरितां स्वर्गादि सुख देणारीं काम्य कर्में निरंतर करितात. अशा लोकांची बुद्धि दुर्दैवानें नष्ट झालेली असते, म्हणूनच सर्व संकटांतून दूर करणाऱ्या अशा त्या तुझ्या कथा त्यांपासून ते आपलीं इन्द्रियें पराङ्मुख करतात ॥ ७ ॥ परमेश्वरा, भूक,

तहान, कफ, वात, पित्त, तसेंच थंडी, वारा, ऊन्ह आणि पाऊस यांपासून तसेंच एक-मेकांपासून लोकांना फार दुःख होतें. शिवाय अत्यन्त दुःसह असा कामरूप अग्नि व क्रोध हे दोघे त्यांना वारंवार पीडा देतात. हें पाहून माझ्या मनाला वाईट वाटतें ॥ ८ ॥

हे परमेश्वरा, इन्द्रियें व त्यांचे विषय हीं तुझ्या मायेचीं स्वरूपें आहेत. तिच्याच सामर्थ्यानें हें जग भरलेलें आहे. असें हें जग तुझ्याहून भिन्न आहे असें जोंपर्यंत लोक मानून चालतील, तोंपर्यंत कर्माचें फल देणारा व दुःखानें भरलेला असा हा संसार वस्तुतः खोटा असला तरी त्यांतून ते निवृत्त होणार नाहींत ॥ ९ ॥ देवा, ऋषिसुद्धां जर ह्या संसारांत तुझ्या कथांचें श्रवण, मनन इत्यादि विषयांपासून विमुख होतील, तर त्यांनाहि हा संसार सुटणार नाहीं, कारण दिवसा ते द्रव्यसंपादन करण्याविषयीं गुंतले असल्यामुळें त्यांचीं इंद्रियें दुर्बल होतात, आणि ते रात्रीं झोंप घेत पडतात व मनांत एकसारखे द्रव्या-र्जनाचे विचार चालल्यामुळें त्याची झोंप क्षणोक्षणीं मोडते, इतकेंच नव्हे, तर दुर्दैवानें त्यांचीं द्रव्यार्जनाचीं कार्येंहि सफल होत नाहींत ॥ १० ॥

हे परमेश्वरा, तुझ्या मार्गाचें दर्शन श्रवणानें होत असतें. ज्या पुरुषाचें अंतःकरण भक्तियोगानें निर्मळ झालेलें असतें, त्याच्या हृदयकमलांत तूं वास करतोस. हे अनंतकीर्ते भगवन्, ज्या ज्या तुझ्या शरिराचें ध्यान भक्त आपल्या मनांत करतात, तें तें शरीर त्या आपल्या भक्तांवर अनुग्रह करण्याकरितां तूं प्रगट करतोस ॥ ११ ॥ ईश्वरा, तूं एक असून सर्व लोकांत अंतर्यामिरूपानें वास करतोस व तुझा सर्वत्र संचार असून तूं सर्वांचा मित्र आहेस. असा तूं, दुर्जनांना दुर्लभ अशा सर्व प्राण्यांवरील दयेनें जसा प्रसन्न होतोस तसा अंतःकरणांत कामना ठेवणाऱ्या देवगणांनीं पुष्कळ उपचारांनीं तुझी आराधना केली, तरी त्यांना देखील तूं प्रसन्न होत नाहींस ॥ १२ ॥

यास्तव मनुष्यांनीं नाना प्रकारचीं यज्ञादिक कर्में, दानें, तीव्र तपश्चर्या व व्रतें इत्यादि करून परमेश्वराला संतुष्ट करणें हेंच त्या सर्व कर्मांचें उत्कृष्ट फल होय. कारण परमेश्वराप्रीत्यर्थ केलेला धर्म केव्हांहि नष्ट होत नाहीं ॥ १३ ॥ हे परमेश्वरा, तूं आपल्या स्वरूपप्रकाशानें सर्वकाळ द्वैतरूपी भ्रम दूर करतोस व ज्ञान हीच तुझी विद्याशक्ति आहे. तूं सर्वांत श्रेष्ठ आहेस. तुला माझा नमस्कार असो. सृष्टीची उत्पत्ति, स्थिति व संहार यांना कारण अशी जी तुझी माया तिच्या लीला म्हणजे तुझाच खेळ होय. तूं सर्वसमर्थ आहेस, यास्तव तुला आम्ही नमस्कार करतों ॥ १४ ॥

देवा, तुझे अवतार व त्यांतील गुण व कर्में यांचें दिग्दर्शन करणारीं देवकीनंदन, सर्वज्ञ, भक्तवत्सल, गोवर्धनोद्धारण, कंसाराति इत्यादि तुझीं अनेक नांवें आहेत. प्राणो-त्क्रमणाच्या वेळीं पराधीन झालेले असे जे कोणी या नांवांचा उच्चार करतात, त्यांचीं अनेक जन्मांतील पापें तत्काल नष्ट होऊन ते जन्मरहित व मायेचें आवरण नसलेल्या अशा परब्रह्माला प्राप्त होतात. म्हणून मी तुला शरण आलों आहें ॥ १५ ॥ परमेश्वरा, तूं त्रिभुवनरूपी एक वृक्षच आहेस. वृक्ष जसा मूळ भेदून बाहेर पडतो, त्याप्रमाणें तूं

प्रकृतीचा भेद करून बाहेर पडला आहेस. उत्पत्ति, स्थिति व नाश यांच्या देवता जे ब्रह्मा, विष्णु व महेश्वर ते या त्रिभुवनरूप वृक्षाचे तीन पाय आहेत. शिवाय त्याला मरीचि इत्यादि ऋषि व मनु इत्यादि अनेक फांद्या उत्पन्न होऊन तो वाढला आहे. अशा त्या त्रिभुवनवृक्षरूपी तुला माझा नमस्कार असो ॥ १६ ॥

देवा, तूं सांगितलेलीं स्वतःची पूजा इत्यादि कर्में कल्याणकारक असतांहि तीं यथायोग्य अशीं हे लोक करीत नाहींत. उलट विरोधी अशा काम्यकर्मांमध्यें ते रममाण होतात व त्यामुळें बलाढ्य असा काल नित्य जागृत राहून त्यांची आशा तत्काल तोडून टाकतो. त्या कालाला माझा नमस्कार असो ॥ १७ ॥ परमेश्वरा, या माझ्या स्थानाला सर्व लोक नमस्कार करतात, व तें दोन परार्ध इतक्या कालापर्यंत टिकणारें आहे; पण अशा स्थानावर मी बसलों असतांहि तुझें मला भय वाटतें व तुझ्या प्राप्तीच्या इच्छेनें मीं पुष्कळ यज्ञ व तप हीं देखील केलीं. तूं यज्ञांचा आश्रय असून सर्वगुणसंपन्न आहेस. तुला माझा नमस्कार असो ॥ १८ ॥

देवा, तुला विषयसुखाची इच्छा नाहीं, तरी तूं स्वतः उत्पन्न केलेल्या धर्ममर्यादेचें पालन करावें म्हणून पशु, पक्षी, मनुष्य, देव, इत्यादि जीवयोनींमध्यें आपल्या इच्छेनुसार अवतार घेऊन क्रीडा करतोस. तूं पुरुषश्रेष्ठ असून सर्वगुणसंपन्न आहेस. तुला माझा नमस्कार असो ॥ १९ ॥ तम, मोह, महामोह, तामिस्र व अन्धतामिस्र अशा पांच वृत्तींच्या अविद्येचा * तुझ्याशीं संबन्ध नाहीं. तरी सुद्धां तूं सर्व लोकांचा आपल्या उदरांत लय करून लोकांच्या सुखाचा विस्तार करीत असतोस आणि भयंकर लाटांनीं युक्त असलेल्या अशा उदकाच्या अंतर्भागीं शेषाची शय्या करून तिचा सुखावह स्पर्श अनुभवीत योगनिद्रा घेत असतोस ॥ २० ॥

हे परमेश्वरा, तूं स्तुति करण्यास योग्य आहेस. तुझ्या नाभिकमलरूप आश्रयापासूनच मी उत्पन्न झालों आणि तुझ्या कृपेनें त्रैलोक्य उत्पन्न करण्याचें साहित्य मला प्राप्त झालें. तूं आपल्या उदरांत सर्व संसार धारण केला आहेस व आतां तुझी योगनिद्रा पूर्ण झाल्यामुळें आपलें नेत्रकमल तूं विकसित केलें आहेस. तुला माझा नमस्कार असो ॥ २१ ॥ भगवन्ता, तूं सर्व जगाचा हितकर्ता असून सर्वांत भरलेला आहेस. तूं भक्तांचा कैवारी आहेस. यास्तव ज्या ज्ञानाच्या आणि ऐश्वर्याच्या योगानें लोकांस सुख देतोस, त्याच ज्ञानानें माझी दृष्टि युक्त कर, म्हणजे मी पूर्वीप्रमाणें सृष्टि उत्पन्न करीन ॥ २२ ॥

परमेश्वर शरणागतांना अभयवर देणारा आहे. लक्ष्मी ही त्याची शक्ति असून तिच्या साहाय्यानें तो सत्त्वादिगुणांनीं युक्त होऊन अनेक अवतार धारण करतो आणि त्यांना उचित अशीं विविध कर्में करितो. मीं उत्पन्न करणार असलेलें विश्व हाहि त्याचाच

* अविद्येच्या या पांच वृत्ति, पुढें अ. १२, श्लो. २ मध्यें दिल्या आहेत.

पराक्रम होय. यास्तव माझें चित्त तो आपल्या लीलांच्या ठिकाणीं दृढ करो, म्हणजे सृष्टि-रचनारूप कर्माचा माझा अभिमान आणि तत्संबंधींचें पाप हीं टाकून देण्यास मी समर्थ होईन ॥ २३ ॥

हा अनंतपराक्रमी असा आदिपुरुष परमात्मा उदकांत असतां त्या नाभिरूप सरोवरांतून मी येथें उत्पन्न झालों. महत्तत्त्वरूपी जें चित्त तें माझी शक्ति आहे. मी उत्पन्न करणार असलेलें हें विश्व त्याचेंच आश्चर्यपूर्ण असें रूप आहे. त्याची विस्तृत रचना करीत असतां माझें वेदरूप वाणीचें अध्ययन नष्ट न होवो ॥ २४ ॥ हा भगवान् आदि-पुरुष अत्यंत दयाळू आहे व माझ्यावरील द्विगुणित झालेल्या प्रेमामुळें तो मंदहास्य करीत आपलें नेत्रकमल उघडीत आहे. त्यानें आतां कृपा करून उठावें आणि माझ्याकडून होणारें विश्वरचनेचें कार्य तडीस जावें म्हणून गोड शब्दांनीं माझी चिंता दूर करावी ॥ २५ ॥

मैत्रेयमुनि म्हणाले,—विदुरा, तपश्चर्या, ज्ञान आणि ध्यानयोग यांच्या योगानें आपल्या जनकाचें याप्रमाणें दर्शन झालें असतां ब्रह्मदेवानें त्याची आपल्या मनाच्या शक्तीप्रमाणें आणि वाणीच्या सामर्थ्याला अनुसरून शक्य तितकी स्तुति केली व शेवटीं तो खिन्न होऊन स्वस्थ राहिला ॥ २६ ॥ तेव्हां ब्रह्मदेवाच्या मनांतील इष्ट काय आहे, हें त्या मधुसूदनाला समजलें आणि प्रलयकालीन उदकाच्या क्षोभामुळें ब्रह्मदेवाचें चित्त विषादयुक्त झालें आहे असेंहि त्यानें पाहिलें ॥ २७ ॥ ( उदकाच्या त्या क्षोभामुळें ) सृष्टीची रचना कशी करावी, अशी त्याला काळजी वाटून ब्रह्मदेव खिन्न झाला होता. यास्तव गंभीर अशा शब्दांनीं भगवंतानें त्याची काळजी दूर करून त्याला उत्तर देण्यास आरंभ केला ॥ २८ ॥

भगवान् म्हणाले—ब्रह्मदेवा, तूं आळस करूं नकोस. सृष्टीच्या उत्पत्तीविषयीं उद्योग कर. ज्याकरितां तूं माझी स्तुति केलीस, तें मीं पूर्वींच सिद्ध करून ठेविलें आहे ॥ २९ ॥ तूं पुनः तपश्चर्या कर आणि माझ्या आधारानें राहणारी समाधियोगरूप विद्याहि संपादन कर म्हणजे या दोहींच्या योगानें तुझ्या हृदयांतच सर्व लोक प्रगट झालेले तुला दिसतील ॥ ३० ॥ मग तुझ्या अंतःकरणांत भक्ति उत्पन्न होऊन तुझें चित्त स्थिर होईल, आणि त्यायोगें तुझ्या स्वतःमध्यें तसाच सर्व लोकांतहि मीं परमेश्वर भरलेला आहे आणि सर्व लोक माझ्यांत अंतर्भूत झालेले आहेत असें तुला दिसून येईल ॥ ३१ ॥

काष्ठांत अग्नि जसा गुप्तरूपानें वास करतो, तसा सर्व प्राण्यांमध्यें माझा अंतर्यामि-रूपानें वास आहे, हें जेव्हां प्राण्यांस कळून येईल, त्याच वेळीं त्यांचें अज्ञान दूर होईल ॥ ३२ ॥ पंचभूतें, इन्द्रियें, सत्त्वादि गुण व अंतःकरण यांपासून आपण भिन्न असून आपलें आणि परमात्म्याचें स्वरूप एकच आहे, असें जेव्हां जीवाला समजून येतें, तेव्हां त्यास मोक्षाची प्राप्ति होते ॥ ३३ ॥ ब्रह्मदेवा, तूं अनेक कर्मांचा विस्तार करून पुष्कळ प्रजा उत्पन्न करण्याची इच्छा करीत आहेस. माझा तुजवर पूर्ण अनुग्रह असल्यामुळें तुझें अंतःकरण या सृष्टिकार्यानें मोह पावणार नाहीं ॥ ३४ ॥

तूं प्रजा उत्पन्न करीत असलास, तथापि तुझें मन माझ्याच ठिकाणीं लागलेलें असतें, त्यामुळें अत्यंत पापयुक्त असलेला रजोगुण सुद्धां आदि ऋषि अशा तुला मोहांत पाडूं शकत नाहींत ॥ ३५ ॥ सामान्य प्राण्यांना माझें स्वरूप कळत नाहीं; पण पंचभूतें, इंद्रियें, सत्त्वादि गुण, अहंकार यांशीं माझा संबंध नाहीं, हें तूं जाणल्यामुळें तुला मात्र माझ्या स्वरूपाची खरी ओळख पटली असें दिसतें ॥ ३६ ॥ कमळाच्या देठानें तूं पाण्यांत शिरून तूं त्यास शोधूं लागला असतां तुला तुझा संशय उत्पन्न झाला, तेव्हां तुझ्या हृदयांतच मी आपलें स्वरूप प्रगट करून तुला दाखविलें ॥ ३७ ॥

हे ब्रह्मदेवा, माझ्या कथारूपी उत्कर्षाचें वर्णन करून तूं जी ही माझी स्तुति केलीस, तशीच तपश्चर्येच्या ठिकाणीं सुद्धां तूं जी निष्ठा दाखविलीस, ती माझ्या कृपेचेंच फळ होय ॥ ३८ ॥ मीं त्रिगुणाच्या योगानें भासमान होत असतों; पण वस्तुतः मी त्यांपासून अलिप्त आहें, असें वर्णन करून जग उत्पन्न करण्याच्या इच्छेनें जी माझी स्तुति तूं केलीस, तीमुळें मी तुझ्यावर प्रसन्न झालों आहे. तुझें कल्याण असो ॥ ३९ ॥ जो पुरुष तूं केलेल्या ह्या स्तोत्रानें माझी नित्य स्तुति करून भजन करील, त्याला मी प्रसन्न होईन. ब्रह्मदेवा, मीं सर्व उत्तम कामना पूर्ण करणारा आहें ( हें तुला ठाऊक आहेच ) ॥ ४० ॥

तलाव, विहीर इत्यादि लोकोपयोगी कृत्यें, तपश्चर्या, यज्ञयाग, दानधर्म, व योगाभ्यास यांच्या योगानें पुरुषांना जें सर्वोत्तम फळ मिळतें, तें म्हणजे माझा संतोष हें होय, असें तत्त्ववेत्त्यांचें मत आहे ॥ ४१ ॥ ब्रह्मदेवा, मीं सर्व जीवांचा अंतर्यामी असून त्यांना सर्व आवडत्या वस्तूंत अत्यंत आवडता आहे. म्हणून प्रेम करावयाचें तर तें माझ्यावर करावें. कारण देहादिक पदार्थांवर जें प्रेम असतें, तें तरी माझ्यामुळेंच होय ॥ ४२ ॥ ब्रह्मदेवा, तूं माझ्यापासून उत्पन्न झाला आहेस, व सर्व वेद तुझ्या उदरांत वास करतात. तेव्हां ज्या प्रजा माझ्यामध्यें लय पावल्या आहेत त्यांना आणि या सर्व जगाला तूं पूर्वीप्रमाणें निर्माण कर ॥ ४३ ॥

मैत्रेयऋषि म्हणाले—विदुरा, प्रकृति व पुरुष यांचा नियामक असा जो विष्णु त्यानें सृष्टिकर्त्या ब्रह्मदेवाला जगाच्या उत्पत्तीचें ज्ञान अशा रीतीनें स्पष्ट करून दिलें व तो अंतर्धान पावला ॥ ४४ ॥

**नववा अध्याय समाप्त**

# अध्याय १० वा

विदुर म्हणाला—मैत्रेय मुने, भगवान् अंतर्धान पावल्यावर, आद्य सृष्टि निर्माण केल्यामुळें ज्यास लोकपितामह म्हणतात त्या ब्रह्मदेवानें आपलें शरीर व मन या दोहोंपासून किती व कोणती सृष्टि उत्पन्न केली ? ॥ १ ॥ महाराज, आपण ज्ञान्यांमध्यें श्रेष्ठ आहां; यास्तव पूर्वी मीं ज्या गोष्टी आपल्याला विचारल्या होत्या, त्या मला अनुक्रमानें सांगून आपण माझे सर्व संशय दूर करावे ॥ २ ॥ सूत म्हणाला—शौनका, त्या विदुरानें असा प्रश्न केला असतां, मैत्रेय मुनीला मोठा संतोष झाला. विदुराचे प्रश्न त्यांच्या हृदयांत होतेच. तेव्हां त्याची ही विनंती ऐकून त्यांनीं त्या प्रश्नांचीं उत्तरें देण्यास आरंभ केला॥ ३॥

मैत्रेय म्हणाले—विदुरा, जन्मरहित अशा त्या भगवान् आदिपुरुषानें सांगितल्या प्रमाणें ब्रह्मदेवानेंहि परमात्मस्वरूपीं मन लावून देवांचीं शंभर वर्षेपर्यंत तपश्चर्या केली ॥४॥ तेव्हां प्रलयकालामुळें भयंकर स्वरूप प्राप्त झालेल्या वायूच्या योगानें कमळांतून उत्पन्न झालेला तो ब्रह्मदेव ज्यावर बसला होता, तें कमळ आणि पाणी कांपूं लागलें. हें पाहून ब्रह्मदेवानें त्या वायूला उदकासह साफ पिऊन टाकिलें. कारण त्या वेळीं पूर्ण झालेली तपश्चर्या आणि परमात्मविषयक ज्ञान त्यांच्या योगें त्याचें ज्ञान आणि बल हीं द्विगुणित झालीं होतीं ॥ ५ ॥ ६ ॥

अशा स्थितींत ब्रह्मदेव ज्यावर बसला होता, तें आकाशव्यापी कमळ त्याच्या दृष्टीस पडलें. तें पाहून, आतां आपण पूर्वकल्पांत लीन झालेले लोक पुनः उत्पन्न करूं शकूं, असें ब्रह्मदेवाला वाटूं लागलें ॥ ७ ॥ असा विचार करून तो त्या कमळाच्या कोशांत शिरला. सृष्टि करण्याची प्रेरणा त्याच्या हृदयांत परमात्म्यानें केलेली होतीच. तेव्हां चौदा किंवा त्यांहूनहि अधिक विभाग करण्याजोगा जरी तो कमळाचा गाभा होता, तरी त्यानें भूर्लोक, भुवर्लोक व स्वर्लोक असे त्याचे तीनच विभाग केले ॥८ ॥ विदुरा, काम्य कर्मे करणाऱ्या जीवांना फल भोगण्यासाठीं ज्या लोकांची योजना केलेली आहे, ते हे एवढेच तीन लोक होत. कारण ब्रह्मदेवाचें अधिष्ठानभूत असे महर्लोकापासून सत्यलोका-पर्यंतचे लोक, हे फक्त निष्काम कर्मांचें फल म्हणूनच प्राप्त होतात ॥ ९ ॥

विदुर मैत्रेयमुनीस म्हणाला—मैत्रेयमुने, आपण ब्रह्मज्ञानी असून माझ्या प्रश्नांचीं उत्तरें देण्यास समर्थ आहां. त्या श्रीहरीच्या लीला आश्चर्यानें भरलेल्या आहेत आणि त्याच्या रूपांची तर गणनाच नाहीं; पण त्या रूपांत कालनामक एक रूप आहे असें तुम्हीं पूर्वी जें सांगितलें, तें आतां सविस्तर वर्णन करा ॥ १० ॥ मैत्रेय म्हणाले—विदुरा, कालाला कोणतेंहि स्वरूप नाहीं आणि त्याला आदि व अन्तहि नाहींत, असा तो अमर्याद आहे; परंतु सत्त्वादि गुणांमध्यें न्यूनाधिक्य होऊन महत्तत्त्वादिक उत्पन्न झालीं म्हणजे त्याचें

स्वरूप लक्षांत येतें. ईश्वरानें त्या कालाला निमित्त करून लीलेनें स्वतःला जगद्रूपानें निर्माण केलें ॥ ११ ॥ विदुरा, पूर्वी हें जग विष्णूच्या मायेनें परब्रह्मांत लीन झालें होतें. त्याला परमेश्वरानें कालाचें निमित्त पुढें करून निराळें प्रकाशित केलें; परंतु त्या कालाचें स्वरूप मात्र कोणालाहि समजत नाहीं ॥ १२ ॥ काल हा जसा आतां आहे, तसा पूर्वीहि होता आणि पुढेंहि असाच राहील. या कालाच्याच निमित्तानें नऊ प्रकारची सृष्टि उत्पन्न झाली. ( त्यापैकीं प्रकृतीपासून सहा प्रकारची आणि विकृतीपासून तीन प्रकारची होय. ) प्रकृति व विकृति अशा दोन्ही मिळून झालेली सृष्टि ती दहावी होय. ॥ १३ ॥ या सृष्टीचा काल, द्रव्यें आणि गुण यांच्या योगानें प्रलय होतो. तो प्रलय नित्य, नैमित्तिक व प्राकृतिक असा तीन प्रकारचा आहे. ( कालाच्या योगानें होणाऱ्या प्रलयास नित्य प्रलय म्हणतात. शेषाच्या मुखांतील अग्नि किंवा प्रलयकालाच्या मेघांनीं जो होतो तो नैमित्तिक प्रलय होय. तसेंच सत्त्वादि गुण, स्वतः उत्पन्न केलेलीं कार्यें आपल्यामध्यें लीन करतात, तो प्राकृतिक प्रलय होय. ) महत्तत्त्वाची उत्पत्ति हा पहिला सर्ग. हें महत्तत्त्व म्हणजे ईश्वरापासून सत्त्व, रज आणि तम या तीन गुणांत झालेल्या न्यूनाधिक भावाचा परिणाम होय ॥ १४ ॥ अहंकाराची उत्पत्ति हा दुसरा सर्ग. या अहंकारापासूनच पंचमहाभूतांचीं सूक्ष्मरूपें, ज्ञानेन्द्रियें आणि कर्मेंद्रियें हीं उत्पन्न होतात. सूक्ष्मतन्मात्रांची उत्पत्ति हा तिसरा सर्ग होय. त्यांमध्यें पंचमहाभूतें उत्पन्न करण्याची शक्ति असते ॥ १५ ॥

पंच ज्ञानेंद्रियें आणि पंच कर्मेंद्रियें यांची उत्पत्ति हा चौथा सर्ग होय. सात्त्विक अहंकारापासून जी इंद्रियांच्या अभिमानी देवतांची उत्पत्ति होते, तीस देवसर्ग म्हणतात. हाच पांचवा सर्ग होय. यांतच मनाचाहि अंतर्भाव होतो ॥ १६ ॥ हे समर्थ विदुरा, तामिस्र इत्यादि पांच प्रकारच्या अविद्येची उत्पत्ति हाच सहावा सर्ग. याच अविद्येनें जीवाला[1] मोह पडून स्वरूपाचा भ्रंश होतो. हे सहा प्रकृतीपासून झालेले सर्ग तुला सांगितले. आतां विकृतीपासून झालेले तीन सर्ग सांगतों, ते ऐक ॥ १७ ॥ ज्याच्या धारणाशक्ती-मध्यें सर्व दुःखें दूर करण्याचें सामर्थ्य आहे, असा तो भगवान् रजोगुणाचा आश्रय करून ही जी स्थावर पदार्थांची उत्पत्ति करून लीला करतो, तीच सातवी सृष्टि होय. ही सृष्टि सहा प्रकारची आहे ॥ १८ ॥ वनस्पति, औषधि, लता, त्वक्सार, विरुध आणि द्रुम असे ते सहा भेद होत. ( फुलांवांचून फळें येणाऱ्या वड, पिंपळ इत्यादि वृक्षांस वनस्पति

---

१ आवरण आणि विक्षेप अशा अविद्येच्या दोन शक्ति सांगितल्या आहेत. वस्तूचें रूप झांकणारी ती आवरण शक्ति आणि दुसरेंच रूप भासविणारी ती विक्षेप शक्ति.

म्हणतात. एकवार फुलें, फळें येऊन नाश पावणाऱ्या केळी, धान्यें इत्यादि ओषधि होत. ज्यांना वृक्ष इत्यादिकांचा आधार लागतो, त्या पानवेली इत्यादि लता होत. ज्यांची त्वचा कठीण असते असे वेळू इत्यादि त्वक्सार होत. आधाराशिवाय ज्या वाढतात त्या वीरुध होत. द्रुम म्हणजे फुलें, फळें येणारे आम्बा इत्यादि वृक्ष होत.) या सहाहि जातींचा आहारमार्ग खालून वर असा असतो. त्यांची ज्ञानशक्ति बहुधा लुप्त असते. त्यांना स्पर्शाचें ज्ञान आंतच होतें व प्रत्येकाचे कांहीं तरी विशेष धर्म असतात ॥ १९ ॥

पशु इत्यादिकांची उत्पत्ति ही आठवा सर्ग होय. हा अठ्ठावीस प्रकारचा आहे. यांतील प्राण्यांना उद्यां काय होणार याचें धोरण नसतें, व आहार, मैथुन, निद्रा इत्यादि गोष्टींचें मात्र ज्ञान त्यांना असतें. घ्राणेंद्रियानेंच ते इतर वस्तु जाणतात व सुखदुःखाचे परिणाम त्यांच्या मनावर फार वेळ टिकत नाहींत ॥ २० ॥ या पशूंच्या अठ्ठावीस भेदांत बैल, बकरा, रेडा, हरिण, डुकर, गवा, काळवीट, मेंढा व उंट या दोन खुरांच्या नऊ जाती येतात ॥२१॥ आणि गाढव, घोडा, खेंचर, गौर, शरभ व चमरी नांवाची वनगाय या एक खुराच्या सहा जातींचा त्यांतच समावेश होतो. विदुरा, पांच नखांचे पशु आतां सांगतों, ऐक ॥ २२ ॥ कुत्रा, कोल्हा, लांडगा, वाघ, मांजर, ससा, साळ, सिंह, वानर, हत्ती, कांसव, घोरपड आणि मगरासारखे प्राणी हे ते होते. कंक, गिधाड, वटवाघूळ, ससाणा, भास, अस्वल, मोर, हंस, सारस, चक्रवाक, कावळा, घुबड इत्यादि हे पक्षी होत ॥ २३ ॥ २४ ॥

विदुरा, मनुष्य हा एक निराळाच नववा सर्ग होय. त्याच्या आहारविहाराचा मार्ग वरून खालीं असतो. त्यांच्यामध्यें रजोगुण अधिक प्रमाणांत असतो व ते नेहमीं कर्में करण्यांत मग्न असून या दुःखरूपी संसारांत सुख मानून राहतात ॥ २५ ॥ विदुरा, पशु, पक्षी व मनुष्य हे तीनहि सर्ग वैकृत म्हणजे पहिल्या सहा सर्गांपासून झालेले आहेत. पूर्वीं सांगितलेला जो देवसर्ग तो सात्त्विक आहे; पण दहावा सनत्कुमार इत्यादिकांचा जो सर्ग तो प्राकृत आणि वैकृत असा दोन्ही प्रकारचा आहे; (कारण ते देव आणि मनुष्य या दोन्ही कोटींमध्यें असतात) ॥ २६ ॥ देव, पितर, असुर, गंधर्व व अप्सरा, सिद्ध यक्ष व राक्षस, चारण, भूत, प्रेत व पिशाच, विद्याधर व किन्नर आदिकरून हे आठ प्रकार देवसर्गाचे होत. विदुरा, ब्रह्मदेवानें उत्पन्न केलेले हे असे दहा सर्ग तुला मीं सांगितले ॥ २७ ॥ २८ ॥

यापुढें वंश आणि मन्वन्तरें हीं तुला सांगतों. ईश्वरच रजोगुणानें युक्त होऊन ब्रह्मदेवाचें रूप घेतो आणि कल्पांदिकांमध्यें सृष्टि निर्माण करतो. त्याचा संकल्प केव्हांहि निष्फळ न होणारा असून तो स्वतःच्याच योगानें स्वतःचें रूपान्तर असें हें जग निर्माण करितो ॥ २९ ॥ *

* या श्लोकानंतर पुढील प्रक्षिप्त श्लोक कांहीं ठिकाणीं आढळतात:—

**गुणव्यत्यय एतस्मिन्मायाविनो ऽधीशितुः । न पौर्वापर्यमिच्छन्ति नद्यां भ्राम्यद्भ्रमेरिव ॥ ३० ॥ देवासुरादयः क्षत्तः कल्पेऽस्मिन्ये च कीर्तिताः । त एव नामरूपाभ्यामासन्मन्वन्तरान्तरे ॥ ३१ ॥** अर्थ—परमेश्वर हा मायावी असल्यामुळें त्रिगुणांच्या परस्परसंबंधांनें जो सृष्टीचा पसारा झाला, त्यांत अमुक आधीं झालें व तमुक मागून झालें असें ज्ञानी पुरुष मानीत नाहींत. नदींत पाणी गरगर फिरून भोंवरा होतो, त्यांत अमुक पहिला भाग आणि अमुक मागूनचा असें कसें म्हणतां येईल? हे विदुरा, या चालू कल्पांतील देव, असुर, मनुष्य, पशु इत्यादि जे आतां सांगितले, तसेच ते इतर मन्वंतरांमध्येंहि असतात व त्यांचीं नांवें व रूपें हीं तशींच असतात ॥ ३० ॥ ३१ ॥

**दहावा अध्याय समाप्त**

# अध्याय ११ वा

मैत्रेयऋषि म्हणाले–विदुरा, सृष्टींतील व्यक्त पदार्थांचे विभाग करतां करतां जो शेवटचा विभाग होऊन पुढें तसा विभाग करतां येत नाहीं, त्याला परमाणु असें म्हणतात. तो इतरांपासून अलग असून कोणाशीं संयुक्त झालेला नसतो. अशा परमाणूंच्या मीलनानें मनुष्यांना मूर्त पदार्थाचा भास होतो ॥ १ ॥ सृष्टींत जे अनेक व्यक्त पदार्थ आहेत, त्यांचे विशिष्ट गुणधर्म व एकमेकांपासून दिसणारी भिन्नता सोडून त्यांच्या मूल अवस्थेंत रूपान्तर न पावलेला असा जो परमाणुसमुदाय त्याला 'परममहान्' असें म्हणतात ॥ २ ॥ हे साधुश्रेष्ठ विदुरा, काळ हा एक परमेश्वराचीच शक्ति असून उत्पत्ति, पालन व संहार हीं करण्यांत तो नित्य दक्ष असतो. तो स्वतः प्रत्यक्ष दिसत नसूनहि यच्चयावत् पदार्थांना व्यापून राहतो. इतर पदार्थांचीं जशीं सूक्ष्म, मध्यम व स्थूल स्वरूपें आहेत, तशीं कालाचींहि असलीं पाहिजेत असें त्याच्या व्यापकपणावरून सहज अनुमान होतें ॥ ३ ॥

परमाणुस्वरूपाला व्यापावयास जेवढा काळ लागतो, त्याला कालाचा 'परमाणु' म्हणतात व त्या परमाणूंचीं सर्व कार्यें व्यापावयास जो काल लागतो, त्याला कालाचें 'परमहान्' स्वरूप समजतात * ॥ ४ ॥ दोन परमाणु मिळून एक अणु होतो. आणि तीन पारमाणूंना एक त्रसरेणु म्हणातात. खिडकींतून सूर्याचे किरण आंत येतात, तेव्हां अंतराळांत इकडेतिकडे संचार करणारे जे कण दिसून येतात, ते त्रसरेणुच होत ॥ ५ ॥ तीन त्रसरेणु भोगण्यास जो काल लागतो, त्या कालाला त्रुटि म्हणतात. शंभर त्रुटि म्हणजे एक 'वेध' होतो आणि तीन वेध म्हणजे एक 'लव' होतो ॥ ६ ॥

तीन लवांचा एक निमेष समजावा. तीन निमेषांना क्षण म्हणतात. पांच क्षणांना काष्ठा समजतात व अशा पंधरा काष्ठा झाल्या म्हणजे एक लघु होतें ॥ ७ ॥ पंधरा लघूंना एक घटिका म्हणतात. त्या दोन घटिकांचा एक मुहूर्त होतो. सहा किंवा सात

---

* सूर्य हा कालगति मोजण्याचें मुख्य साधन आहे असें पञ्चमस्कंधांत सांगितलें आहे. ग्रह, नक्षत्रें व तारका यांच्या चक्रावर सूर्य फिरत असतो; त्याला परमाणु इतक्या भागाचें उल्लंघन करून जाण्यास जी वेळ लागते, त्या वेळेला 'परमाणु' ही संज्ञा आहे. व त्या सूर्याला सगळ्या ग्रहनक्षत्रचक्रावर फिरण्याला एक वर्षात्मक काल लागतो, त्याला 'परममहान्' फार मोठा ही संज्ञा आहे. त्या संवत्सरात्मक कालाच्या आवृत्तीनें युगें, मन्वन्तरें ह्या क्रमानें ब्रह्मदेवाचे दोन परार्ध होतात. (पुढें श्लो. १३ आणि ३२–३८ पहा.)

घटिका झाल्या म्हणजे मनुष्यांचा एक प्रहर होतो हाच 'याम'[1] म्हणजे दिवसाचा किंवा रात्रीचा चौथा भाग होय ॥ ८ ॥ सहा पैलें वजनाचे आणि एक प्रस्थ वजनाचे पाणी मावणारें असें तांब्याचें पात्र करावें व चार मासे सुवर्णाची चार अङ्गुलें लांबीची तार काढून ती शिरेल एवढें त्याला मध्यभागीं छिद्र करावें म्हणजे 'घटिका' पात्र सिद्ध होतें ॥ ९ ॥

विदुरा, चार आणि चार अशा आठ प्रहरांनीं मनुष्यांच्या दिवसरात्रीची जोडी होते. पंधरा दिवसांचा एक पक्ष होतो. तो शुक्ल व कृष्ण असा दोन प्रकारचा आहे ॥ १० ॥ शुक्ल व कृष्ण हे दोन पक्ष मिळून एक महिना होतो. मनुष्यांचा हा मास म्हणजे पितरांचें एक अहोरात्र होय. दोन महिन्यांचा मिळून एक ऋतु होतो व सहा महिन्यांनीं एक 'अयन' होतें. हीं अयनें दक्षिणायन व उत्तरायण अशीं दोन आहेत. हीं दोन अयनें मिळून स्वर्गांतील लोकांचें एक अहोरात्र होतें. बारा महिन्यांच्या काळाला वत्सर म्हणतात. मनुष्यांचें अधिकांत अधिक आयुष्य शंभर वर्षें सांगितलें आहे ॥ ११ ॥ ॥ १२ ॥

नित्य जागृत असणारा असा सर्वसाक्षी भगवान् सूर्य हा, चंद्र, मंगळ इत्यादि ग्रह, आश्विनी आदिकरून नक्षत्रें व इतर तारे यांच्या चक्रावर राहून परमाणूपासून आरंभ करून वर्षानें संपणाऱ्या काळांत पृथ्वीभोंवतीं फिरत असतो ॥ १३ ॥ विदुरा, या कालावधीला संवत्सर[3], परिवत्सर, इडावत्सर, अनुवत्सर व वत्सर अशीं नांवें दिलेलीं आहेत ॥ १४ ॥ सूर्य हा पंचमहाभूतांतील एक भूत जें तेज तद्रूप आहे. सृष्टींत उत्पन्न होणाऱ्या पदार्थांतील शक्तीला आपल्या कालनामक शक्तीच्या योगानें तो उत्तेजित करतो आणि मनुष्याचा मोह दूर करून यज्ञांच्या योगानें सत्त्वादि गुणांनीं युक्त अशा स्वर्गादि फलांचा विस्तार करीत आकाशांत धांवत असतो. अशा त्या पंचसंवत्सरात्मक कालस्वरूपाला पूजा अर्पण करा ॥ १५ ॥

---

१ सहा किंवा सात घटिकांचा 'याम' होतो असें अनिश्चित म्हटलें आहे. कारण दिवस व रात्र यांचें प्रमाण नेहमीं निश्चित नसतें. कधीं दिवस लहान व रात्री मोठ्या, आणि कधीं रात्री लहान व दिवस मोठे असतात. त्यांतून संधिकाळ वगळला म्हणजे त्यांचे चवथे भाग सहा किंवा सात घटकांचे असे अनिश्चित होतात.

२ पांच गुंजा म्हणजे माष किंवा मासा, सोळा मासे म्हणजे कर्ष किंवा तोळा, चार कर्ष म्हणजे पल आणि १६ पलें म्हणजे प्रस्थ किंवा शेर.

३ सौर वर्ष म्हणजे संवत्सर, बार्हस्पत्य वर्ष म्हणजे परिवत्सर, ३६० दिवसांचें सावन वर्ष म्हणजे इडावत्सर, बारा चांद्रमहिने म्हणजे अनुवत्सर आणि नाक्षत्रवर्ष म्हणजे वत्सर.

विदुर म्हणाला—मैत्रेयऋषे, पितर, देव व मनुष्य यांचें आयुष्य अधिकांत अधिक म्हणजे ज्यांचीं त्यांचीं शंभर वर्षे आहे, असें तुम्हीं सांगितलें. आतां जे ज्ञानी कल्पाच्या बाहेर आहेत, त्यांच्या आयुष्याचें प्रमाण कसें आहे तें मला सांगा ॥ १६ ॥ महाराज, आपण महासमर्थ अशा कालाची गति जाणत आहां, आपल्यासारखे ज्ञानी पुरुष योगाभ्यासानें परिणत झालेल्या ज्ञानाच्या योगानें सर्व विश्वाचें अवलोकन करीत असतात ॥ १७ ॥

मैत्रेय ऋषि म्हणाले—विदुरा, कृत, त्रेता, द्वापर व कलि अशीं चार युगें आहेत. या चार युगांचें चक्र त्यांच्या संध्या व अंश यांसह देवांच्या बारा हजार वर्षांनीं पूर्ण होते ॥ १८ ॥

कृत, त्रेता, द्वापर व कलि या चार युगांची वर्षसंख्या अनुक्रमें चार, तीन, व एक असे हजार प्रत्येकीं त्या हजारांच्या दुप्पट शेंकडे अशी आहे[१] ॥ १९ ॥ शंभरांच्या आकड्यांनीं दर्शविलेले जे संध्या व अंश त्यांच्यामध्यें जो काल येतो, त्याला कालाची गणना करणारे लोक युग म्हणतात. या प्रत्येक युगांचे विशिष्ट धर्म सांगितलेले आहेत ॥ २० ॥ विदुरा, कृतयुगांत चार चरणांनीं युक्त असा धर्म मनुष्यांमध्यें वागत होता; पण तो पुढें त्रेता, द्वापर व कलि, यांमध्यें एकएक पायानें म्हणजे चतुर्थांशानें ऱ्हास पावत जातो व त्याच्या जागीं एकेका पादानें अधर्म वाढत जातो ॥ २१ ॥

त्रैलोक्याच्या बाहेर महर्लोकापासून ब्रह्मलोकापर्यंत असणारे जे लोक त्यांत राहणाऱ्यांचा एक दिवस म्हणजे या चार युगांच्या चक्राचे हजार फेरे होत. तेवढीच त्यांची रात्र असते. ह्या रात्रींत विश्वोत्पत्ति करणारा ब्रह्मदेव शयन करीत असतो ॥ २२ ॥ ब्रह्मदेवाची रात्र संपल्यावर सृष्टिरचनेला आरंभ होतो आणि ब्रह्मदेवाचा दिवस संपेपर्यंत ती चालू असते. एवढ्या अवधींत चौदा मनु होऊन जातात ॥ २३ ॥ म्हणजे प्रत्येक मनूचा अधिकारकाल ७१ युगचक्रापेक्षां थोडा अधिक म्हणजे ७१ $\frac{६}{१४}$ युगें इतका असतो व तितका काल प्रत्येक मनु आपल्या अधिकाराचा उपभोग घेतो. अशा प्रत्येक मन्वंतरांत मनु, सप्तर्षि, देव, इंद्र व त्यांचे गंधर्वादिक अनुयायी आणि तसेच मनूच्या वंशांतील राजे अधिकारारूढ होतात. यांपैकीं मनुवंशीय राजे क्रमाक्रमानें येतात; पण ऋषि, देव इत्यादि मात्र एकाच वेळीं अधिष्ठित होतात ॥ २४ ॥

---

१ कृत ४८०० वर्षें, त्रेता ३६००, द्वापर २४०० वर्षें व कलि १२०० वर्षें युगाच्या वर्षसंख्येंत हजारांवर जें शेंकडे आहेत; ते संध्या व अंश यांच्या वर्षसंख्या होत; युगाच्या प्रारंभींच्या कालाला ‘ संध्या ’ व समाप्तीच्या कालाला ‘ अंश ’ म्हणतात. त्या शेंकड्यांपैकीं अर्धी संध्या व अर्धी अंश समजावा. कृतादि युगें व त्याच्या संध्यांचें आणि अंशांचे काल पुढील श्लोकांत दिले आहेत.

विदुरा, प्रत्येक दिवशीं होणारा ब्रह्मदेवाचा सर्ग हा असा आहे. ह्यांत त्रैलोक्याचा विस्तार होऊन पशु, पक्षी, मनुष्य, पितर व देव हेहि आपापल्या कर्मानुसार उत्पन्न होतात ॥ २५ ॥ प्रत्येक मन्वंतरांत परमेश्वर सत्त्वगुणाचा स्वीकार करून मनूच्या रूपानें अवतार घेतो आणि त्या मनूकडून आपले पराक्रम प्रगट करवून ह्या जगाचें रक्षण करतो ॥ २६ ॥ ब्रह्मदेवाच्या दिवसाची समाप्ति होतांच भगवान् तमोगुणाच्या अंशाचा स्वीकार करून आपलें कार्य आवरून घेतो आणि शयन करतो. त्या वेळीं सर्व जग कालाच्या योगानें त्याच्यांत प्रवेश करितें ॥ २७ ॥

रात्रीला आरंभ होऊन चंद्र व सूर्य नाहींसे झाले असतां भूः, भुवः, स्वः हे तिन्ही लोक परमेश्वरस्वरूपांतच अन्तर्धान पावतात ॥ २८ ॥ विदुरा, शेषाच्या मुखांतील अग्नि म्हणजे भगवन्ताची शक्तीच होय. त्या शक्तीनें त्रैलोक्य जळूं लागलें म्हणजे त्या अग्नीच्या उष्णतेनें पीडित होऊन भृग्वादिक ऋषि आपल्या महर्लोकांतून जनलोकांत जातात ॥ २९ ॥ इतक्यांत प्रलयकालामुळें समुद्रांना अतिशय भरती येते व त्यांचें पाणी खवळून त्यांत प्रचंड वायूच्या योगानें लाटा उसळूं लागल्या म्हणजे ते त्रैलोक्याला बुडवून टाकितात ॥ ३० ॥ तेव्हां भगवान् श्रीहरि त्या पाण्यांत शेषाच्या आसनावर योगनिद्रेनें डोळे मिटून शयन करतो; आणि जनलोकात राहणारे ऋषि त्याची स्तुति करीत असतात ॥ ३१ ॥ विदुरा, याप्रमाणें कालगतीनें युक्त असलेल्या ह्या दिवसरात्रींनीं ब्रह्मदेवाचें सुद्धां सर्वांपेक्षां मोठें असें शंभर वर्षांचें आयुष्य संपल्यासारखें होतें ! ॥ ३२ ॥ विदुरा, ब्रह्मदेवाच्या आयुष्याच्या अर्धाला 'परार्ध' म्हणतात. त्याच्या आयुष्याचा पूर्व परार्ध संपलेला असून दुसरा परार्ध सांप्रत चालू आहे ॥ ३३ ॥

त्या पहिल्या परार्धाच्या आरम्भीं ब्राह्म नांवाचा कल्प होऊन गेला. त्यामध्यें ज्याला 'शब्दब्रह्म' असें म्हणतात, तो ब्रह्मदेव उत्पन्न झाला ॥ ३४ ॥ ब्राह्मकल्पाच्या शेवटीं जो कल्प झाला, त्याला पाद्मकल्प असें म्हणतात. या कल्पांत श्रीविष्णूच्या नाभिसरोवरांतून त्रैलोक्यरूपी कमल उत्पन्न झालें ॥ ३५ ॥ विदुरा, हा जो चालू कल्प आहे, तो दुसऱ्या परार्धाच्या आरंभींचा आहे. तो वाराह या नांवानें प्रख्यात आहे. कारण या कल्पांत श्रीहरीनें पृथ्वीचा उद्धार करण्यासाठीं वराहाचें रूप धारण केलें ॥ ३६ ॥

द्विपरार्ध नांवाचा दोन परार्धांनीं युक्त असा हा काळ अनादि, अनंत, उपाधिशून्य अशा त्या जगत्कारण परमेश्वराच्या केवळ निमेषासारखा समजतात ॥ ३७ ॥ परमाणूपासून द्विपरार्धपर्यंत असणारा हा काळ, देह, गृह इत्यादिकांच्या ठिकाणीं आसक्ति बाळगणाऱ्या पुरुषांचें मात्र नियमन करण्यास समर्थ आहे; पण सर्वव्यापी परमेश्वराचें नियमन करण्याचें सामर्थ्य त्याच्यामध्यें अर्थातच नाहीं ॥ ३८ ॥ विदुरा, अकरा इन्द्रियें व पंचमहाभूतें या

विकारांनीं युक्त असलेल्या त्या अष्टधा * प्रकृतीपासून हा ब्रह्माण्डकोश उत्पन्न झाला. पृथ्वी आदिकरून सात आवरणांचें त्यांच्या भोंवतीं वेष्टन आहे व आंतून त्याचा विस्तार पन्नास कोटि योजनें आहे ॥ ३९ ॥

उत्तरोत्तर हीं पृथिवी आदिकरून आवरणें दसपटीनें विस्तृत होत गेलीं आहेत. पण त्यांनीं युक्त असा हा ब्रह्मांडाचा गोळा परमेश्वराच्या स्वरूपांत प्रविष्ट झाल्यावर केवळ एका परमाणूसारखा दिसतो व त्या ब्रह्मांडासारख्या दुसऱ्याहि अनेक ब्रह्मांडांच्या राशी त्या परमेश्वराच्या स्वरूपांत आढळतात ॥ ४० ॥ असें त्या सर्वव्यापी आदिपुरुष परमात्म्याचें स्वरूप प्रकृत्यादि सर्व कारणांचेंहि कारण आहे व त्यालाच परम श्रेष्ठ अक्षरब्रह्म असें म्हणतात ॥ ४१ ॥

* प्रकृति, महत्तत्त्व, अहंकार आणि शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध या आठ होत.

## अकरावा अध्याय समाप्त

# अध्याय १२ वा

मैत्रेयऋषि म्हणाले,—विदुरा, याप्रमाणें परमेश्वराची जी कालशक्ति तिचा महिमा मीं वर्णन केला. आतां आपल्या उदरांत वेद धारण करणाऱ्या त्या ब्रह्मदेवानें कोणत्या प्रकारें सृष्टि निर्माण केली, तें माझ्यापासून समजून घे ॥ १ ॥ ब्रह्मदेवानें सृष्टि करण्यास सुरुवात केली, तेव्हां त्यानें प्रथम पांच अज्ञानाच्या वृत्ति उत्पन्न केल्या. तम, मोह, महामोह, तामिस्र व अन्धतामिस्र हीं त्या वृत्तींचीं नांवें होत * ॥ २ ॥ ही पांच प्रकारची अविद्यारूप पापी सृष्टि पाहून ब्रह्मदेवाला स्वतःविषयीं कांही धन्यता वाटली नाहीं; म्हणून त्यानें भगवन्ताचें ध्यान करून आपलें मन पवित्र केलें आणि त्याच्या योगानें दुसरी सृष्टि निर्माण केली ॥ ३ ॥

ब्रह्मदेवाची ही मानससृष्टि म्हणजे सनक, सनन्द सनातन व सनत्कुमार असे चार ऋषि होत. हे चौघेहि नैष्ठिक ब्रह्मचारी व निवृत्तिमार्गी असल्यामुळें धर्म, अर्थ व काम या तिन्ही पुरुषार्थांविषयीं त्यांची मुळींच अपेक्षा नव्हती ॥ ४ ॥ ब्रह्मदेव त्यांना पाहून म्हणाला, 'मुलांनो, तुम्हीं प्रजा उत्पन्न करा!' पण सनकादि ऋषि भगवान् वासुदेवालाच सर्वस्व मानून एका मोक्षधर्माचेंच आचरण करणारे असल्यामुळें, प्रजा उत्पन्न करण्याबद्दलची गोष्ट त्यांच्या मनांत भरेना ॥ ५ ॥ आपल्या पुत्रांनीं आपल्या आज्ञेचा अव्हेर केला असें पाहून ब्रह्मदेवाला अनिवार क्रोध आला व त्यानें तो आवरून धरण्याचा पुष्कळ प्रयत्न केला ॥ ६ ॥

ब्रह्मदेवानें मोठ्या प्रयत्नानें क्रोधाला आवरून धरिलें होतें, तथापि तो त्याच्या दोन्ही भ्रुकुटींच्या मधून बाहेर पडला, व तत्काल त्यापासून एक काळ्या व तांबड्या वर्णाचा म्हणजे नीललोहित पुत्र उत्पन्न झाला ॥ ७ ॥ तो पुत्र म्हणजे देवांचा आदिदेव असा भगवान् महादेव होय. तो झाल्याबरोबर रडूं लागला, आणि 'हे तात, त्रैलोक्यगुरो, माझीं नांवें कोणतीं तीं सांगा, व माझीं स्थानेंहि नियोजित करून द्या' असें म्हणूं लागला ॥ ८ ॥ तेव्हां ही त्याची मागणी पुरविण्याकरितां 'बाळा, रडूं नको, तूं म्हणतोस तसें मीं करतों' असें ब्रह्मदेव त्याला गोड शब्दांनीं म्हणाला ॥ ९ ॥

---

* तम म्हणजे आत्म्या स्वरूपाचें ज्ञान नसणें, मोह म्हणजे देह व इन्द्रियें यांनाच 'मी' समजणें, महामोह म्हणजे भोगाची इच्छा, तामिस्र म्हणजे भोगाच्या इच्छेचा भंग झाला असतां रागावणें, अन्धतामिस्र म्हणजे भोग्यवस्तूंचा नाश झाला असतां आपणच नष्ट झालों असें मानणें. ह्याच पांच वृत्तींना 'पञ्चपर्वा अविद्या' असें म्हणतात. पातंजल योगसूत्रांत 'अविद्याऽस्मितारागद्वेषाभिनिवेशाः पंच क्लेशाः' अशीं त्यांचीं नांवें दिलीं आहेत. १० व्या अध्यायांत अविद्या उत्पन्न करणारा तामस सर्ग म्हणून जो ६ वा सर्ग सांगितला तोच हा होय.

हे देवश्रेष्ठा, तूं एखाद्या दुःखी मुलाप्रमाणें रडलास, यास्तव तुला लोक रुद्र या नांवानें हाक मारितील ॥ १० ॥ हृदय, इन्द्रियें, प्राण, आकाश, वायु, अग्नि, जल, पृथ्वी, सूर्य, चंद्र व तप हीं स्थानें तुला राहण्यासाठीं म्हणून मीं पूर्वींच सिद्ध करून ठेविलीं आहेत ॥ ११ ॥ ( आतां तुझ्या नांवांविषयीं म्हणशील तर ) मन्यु, मनु, महिनस, महान्, शिव, ऋतुध्वज, उग्ररेता, भव, काल, वामदेव आणि धृतव्रत हीं तुझीं अकरा नांवें होत ॥ १२ ॥

हे रुद्रा, धी, वृत्ति, उशना, उमा, नियुत्सर्पि, इला, अम्बिका, इरावती, सुधा, दीक्षा व रुद्राणी, ह्या तुझ्या स्त्रिया होत ॥ १३ ॥ रुद्रा, या नांवांचा आणि स्थानांचा स्वीकार करून तूं आपल्या या स्त्रियांसह पुष्कळ प्रजा निर्माण कर. कारण तूं प्रजापतिच आहेस ॥ १४ ॥ विदुरा, याप्रमाणें ब्रह्मदेवानें आज्ञा दिल्यावर त्या भगवान् नीललोहितानें, बलानें, रूपानें आणि शीलानें आपल्याला शोभणारी अशी प्रजा निर्माण केली ॥ १५ ॥

रुद्रानें उत्पन्न केलेल्या त्या असंख्य उग्र प्रजा जिकडेतिकडे पसरल्या आणि जगाला ग्रासून टाकूं लागल्या; तेव्हां त्यांना पाहून ब्रह्मदेवाच्या मनांत भीति उत्पन्न झाली ॥ १६ ॥ रुद्राला तो म्हणाला — हे देवश्रेष्ठा, ह्या ज्या अशा प्रजा तूं उत्पन्न केल्यास त्या आतां पुरे झाल्या. कारण त्या आपल्या उग्र नेत्रांच्या तेजानें मला व दशदिशांना जाळून टाकूं लागल्या आहेत. ॥ १७ ॥ तुझें कल्याण असो. आतां तूं सर्व प्राण्यांना सुख होईल अशी तपश्चर्या कर; म्हणजे, तपोबलानेंच पूर्वीप्रमाणें हें जग निर्माण करण्याचें सामर्थ्य तुला प्राप्त होईल ॥ १८ ॥

विदुरा, भगवान् परमात्मा तेजोरूप असून सर्व प्राण्यांच्या हृदयांत वास करीत असतो. त्याच्या स्वरूपाचें ज्ञान इन्द्रियांनीं होत नाहीं; पण तपश्चर्येच्या योगानें मात्र पुरुषाला त्याची सहज प्राप्ति करून घेतां येते ॥ १९ ॥

एवढें सांगून मैत्रेयऋषि म्हणाले–विदुरा, याप्रमाणें ब्रह्मदेवानें रुद्रास आज्ञा केली असतां वेदवाणींचा स्वामी, अशा त्या ब्रह्मदेवाला त्यानें प्रदक्षिणा केली, आणि ठीक आहे, असें म्हणून व त्याचा निरोप घेऊन तो तपश्चर्येकरितां अरण्यांत गेला ॥ २० ॥ तो गेल्यावर ब्रह्मदेव पुनः सृष्टि उत्पन्न करण्याचा विचार करूं लागला. भगवन्तानें त्याला सृष्टि उत्पन्न करण्याची शक्ति दिलेलीच होती, तिच्या योगानें सृष्टीचा विस्तार करणारे असे दहा पुत्र जन्मास आले ॥ २१ ॥

मरीचि, अत्रि, अंगिरा, पुलस्त्य, पुलह, क्रतु, भृगु, वसिष्ठ, दक्ष आणि नारद असे ते दहा पुत्र होत* ॥ २२ ॥ त्यांत ब्रह्मदेवाच्या मांडीपासून नारद झाला. अंगुष्ठापासून दक्ष, प्राणापासून वसिष्ठ, त्वचेपासून भृगु, हातापासून क्रतु उत्पन्न झाला ॥ २३ ॥ नाभीपासून पुलह उत्पन्न झाला व पुलस्त्य ऋषि कर्णापासून, अंगिरा मुखापासून, अत्रि नेत्रापासून आणि मरीचि मनापासून उत्पन्न झाला ॥ २४ ॥

---

* हे दहा प्रजापति होत. यांपासून पुढें नानाप्रकारच्या प्रजा उत्पन्न झाल्या.

विदुरा, ज्याच्या ठिकाणीं साक्षात् नारायण वास करतो, तो धर्म, ब्रह्मदेवाच्या उजव्या स्तनापासून व लोकांना मृत्यूचें भय उत्पन्न करण्याला कारणीभूत असा अधर्म त्याच्या पाठीपासून उत्पन्न झाला ॥ २५ ॥ त्याच्या हृदयांत काम उत्पन्न झाला व भुंवयांपासून क्रोध आणि अधरोष्ठापासून लोभ, हे झाले. त्याच्या मुखापासून वाणी उत्पन्न झाली व शिश्नापासून नद्या आणि गुदद्वारापासून निर्ऋति यांची उत्पत्ति झाली. हा निर्ऋति म्हणजे केवळ पापांचा ठेवाच होय ॥ २६ ॥ ब्रह्मदेवाच्या छायेपासून महासमर्थ कर्दम ऋषि उत्पन्न झाले. हा देवहूतीचा पति होय. याप्रमाणें ब्रह्मदेवाच्या मनापासून व देहापासून हें सर्व जग निर्माण झालें ॥ २७ ॥

विदुरा, ब्रह्मदेवाची कन्या जी सरस्वती ती रूपानें फार सुंदर व मनोहर होती. ती स्वतः कामविरहित होती, तरी तिला पाहून ब्रह्मदेवाला काम उत्पन्न झाला व तिचा तो अभिलाष करूं लागला, असें आमच्या ऐकण्यांत आलें आहे ॥ २८ ॥ याप्रमाणें आपल्या पित्याची बुद्धि अधर्माकडे प्रवृत्त झाली आहे असें पाहून ब्रह्मदेवाचे पुत्र असे ते मरीचिप्रमुख ऋषि ( आपण सांगितलें असतां पिता ऐकेल ) अशा विश्वासानें त्याला बोध करूं लागले ॥ २९ ॥ ते म्हणाले,—हे तात, तुम्ही समर्थ आहां व कामविकार आवरून धरण्याचें सामर्थ्य आपल्यामध्यें आहे. तथापि तसें न करतां कन्येशीं गमन करण्याची तुम्हीं जी इच्छा केली, तसें कृत्य तुमच्या पूर्वजांनीं केलें नाहीं व तुमच्यानंतर येणारेहि कोणी करणार नाहींत ॥ ३० ॥

हे तात, आपण त्रैलोक्याचे गुरु आहांत. थोर पुरुषांना सुद्धां ही गोष्ट कीर्तिवर्धक होणारी नाहीं; मग इतरांना कोठून होईल बरें ? कारण थोर पुरुषांचें वर्तन पाहूनच इतर लोक कल्याणप्राप्ति करून घेत असतात ॥ ३१ ॥ ( अशी पित्याला विनंति करून ते प्रजापति परमेश्वराची प्रार्थना करूं लागले. ते म्हणाले, ) ' परमेश्वरा, तूं आपल्या स्वरूपांत लीन असलेलें हें जग आपल्या तेजानें व्यक्त केलेंस, तुला नमस्कार असो. याप्रमाणें धर्माचें रक्षण करण्यास तूंच समर्थ आहेस ' ॥ ३२ ॥ आपले पुत्र असे ते सृष्टिकर्ते मनु आदिकरून प्रजापति आपल्यापुढें याप्रमाणें उपदेशपर भाषण करीत आहेत, असें पाहून ब्रह्मदेवाला लाज वाटली आणि त्यानें आपला देह टाकून दिला ॥ ३३ ॥ टाकून दिलेल्या त्या त्याच्या निंद्य देहाचा दिशांनीं स्वीकार केला. विदुरा, तमोरूप धुकें ज्याला म्हणतात, तें हें ब्रह्मदेवाचें शरीरच होय. असो. पुढें एकदां सृष्टि करणारा तो ब्रह्मदेव, पूर्वीप्रमाणें हे विविध लोक सुव्यवस्थितपणें असे आपल्याला असे उत्पन्न करतां येतील, याचा विचार करीत बसला असतां, त्याच्या चार मुखांतून चार वेद उत्पन्न झाले ॥३४॥ तसेंच उपवेद व न्याय यांसह, होता, अध्वर्यु, उद्गाता व ब्रह्मा, त्यांचीं कर्में, यज्ञांचा विस्तार, धर्माचे चार चरण आणि आश्रम व त्यांचे विशिष्ट आचार हेहि त्यांतूनच उत्पन्न झाले ॥ ३५ ॥

हें ऐकून विदुरानें विचारलें,—मैत्रेयऋषे, तपश्चर्या हेंच आपलें धन होय, असें मानणारे तुम्हीं आहां. प्रजापतींचा स्वामी असा जो ब्रह्मदेव त्याच्या मुखांतून वेद

आदिकरून उत्पन्न झाले असें तुम्हीं सांगितलें खरें; पण कोणत्या मुखांतून कोणकोणते वेद, उपवेद इत्यादि उत्पन्न झाले, तें मला सांगा ॥ ३६ ॥

मैत्रेय ऋषि म्हणाले—विदुरा ! पूर्व, पश्चिम, उत्तर व दक्षिण अशा चार दिशांकडील जीं चार ब्रह्मदेवाचीं मुखें त्यांतून क्रमानें ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद व अथर्ववेद हे उत्पन्न झाले. तसेंच शस्त्र[1], इज्या[2], स्तुतिस्तोम[3] व प्रायश्चित्त[4] हीं चार क्रमानें त्याच्या पूर्वादि चार मुखांतून उत्पन्न झालीं ॥ ३७ ॥ तसेंच ब्रह्मदेवानें आपल्या पूर्वादिक मुखांनीं अनुक्रमानें वैद्यशास्त्र, शस्त्रविद्या, गायनविद्या व कलाकौशल्य हे चार उपवेद उत्पन्न केले ॥ ३८ ॥ त्याला सर्वच पदार्थांचें ज्ञान होतें, तेव्हां त्यानें पांचवा वेद म्हणजे इतिहास व पुराणें हीं सर्वच आपल्या इतर मुखांतून उत्पन्न केलीं ॥ ३९ ॥

षोडशी व उक्थ हे याग त्याच्या पूर्वेकडील मुखांतून उत्पन्न झाले व चयन आणि अग्निष्टोम, आप्तोर्याम आणि अतिरात्र व गोसव आणि वाजपेय हे दोन दोन याग इतर तीन मुखांतून क्रमानें उत्पन्न झाले ॥ ४० ॥ अध्यात्मविद्या, दया, तपश्चर्या व सत्य हे धर्माचे चार चरण, तसेंच उपजीविकेच्या साधनांसह चार आश्रम हे अनुक्रमानें त्याच्या चारी मुखांतून निर्माण झाले ॥ ४१ ॥ सावित्र[5], प्राजापत्य, ब्राह्म व बृहत् हे चार ब्रह्मचर्याचे भेद व वार्ता, संचय,[6] शालीन व शिलोञ्छ हीं चार गृहस्थाश्रम्याच्या उपजीविकेचीं साधनें सुद्धां क्रमानें त्याच्या चार मुखांतून उत्पन्न झालीं ॥ ४२ ॥

---

१ अप्रगीतमन्त्रसाध्या स्तुतिः शस्त्रम्—यज्ञामध्यें गायन केल्याशिवाय मन्त्र म्हणून जी देवतास्तुति करतात, त्या स्तुतीचें नांव शस्त्र होय. हें काम **होता** नांवाच्या ऋत्विजाचें असतें.

२ हवन, पूजन इत्यादिक करणें ह्याला 'इज्या' म्हणतात. हें काम अध्वर्यु नामक ऋत्विजाचें होय. ३ गायन करीत ऋचा म्हणणें ह्याला **स्तुतिस्तोम** म्हणतात. हें काम 'उद्गाता' नामक ऋत्विज करीत असतो. ४ केलेल्या कर्मांत कमीजास्त प्रकार झाला तर त्या दोषाच्या निवृत्तीकरितां जें कर्म करितात, त्यास 'प्रायश्चित्त' म्हणतात. हें काम 'ब्रह्मा' नामक ऋत्विजाचें होय.

५ उपनयनाच्या दिवसापासून तीन दिवस गायत्रीचें अध्ययन करीत असतां ब्रह्मचर्यानें राहणें म्हणजे **सावित्र**, एक वर्षपर्यंत ब्रह्मचर्यव्रत धारण करणें यास **प्राजापत्य**, वेदाध्ययन संपूर्ण होईपर्यंत ब्रह्मचर्य धारण करणें यास **ब्राह्म** व मरेपर्यंत ब्रह्मचर्यानें राहणें यास **बृहत्** म्हणतात.

६ निषिद्ध नसलेलीं शेतकी इत्यादि कामें करून उपजीविका करणें यास **वार्ता**, दुसऱ्याकडून यज्ञयागादि करवून मिळालेल्या धनावर उपजीविका करणें यास **संचय**, न मागतां मिळेल त्यावर निर्वाह करणें यास **शालीन** व धन्यानें शेतांतील धान्य नेल्यावर राहिलेलीं कणसें किंवा बाजार इत्यादि ठिकाणीं पडलेलें धान्याचे कण वेंचून आणून निर्वाह करणें यास **शिलोञ्छ** म्हणतात.

÷ वैखानस, वालखिल्य, औदुम्बर व फेनप असे वानप्रस्थांचे चार भेद आहेत. तसेच संन्यासाचेहि कुटीचक्र, * बव्होद, हंस व निष्क्रिय असे चार भेद आहेत ॥४३॥ ( हे वानप्रस्थांचे आणि संन्याश्यांचे भेद ) त्याप्रमाणेंच अध्यात्मविद्या, तीन वेद, कृषिकर्मादि उद्योग आणि राजकारणशास्त्र या चार विद्या, आणि भू, भुवः, स्वः आणि भूर्भुवस्वः या चार व्याहृतिहि त्याच्या पूर्वादिक मुखांतून क्रमानें उत्पन्न झाल्या व त्याच्या हृदयापासून ओंकार उत्पन्न झाला ॥ ४४ ॥ ब्रह्मदेवाच्या केंसांपासून उष्णिक्छन्द उत्पन्न झाला, सर्वव्यापक अशा त्याच्या त्वचेपासून गायत्री छन्द झाला, मांसापासून त्रिष्टुप् छन्द व स्नायूंपासून जगती छन्द उत्पन्न झाला ॥ ४५ ॥

ब्रह्मदेवाच्या मज्जेपासून पंक्तिनामक छन्द व प्राणापासूत बृहतीछन्द उत्पन्न झाला. स्पर्शनामक[१] वर्ण हे ब्रह्मदेवाचा जीव, आकाशादि स्वर[२] हे त्याचा देह होत, असें म्हटलें आहे ॥ ४६ ॥ उष्मवर्ण[३] हे ब्रह्मदेवाचीं इंद्रियें असून अंतस्थ[४] वर्ण म्हणजे त्याचें बल होय असें म्हणतात. ह्याच्या क्रीडेपासून षड्जादि सात स्वर[५] उत्पन्न झाले ॥ ४७ ॥

शब्दब्रह्म हेंच ब्रह्मदेवाचें शरीर होय. स्पष्टोच्चार करणारी वैखरी वाणी व प्रणवनामक अहंकार हीं दोन्ही व्यक्त आणि अव्यक्त अशीं ब्रह्मदेवाचीं स्वरूपेंच होत. अशा त्या ब्रह्मदेवाला, परमेश्वर हा अविकृत ब्रह्मस्वरूपी सर्वत्र भरलेला व विविधशक्तींनीं युक्त असा प्रत्ययास येतो ॥ ४८ ॥

---

÷ जमीन खणल्यानांगरल्यावांचून तींत सहज उत्पन्न झालेल्या पदार्थावर जे निर्वाह करतात ते **वैखानस**, नवें अन्न मिळाल्यावर जुन्या सांठवून ठेविलेल्या अन्नाचा जे सद्व्यय करतात ते **वालखिल्य**, सकाळीं उठल्याबरोबर ज्या दिशेकडे दृष्टि जाईल त्या दिशेकडून फळें, फुलें इत्यादि आणून जे निर्वाह करतात ते **औदुम्बर** व आपोआप गळलेलीं फळें वगैरे खाऊन जे निर्वाह करतात ते **फेनप** होत.

* **कुटीचक्र** म्हणजे आपल्या आश्रमाला सांगितलेली कर्में मुख्यत्वें आचरण करून असणारा, **बव्होद** म्हणजे आवश्यक अथवा न केलीं असतां प्रत्यवाय लागतो तीं कर्में करून मुख्यत्वें ज्ञानाभ्यास करणारा; **हंस** म्हणजे कर्म मुळींच न करतां फक्त ज्ञानाभ्यास करणारा आणि **निष्क्रिय** म्हणजे ज्याला ब्रह्मज्ञान झालें तो. असे संन्याशांचे चार भेद आहेत.

१ कपासून मपर्यंत पांच वर्गांतील वर्णांस स्पर्श म्हणतात. २ अ, इ, उ, ऋ, ऌ, ए, ऐ, ओ, औ ह्यांस स्वर म्हणतात. ३ श, ष, स, ह यांना ऊष्मवर्ण म्हणतात. ४ य, र, ल, व यांना अंतस्थवर्ण म्हणतात. ५ षड्ज, ऋषभ, गांधार, मध्यम, पंचम, धैवत व निषाद हे गायनशास्त्रांतील सात स्वर होत.

असो. नंतर ब्रह्मदेवानें दुसरें शरीर धारण केलें आणि पुनः सृष्टि करण्याच्या कामीं आपलें मन लावलें, त्या वेळीं आपण पूर्वी उत्पन्न केलेले ऋषिरूप प्रजापति हे महासामर्थ्यवान् असतांहि त्याची उत्पत्ति अगदीं अल्प आहे असें पाहून तो ब्रह्मदेव आपल्या मनांत पुनः विचार करूं लागला ॥ ४९ ॥ तो म्हणाला, काय हो हें आश्चर्य ! मी सृष्टिकर्मांत एकसारखा गुंतलों असतांहि माझ्या प्रजांची ज्या अर्थी वाढ होत नाहीं, त्या अर्थी येथें दैवच खरोखर आडवें येत असावें ॥ ५० ॥ याप्रमाणें यथायोग्य पद्धतीनें सृष्टिकार्य करीत असतां व प्रारब्धाचाहि विचार करीत असतां, ब्रह्मदेवाच्या शरिराचे दोन भाग झाले. त्याला 'काय' असें म्हणतात ॥ ५१ ॥ त्याच्या शरिराच्या त्या दोन विभागांपासून एक स्त्रीपुरुषांची जोडी उत्पन्न झाली. त्या दोहोंमध्यें जो पुरुष होता, तो स्वयंभू अशा ब्रह्मदेवाचा पुत्र म्हणून स्वायंभुवमनुनामक राजा झाला व जी स्त्री होती ती शतरूपा नांवानें त्या महात्म्या मनुराजाची पट्टराणी झाली ॥ ५२ ॥ विदुरा, तेव्हांपासून मैथुनानें प्रजा वाढूं लागल्या व मनुराजानेंहि आपल्या शतरूपास्त्रीच्या ठिकाणीं पांच अपत्यें उत्पन्न केलीं ॥ ५३ ॥ हे साधुश्रेष्ठा विदुरा, प्रियव्रत व उत्तानपाद हे दोन पुत्र व आकूति, देवहूति व प्रसूति अशा तीन कन्या हीं तीं पांच अपत्यें होत ॥ ५४ ॥ स्वायंभुव मनूनें आपली आकूतिनामक कन्या रुचिऋषीला, मधली देवहूति कर्दमऋषीला व कनिष्ठ कन्या प्रसूति दक्षप्रजापतीला दिली. त्यांच्याच संततीनें हें जग भरून गेलें आहे * ॥ ५५ ॥

---

+ स्वायंभुव मनूच्या वंशाचा पुढील वृत्तांत ४ थ्या स्कंधांत सांगितला आहे.

**बारावा अध्याय समाप्त**

---

# अध्याय १३ वा

शुकाचार्य म्हणाले—राजा, मैत्रेय ऋषि याप्रमाणें सांगत असतां त्यांचें पुण्यकारक भाषण ऐकून विदुरानें त्यांना पुनः प्रश्न केला; कारण श्रीकृष्णाच्या अमृतासारख्या गोड कथा ऐकण्याची त्याला फारच उत्कंठा वाटत होती ॥ १ ॥

तो म्हणाला—ऋषे, ब्रह्मदेवाचा आवडता पुत्र असा जो सार्वभौम राजा मनु, त्यानें आपल्या मनाजोगी स्त्री प्राप्त झाल्यावर पुढें काय केलें? ॥ २ ॥ हे साधुश्रेष्ठ मुने, हा स्वायंभुवमनु पहिलाच राजा व राजर्षि होता. तेव्हां त्याचें चरित्र तुम्हीं मला सांगा. मला तें ऐकण्याविषयीं उत्कट इच्छा आहे. कारण तो स्वायंभुव राजा मोठा भगवद्भक्त होता ॥ ३ ॥ आपल्या हृदयांत श्रीहरीचें चरणकमल नित्य ठेवणारे जे भक्त आहेत, त्यांच्या गुणांचें कीर्तन आपल्या कानांनीं वारंवार ऐकणें, हेंच पुरुषांनीं पुष्कळ काल श्रम करून संपादन केलेल्या शास्त्राध्ययनाचें मुख्य फल होय, असें विद्वानांनीं वर्णन केलें आहे ॥४॥ शुकाचार्य म्हणाले,—राजा, श्रीकृष्ण विदुराच्या मांडीवर पाय ठेवून बसत असे, ( इतकें त्यांचें प्रेम होतें ). अशा त्या श्रीकृष्णाच्या कथा सांगण्याविषयीं विदुरानें मैत्रेयमुनींना जेव्हां नम्रपणें विनंति केली, तेव्हां साहजिकच मैत्रेयांना त्या सांगण्याची स्फूर्ति झाली आणि त्याच्या शरिरावर आनंदानें रोमांच उभे राहून ते विदुराला उत्तर देऊं लागले ॥ ५ ॥ ते म्हणाले, विदुरा, स्वायम्भुवमनु आपल्या स्त्रीसह जेव्हां उत्पन्न झाला, तेव्हां तो हात जोडून नम्रतेनें ब्रह्मदेवाला म्हणाला ॥ ६ ॥

हे भगवन्, सर्व प्राण्यांना उत्पन्न करून त्यांना निर्वाहाचीं साधनें पुरविणारा आणि आचारधर्म लावून देणारा तूंच एक पिता आहेस. असें असतांहि तुझी संतति असे जे आम्ही, त्यांना तुझी सेवा कशानें घडेल? ( हें कांहीं समजत नाहीं ) ॥ ७ ॥ भगवन्, आपण स्तुतीला सर्वथैव पात्र आहांत. आम्ही तुम्हांला नमस्कार करतों. आमच्या हातून होण्यासारखीं जीं कार्यें आहेत, त्यांतून कोणतें कर्म केलें असतां आम्हांला या लोकीं जिकडेतिकडे कीर्ति प्राप्त होऊन परलोकीं सद्गति मिळेल तें सांगा ॥ ८ ॥

स्वायंभुव मनूचा हा प्रश्न ऐकून ब्रह्मदेव म्हणाला;—"बाळा, आतां तूं या पृथ्वीचा स्वामीच आहेस. तुम्हां उभयतांचें कल्याण असो! 'मला उपदेश करा' अशी जी तूं निष्कपट अंतःकरणानें विनंति केलीस, तीमुळें मीं संतुष्ट झालों आहें ॥ ९ ॥ हे वीरा मनो, पुत्रांनीं पित्याची सेवा करावयाची म्हणजे मत्सरबुद्धि * सोडून नम्रतेनें त्याची शक्त्यनुसार आदरपूर्वक आज्ञा पाळावयाची एवढेंच ॥ १० ॥ असो. आतां तूं गुणांनीं

* प्रथम उत्पन्न केलेल्या सनकादिकांनीं प्रजोत्पत्ति केली नाहीं, मग आम्हींच ती कां करावी? ही भाऊबंदकीची मत्सरबुद्धि ( श्रीधर ).

आपल्याला अनुरूप अशीं अपत्यें आपल्या शतरूपेच्या ठिकाणीं निर्माण कर आणि पृथ्वीचें धर्मानें पालन कर. तसेंच यज्ञ करून परमेश्वराची पूजाहि कर ॥ ११ ॥ तूं पृथ्वीचा राजा आहेस, यास्तव प्रजेचें नीट रक्षण केलेंस म्हणजे त्यांतच माझी अत्युत्तम सेवा केल्याचें श्रेय तुला मिळेल आणि या प्रजापालनव्रताच्या योगानें भगवान् परमात्मा तुझ्यावर नित्य संतुष्ट राहील ॥ १२ ॥ यज्ञस्वरूपी असा सर्वान्तर्यामी भगवान् ज्यांच्यावर प्रसन्न झाला नाहीं, त्यांचे श्रम निष्फल होत. कारण, सर्वान्तर्यामी अशा भगवन्ताचा अनादर म्हणजे आपलाच अनादर होय.'' ॥ १३ ॥

असें ब्रह्मदेवाचें भाषण ऐकून मनु म्हणाला,—'हे भगवन्, तुम्हीं सर्व पाप दूर करणारे आहां. मी सर्वथा तुमच्या आज्ञेप्रमाणें वागेन; पण मला आणि माझ्या प्रजांना राहण्यास योग्य असें स्थान जी पृथ्वी ती तर पाण्यांत बुडून गेली आहे. देवा, तरी त्या भूदेवीला वर काढण्याचा प्रयत्न करावा' ॥ १४ ॥ १५ ॥

मैत्रेय म्हणाला,—विदुरा, ब्रह्मदेवानें पाहिलें तों स्वायम्भुव मनु म्हणाला त्याप्रमाणें पृथ्वी पाण्यांत बुडालेली होती. तेव्हां तिला वर कशी काढतां येईल याबद्दल तो आपल्या मनाशीं बराच वेळ विचार करीत राहिला. ॥ १६ ॥ तो म्हणाला,— 'मी सृष्टि उत्पन्न करूं लागलों असतां पृथ्वी तर पाण्यांत बुडून रसातळाला गेली ! ईश्वरानें सृष्टि उत्पन्न करण्याच्या कामीं आमची योजना केली खरी; पण आतां येथें आम्हीं तरी काय करावें ? ज्याच्या हृदयापासून मी उत्पन्न झालों, तो ईश्वरच कांहीं तरी उपाययोजना आतां करील तर बरें ॥ १७ ॥ विदुरा, अशा रीतीनें ब्रह्मदेव विचार करीत बसला असतां एकाएकीं त्याच्या नाकपुडींतून अंगठ्याएवढ्या आकाराचें एक वराहाचें पिल्लूं बाहेर पडलें ॥ १८ ॥

हे भरतकुलोत्पन्ना विदुरा, आपल्या नाकांतून काय बाहेर पडलें, म्हणून ब्रह्मदेव पाहूं लागला असतां, आकाशांत संचार करीत असलेलें तें वराहाचें पिल्लूं वाढून क्षणांत हत्तीएवढें झालें व तें पाहून ब्रह्मदेवादिकांना मोठें आश्चर्य वाटलें ॥ १९ ॥ मरीचिप्रभृति ब्राह्मण, सनत्कुमार आणि मनु या सर्वांनीं तें वराहाचें विलक्षण रूप पाहून तें काय असावें याविषयीं अनेक कल्पना केल्या ॥ २० ॥ ब्रह्मदेव म्हणाला,—वराहाच्या रूपानें येथें आलेला हा लोकविलक्षण प्राणी आहे तरी कोण ? काय हो आश्चर्य सांगावें ? हा प्राणी माझ्या नाकांतून बाहेर पडला ! ॥ २१ ॥

हा प्रथम आंगठ्याच्या अग्राइतका दिसत होता; पण क्षणांत तो प्रचंड शिलेएवढा झाला ! हा यज्ञस्वरूपी भगवानच प्रत्यक्ष असून माझ्या मनाला मोह तर पाडीत नसेल ना ? ॥ २२ ॥ याप्रमाणें आपल्या पुत्रांसहवर्तमान ब्रह्मदेव नाना प्रकारचे तर्क करीत असतां त्या वराहस्वरूपी यज्ञपुरुष भगवन्तानें आपलें शरीर मोठ्या पर्वताएवढें करून एक गर्जना ठोकली ॥ २३ ॥ सर्वव्यापी अशा त्या परमेश्वराच्या गर्जनेनें साऱ्या दिशा दणाणून गेल्या आणि ती गर्जना ऐकून ब्रह्मदेव आणि सनकादि सर्व श्रेष्ठ ऋषि

यांना मोठा हर्ष झाला ॥ २४ ॥ मग जन, तप आणि सत्य या तीन लोकांत राहणाऱ्या ऋषींना हा प्राणी कोण असावा अशा संशयामुळें जो खेद उत्पन्न झाला होता, तो त्या मायामय वराहाची गर्जना ऐकून दूर झाला आणि पवित्र अशा तीन्ही वेदांतील मंत्रांनीं त्यांनीं त्या वराहरूपाची स्तुति केली ॥ २५ ॥ वेद ज्याच्या स्वरूपाची स्तुति करितात अशा त्या आदिवराहानें ब्रह्मदेवप्रभृति साधूंनीं उच्चारलेले स्वतःचें गुणकीर्तन करणारे ते वेदरूपी मंत्र श्रवण केले आणि देवांच्या उत्कर्षाकरितां पुनः एक वेळ गर्जना करून तो गजराजाप्रमाणें लीला करीत पाण्यांत शिरला ॥ २६ ॥

आपलें पुच्छ वर करून अंतराळांत संचार करीत असतां मानेवरील आयाळ तो सारखी हालवीत होता. त्याचें अंग कठीण असून त्यावरील केंस राठ आणि कावडी जाड होती. आपल्या खुरांनीं तो मेघांवर आघात करीत असून त्याच्या दाढा पांढऱ्या शुभ्र आणि दृष्टि तेजस्वी होती. असा तो वराहरूपी भगवान् पृथ्वीला वर काढण्यासाठीं अवतरला असतां शोभूं लागला ॥ २७ ॥ तो प्रत्यक्ष यज्ञस्वरूप असा परमेश्वर असतांहि वराहरूपानें अवतरल्यामुळें पृथ्वी कोठें आहे तें पाहण्यासाठीं हुंगीत हुंगीत तो तिचा शोध करूं लागला. त्याच्या दाढा तीक्ष्ण होत्या; तथापि आपली स्तुति करणाऱ्या त्या सनकादि ऋषींकडे तो सौम्य दृष्टीनें पाहत होता. त्यांच्याकडे एकवार दृष्टि फेंकून तो उदकांत शिरला ॥ २८ ॥

त्याचें शरीर वज्रासारखीं तीक्ष्ण शिखरें असलेल्या पर्वतासारखें होतें. त्यानें वेगानें पाण्यांत उडी घेतांच, त्या उडीच्या वेगानें समुद्राच्या कुशी विदीर्ण झाल्यामुळें तो गर्जना करूं लागला आणि दुःखानें व्याकुळ होऊनच कीं काय, आपले लाटारूपी लांब बाहू पसरून 'हे यज्ञपुरुषा, माझें रक्षण कर !' असा आक्रोश करूं लागला ॥ २९ ॥

त्या आदिवराहाच्या पायांना तीन पेरें * असून त्यांचे खूर म्हणजे लांब पात्याचे जणूं बाणच होते. त्या अपरंपार पाण्याचा तळ लागेल अशा वेगानें त्यानें आपल्या पायांच्या खुरांनीं तें जेव्हां कापीत नेलें, तेव्हां रसातळांत असलेली पृथ्वी त्याच्या दृष्टीस पडली. पूर्वी उदकांत शयन करण्यास तो सिद्ध झाला असतां सर्व भूतांना आधारभूत असलेली पृथ्वी त्यानें आपल्या उदरांतच धारण केलेली होती. ( अर्थात् तिला वर काढणें ही गोष्ट त्याला सहज साध्य होती ) ॥ ३० ॥ त्यानें उदकांत बुडालेल्या पृथ्वीला आपल्या दाढेनें वर उचलिलें आणि तिला घेऊन तो रसातलांतून वर आला. त्या वेळीं त्याची शोभा फारच रमणीय दिसत होती; पण इतक्यांत त्या पाण्यांतच हिरण्याक्षनामक दैत्य गदा घेऊन त्याच्या अंगावर चालून आला आणि त्याला प्रतिबन्ध करूं लागला. तेव्हां त्याला मोठा

---

* पेर म्हणजे सांधा. वस्तुतः पायाला दोन सांधे असतात. परंतु हा वराह यज्ञस्वरूप असल्यामुळें प्रातःसवन, माध्याह्नसवन आणि सायंसवन या तीन सवनांना अनुलक्षून त्याला तीन पेरें मानिलीं आहेत किंवा मांडीचा वरचा सांधा, ढोंपर आणि खुरांजवळचा सांधा हे तीन सांधे समजावे.

क्रोध आला व तो सुदर्शनचक्रानें अधिकच प्रदीप्त केला, तेव्हां वराहरूप भगवन्तानें महापराक्रमी अशा त्या हिरण्याक्ष दैत्याला, सिंहानें हत्तीस मारावें त्याप्रमाणें, सहज लीलेनें ठार मारिलें. त्या वेळीं, एखादा गजराज आपल्या दातांनीं पृथ्वी उकरीत असतां मातीनें त्याचीं गंडस्थळें जशीं लाल होतात, त्याप्रमाणें हिरण्याक्षाच्या रक्तानें त्या आदिवराहाचें तोंड व गंडस्थळें हीं लाल झालीं ॥ ३१ ॥ ३२ ॥ हत्ती ज्याप्रमाणें एखादी वस्तु सोंडेनें सहज उचलतो, त्याप्रमाणें तमालपुष्पाप्रमाणें नीलवर्ण शरिराच्या त्या वराहानें आपल्या पांढऱ्या शुभ्र दाताच्या टोंकानें पृथ्वीला उचलून वर काढिलें. त्या वेळीं त्या भगवन्ताच्या स्वरूपाची ब्रह्मदेवादिकांना ओळख पटून ते वेदसूक्तांनीं त्याची स्तुति करूं लागले ॥ ३३ ॥ ते म्हणाले,—हे अजिंक्य भगवन्, तुम्ही यज्ञांनींच संतुष्ट होणारे आहां. तीन वेद हेंच तुमचें शरीर असून तुम्ही तें डोलवीत आहां. तुम्हांला आमचा नमस्कार असो. तुमच्या शरिरावरील रोमरंध्रांमध्यें यज्ञ लीन झालेले असून, हें वराहशरीर तुम्हीं या प्रसंगीं पृथ्वीचा उद्धार करण्यासाठींच धारण केलें आहे. तुम्हांला आमचें वंदन असो ! ॥ ३४ ॥

हे ईश्वरा, हें जें तुझें यज्ञरूप वराहशरीर आहे, तें पापी पुरुषांच्या दृष्टीस पडणें फार कठीण आहे. या तुझ्या शरिराच्या त्वचेच्या ठिकाणीं गायत्री, उष्णिक् आदिकरून सर्व छन्द आहेत. तुझ्या केंसांत दर्भ असून दृष्टीच्या ठिकाणीं घृत आहे व होता, अध्वर्यु, उद्गाता आणि ब्रह्मा ह्या चौघांचीं कर्में तुझ्या चरणांच्या ठिकाणीं आहेत ॥ ३५ ॥ हे ईश्वरा, तुझ्या मुखांत जुहू आहे, नाकपुड्यांच्या ठिकाणीं स्रुवा, उदरांत इडा, कर्णांच्या छिद्रांत चमस, मुखांत प्राशित्र व घशांत ग्रह आहेत. हे ईश्वरा, तुझें चर्वण हेंच अग्निहोत्र होय ॥ ३६ ॥

हे ईश्वरा, यज्ञामध्यें दीक्षा घेण्यासाठीं जी इष्टि करितात, ती म्हणजे तुझे निरनिराळे अवतार होत. उपसद्नामक ज्या तीन इष्टि, त्या तुझी ग्रीवा होत. प्रायणीय नांवाची दीक्षा विधीनंतर करावयाची इष्टि व उदनीयनामक यज्ञसमाप्तीच्या वेळीं करावयाची इष्टि या तुझ्या दाढा होत. प्रवर्ग्यपात्र[1] म्हणजे तुझी जिव्हा असून सभ्य[2] व आवसथ्य हे दोन अग्नि तुझें मस्तक होत आणि [3]चिति ह्या तुझे प्राण होत ॥ ३७ ॥ हे ईश्वरा, सोमरस तुझें रेत होय. सत्रनें हीं तुझें आसन, अग्निष्टोम[4] आदिकरून यज्ञसंस्था तुझ्या त्वचा वगैरे सप्तधातु, सर्व सत्रें हीं तुझ्या शरिरांतील सांधे आणि यज्ञ व क्रतु हे तुझें स्वरूप असून, त्यांतील अनुष्ठानें हीं तुझ्या सांध्यांचीं बन्धनें होत ॥ ३८ ॥

---

१ हें एक पात्र आहे. हें तापवून लाल झाल्यावर त्यांत तूप टाकून मग शेळीचें दूध घालावयाचें असतें. ह्याला **महावीर** असेंहि म्हणतात. २ यज्ञांतील होमरहित अग्नीला सभ्य व ज्यावर होम करावयाचा असतो त्याला आवसथ्य म्हणतात. ३ कांहीं कर्मांकरितां विटा मांडणें याला चयन म्हणतात. ४ अग्निष्टोम, अत्यग्निष्टोम, उक्थ, षोडशी, वाजपेय, अतिरात्र व आप्तोर्याम ह्या नांवांच्या सात कर्मांना सप्तसंस्था म्हणतात. ह्या सप्तसंस्था मिळून ज्योतिष्टोम होतो.

सर्व मन्त्र, देवता आणि द्रव्यें हीं तुझेंच स्वरूप होत. तूं सर्व यज्ञस्वरूपी आहेस व यज्ञांतील सर्व कर्में हीं तुझींच रूपें आहेत. तुला आम्ही वारंवार नमस्कार करतों. वैराग्य, भक्ति व चित्तस्थैर्य यांच्या योगानें साक्षात् प्राप्त होणारें ज्ञान हें तरी तुझेंच स्वरूप असून तें ज्ञान देणारा गुरुहि तूंच आहेस. तुला आमचा नित्य नमस्कार असो ॥ ३९ ॥ हे भगवन्, जसा एखादा गजराज पाण्यांतून बाहेर पडत असतां त्यानें पानांसह तोडून घेतलेली कमलिनी त्याच्या दंतावर शोभते, त्याप्रमाणें तूं आपल्या दाढेच्या अग्रभागावर उचलून धरिलेली ही पृथ्वी तीवरील पर्वतांसह शोभत आहे ॥ ४० ॥

तीन वेदरूपी या आपल्या वराहशरीरावर तूं जी ही पृथ्वी दांतांनीं धारण केली आहेस, त्यामुळें, एखाद्या प्रचंड कुलपर्वताच्या शिखरावर मेघ येऊन बसला असतां त्याची जी शोभा दिसते, तशी तुझ्या शरिराचीहि शोभा दिसत आहे ॥ ४१ ॥ देवा, ही पृथ्वी तुझी पत्नी आहे. यास्तव स्थावरजंगम अशा सर्व वस्तूंना राहण्याकरितां या लोकमातेची नीट स्थापना कर. कारण तूं सर्वांचा पिता आहेस, तुझ्यासह या लोकमातेला आम्ही नमस्कार करतों. कारण याज्ञिक जशी अरणीमध्यें अग्नीची स्थापना करतात, त्याप्रमाणें पाठीवर धारण करण्याची आपली शक्ति तूं पृथ्वीच्या ठिकाणीं स्थापन केली आहेस ॥ ४२ ॥ हे प्रभो, तूं रसातळाला गेलेल्या पृथ्वीला वर काढिलेस; पण ही गोष्ट आपण करूंच असें म्हणणें तुझ्यावांचून दुसऱ्या कोणाला शक्य होतें? तथापि आम्हांला ही गोष्ट आश्चर्य-कारक मात्र वाटत नाहीं. कारण तूंच मुळीं सर्व आश्चर्यमय आहेस, व अतिशय आश्चर्य-युक्त असें हें विश्व तूंच आपल्या मायाशक्तीनें केलेलें आहेस ॥ ४३ ॥ ईश्वरा, तुम्ही आपलें हें वेदस्वरूपी शरीर हालवीत असतां तुमच्या केसांच्या टोकांवरून उडालेल्या पवित्र पाण्याचे बिन्दु आमच्यावर पडत आहेत व त्यामुळें आम्हांला स्नान घडून आम्ही हे जन, तप व सत्यलोक ह्या तीन्ही ठिकाणीं राहणारे लोक अत्यन्त पवित्र झालों आहों ॥ ४४ ॥ देवा, तुझ्या लीलांना अन्त नाहीं. म्हणून जो मनुष्य त्या लीलांचा अन्त जाणण्याची इच्छा करील त्याची बुद्धि भ्रष्ट झाली असेंच खरोखर म्हटलें पाहिजे. ईश्वरा, तुझ्या योगमायेच्या सत्त्व आदिकरून गुणांमुळें हें सर्व जग मोहित झालेलें आहे; तरी तुम्ही याचें कल्याण करा ॥ ४५ ॥

मैत्रेयऋषि म्हणाले — विदुरा, त्या ब्रह्मदेवप्रभृति वेदवेत्त्या ऋषींनीं ह्याप्रमाणें त्या वराहस्वरूपी परमेश्वराची स्तुति केली असतां, पृथ्वीचें रक्षण करणाऱ्या त्या आदिवराहानें आपल्या खुरांनीं खळबळलेल्या पाण्यांत पृथ्वीची नीट स्थापना केली ॥ ४६ ॥ याप्रमाणें तो सर्वव्यापी प्रजापालक भगवान् श्रीहरि पृथ्वीला लीलेनें रसातलांतून वर काढून आणि तिची त्या उदकांत नीट स्थापना करून तेथून निघून गेला ॥ ४७ ॥ श्रीहरि मनःपूर्वक सर्वांचीं संकटें दूर करणारा आहे; यास्तव त्याच्या अत्यंत कल्याणकारक अशा रमणीय कथा जो कोणी स्वतः श्रवण करतो किंवा दुसऱ्याला सांगतो, त्यावर श्रीहरि अंतःकरणापासून प्रसन्न होतो ॥ ४८ ॥ विदुरा, परमेश्वर संपूर्ण उपभोग्य वस्तु देण्यास समर्थ आहे. तेव्हां तो प्रसन्न

झाला असतां प्राण्याला कोणती वस्तु दुर्लभ राहील बरें ? पण त्या भोग्य वस्तु हव्या कशाला ? कारण परमेश्वर प्राण्यांच्या अंतःकरणांतच राहत असून जे कोणी त्याची एकनिष्ठेनें भक्ति करितात, त्या पुरुषांना तो स्वतः आपल्या स्थानाची प्राप्ति करून देतो॥४९॥ अहो, पुरुषार्थाचें रहस्य काय आहे हें जाणून पुराणकथांपैकीं भगवंताच्या अमृतारसाख्या मधुर कथा श्रवणेंद्रियानें एकदां भरपूर प्राशन केल्यावर संसाराला दूर सारणाऱ्या त्या कथांचा कंटाळा करील असा या जगांत मनुष्येतर प्राणीखेरीज करून कोणी तरी असेल काय ? ॥ ५० ॥

## तेरावा अध्याय समाप्त

---

# अध्याय १४ वा

श्रीशुकाचार्य म्हणाले — राजा, पृथ्वीचा उद्धार करावा या विशिष्ट हेतूनें वराहाचें रूप धारण केलेल्या श्रीहरीच्या ज्या कथा मैत्रेयमुनीनें सांगितल्या, त्या ऐकून विदुराची मुळींच तृप्ति झाली नाहीं. तेव्हां व्रतनिष्ठ अशा विदुरानें हात जोडून त्याला पुनः प्रश्न केला ॥ १ ॥

तो म्हणाला,–हे ऋषिश्रेष्ठा, वराहरूप धारण केलेल्या त्या यज्ञस्वरूपी श्रीहरीनेंच हिरण्याक्षनामक आदिदैत्याचा वध केला असें आम्हीं ऐकिलें आहे ॥ २ ॥ मैत्रेय ऋषे, आपल्या दाढेच्या टोंकावर घेऊन तो वराहरूपी श्रीहरि पृथ्वीला सहज लीलेनें वर काढीत असतां त्याचा आणि दैत्यराज हिरण्याक्षाचा कोणत्या कारणामुळें संग्राम झाला बरें ?॥ ३॥

मैत्रेयऋषि म्हणाले,–हे विदुरा, तूं फार चांगला प्रश्न केलास. कारण मनुष्यांचे मृत्युपाश तोडून टाकणारी जी श्रीहरीची अवतारकथा तीच तूं विचारीत आहेस ॥ ४ ॥ विदुरा, हीच वराह अवताराची कथा नारदाच्या मुखानें गायिलेली ऐकून उत्तानपाद राजाचा अल्पवयी पुत्र जो ध्रुव, त्यानें मृत्यूच्या मस्तकावर पाय[1] ठेवून श्रीहरीच्या पदाची प्राप्ति करून घेतली ॥ ५ ॥ विदुरा, याविषयींचा देखील इतिहास मीं ऐकिलेला आहे. देवांचाहि देव जो ब्रह्मदेव त्याला देवांनीं प्रश्न केला असतां त्यानें तो पूर्वीं सांगितला होता ॥ ६ ॥ विदुरा, दक्षप्रजापतीची दिति नांवाची कन्या मरीचि मुनीचा पुत्र जो कश्यप त्याला दिलेली होती. एके दिवशीं संध्याकाळीं ती मदनानें पीडित होऊन पुत्रप्राप्तीच्या इच्छेनें पतीची प्रार्थना करूं लागली. त्या वेळीं अग्निरूपी मुखानें यज्ञांतील हविर्भागाचा स्वीकार करणारा जो यज्ञपति परमेश्वर, त्याला दुधाचा हविर्भाग अर्पण करून सूर्य अस्तास जाण्याच्या समयीं कश्यपमुनि स्वस्थ चित्तानें बसले होते ॥ ७ ॥ ८ ॥

दिति त्यांना म्हणाली — हे ज्ञानवान् मुने, हा पाहा कामदेव धनुष्य घेऊन मज अबलेवर तुम्हांला उद्देशून चाल करून येत आहे आणि मदोन्मत्त हत्ती जसा केळीला पीडा देतो त्याप्रमाणें मला तो फार व्यथा करीत आहे ॥ ९ ॥ ऋषे, माझ्या सर्व सवतींना संतति झाली असून त्यांची ती समृद्धि पाहून माझ्या अंगाची आग होत आहे, तरी आपण माझ्यावर अनुग्रह करावा; आपलें कल्याण असो ! ॥ १० ॥ आपल्यासारखा पति ज्यांच्या ठिकाणीं पुत्ररूपानें उत्पन्न होतो, त्या स्त्रियांना पतीकडून बहुमान मिळाल्यामुळें

---

१ सुनंदनंदप्रभृति विष्णूच्या पार्षदांनीं ध्रुवाला नेण्यासाठीं जेव्हां विमान आणिलें, तेव्हां मृत्यूची स्वारी स्वतः विमानाजवळ आली; परंतु मृत्यूच्याच मस्तकावर पाय देऊन ध्रुव विमानांत चढून स्वर्गाला गेला अशी कथा पुढें चौथ्या स्कंधाच्या १२ व्या अध्यायांत आहे.

त्यांची कीर्ति जगभर पसरते ॥ ११ ॥ ऋषे, आमचा पिता जो भगवान् दक्षप्रजापति त्याचें आम्हां मुलींवर फार प्रेम असे. तेव्हां त्यानें एकदां 'मुलींनो, तुम्हीं कोणत्या पतीला वरणार ?' असें आम्हांला प्रत्येकीं पृथक् पृथक् विचारिलें÷॥ १२ ॥ मग त्यानें आम्हीं सर्व कन्यांचे अभिप्राय ओळखिले आणि आम्ही प्रजावृद्धीविषयीं उत्कंठित असल्यामुळें त्यानें आम्हांपैकीं तेरा जणींचें आचरण तुमच्या स्वभावाशीं जमण्याजोगें आहे असें पाहून त्या तुम्हांला अर्पण केल्या ॥ १३ ॥ हे कमलनेत्रा, आपण माझें कल्याण करणारे आहांत. तरी आतां माझ्या इच्छा पूर्ण कराव्या; कारण आपण संपन्न आहांत आणि आपल्यासारख्या थोर पुरुषांजवळ दुःखितांनीं केलेली याचना कधींच निष्फल होत नाहीं ॥ १४ ॥

हे वीरा विदुरा, वृद्धिंगत झालेल्या मदनानें दिति अगदीं पीडित होऊन दीनपणें पतीची अशी नाना प्रकारें विनवणी करूं लागली असतां कश्यप ऋषीनें तिची समजूत पटेल अशा रीतीनें गोड शब्दानें तिला उत्तर दिलें ॥ १५ ॥ तो म्हणाला,—हे स्त्रिये, तूं भिऊं नकोस, तुझें अभीष्ट पुत्रविण्यास हा मी सिद्ध आहें. स्त्रीपासूनच ज्या अर्थी पुरुषाला धर्म, अर्थ काम या तिन्ही पुरुषार्थांची प्राप्ति होते, त्या अर्थी तिची इच्छा कोण बरें पुरविणार नाहीं ?॥ १६ ॥ नौकेच्या साहाय्यानें जसें समुद्र तरून जातां येतें, त्याप्रमाणें गृहस्थाश्रमी पुरुष स्त्रीच्या साहाय्यानें आपलीं कर्तव्यें नीट करतो आणि इतर आश्रमांनाहि आपल्याबरोबर घेऊन तो दुःखसागरांतून पलीकडे जातो ॥ १७ ॥

हे मानी स्त्रिये, स्त्री म्हणजे कल्याणेच्छु पुरुषाचें अर्धाङ्ग असें म्हटलें आहे. तिच्यावरच आपल्या कार्याचा भार सर्वस्वीं टाकून पुरुष निश्चिन्तपणें फिरत असतो ॥ १८ ॥ गृहस्थाश्रमाशिवाय इतर आश्रमांनीं इंद्रियरूपी शत्रूंचा पराभव करणें कठीण असतें; परंतु सेनापति किल्ल्याचा आश्रय करून ज्याप्रमाणें शत्रूंचा पराभव करतो, त्याप्रमाणें आम्ही पुरुष स्त्रीचा आश्रय करून त्या इंद्रियरूपी शत्रूंवर सहज विजय मिळवितों ॥ १९ ॥ अशा प्रकारची जी माझी तूं धर्मपत्नी, तिची योग्यता आम्हीं सर्व प्रकारें आपल्या अंगीं आणण्याचा कितीहि प्रयत्न केला, तरी आम्हांला किंवा जे दुसरे कोणी गुणांचें ग्रहण करणारे आहेत त्यांना, ती गोष्ट साऱ्या आयुष्यांतहि शक्य होणार नाहीं ॥ २० ॥ तरीपण अपत्यप्राप्तीसाठीं ही तुझी इच्छा मीं पूर्ण करितों; परंतु मला लोकांनीं नांवें ठेवूं नयेत, यास्तव दोन घटिका धीर धर ! ॥ २१ ॥ प्रिये, ही वेळ राक्षस इत्यादि भयंकर प्राण्यांची आहे व दिसण्यांतहि ती भयंकर असून अत्यंत भयप्रद आहे. खरोखर ह्या वेळेस भूतें इत्यादि शंकराचीं अनुचर मण्डळी जिकडेतिकडे फिरत असतात ॥ २२ ॥ हे पतिव्रते, ह्या संध्याकाळच्या वेळेस प्राणिमात्रांचें कल्याण करणारा असा भूतपति भगवान् शंकर आपल्या भूतगणांना घेऊन नंदीवरून फिरत असतो ॥ २३ ॥

÷ या दक्षकन्यांचीं नांवें ६ व्या स्कंधांत ६ व्या अध्यायांत दिलीं आहेत.

प्रिये, स्मशानांतील वावटळीनें उडालेल्या धुळीमुळें ज्याच्या मस्तकावरील तेजस्वी जटा धुरकटून व विसकटून गेली आहे आणि ज्याचें निर्मल व सुवर्णाप्रमाणें तेजस्वी असें शरीर भस्मानें लिप्त झालेलें आहे असा तो तुझा दीर * आपल्या तीनहि डोळ्यांनीं नित्य सर्वत्र निरीक्षण करीत असतो ॥ २४ ॥ या जगांत त्याचा कोणी स्वकीय नाहीं आणि कोणी परकीयहि नाहीं. तसेंच त्याला कोणी पूज्य नाहीं; व निंद्यहि नाहीं. त्यानें उपभोग घेतल्यावर मग पायानें दूर लोटून दिलेल्या अशा मायिक वैभवाची प्राप्ति व्हावी अशी आम्ही मोठमोठीं व्रतें करून अपेक्षा करीत असतों ॥ २५ ॥ अशा त्या भगवान् शंकराच्या निर्दोष आचरणाचें ज्ञानी लोक वर्णन करीत असतात; कारण त्यांना मायापटलाचा भेद करण्याची इच्छा असते. त्याच्याशीं साम्य करणें किंवा त्याहून श्रेष्ठपणा मिळविणें हें कोणालाहि शक्य नाहीं. असें असतांहि सज्जनांना मोक्ष देणारा असा तो भगवान् स्वतः पिशाचाप्रमाणें आचरण करीत असतो ॥ २६ ॥ आत्मानंदांत रममाण होणाऱ्या त्या शंकराला अभीष्ट असलेल्या अशा त्या आचरणाला ज्ञान नसलेले अभागी पुरुष हंसतात; ( आणि तें ठीकच आहे. ) कारण कुत्र्याच्या भक्ष्यस्थानीं पडण्यास योग्य असा हा देह म्हणजेच आत्मा असें समजून वस्त्रें, फुलें, अलंकार, उट्या इत्यादिकांनीं ते त्याचा गौरव करीत असतात ॥ २७ ॥ प्रिये, ब्रह्मदेवप्रभृति देव त्या शंकरानें घालून दिलेल्या धर्ममर्यादेचें पालन करीत असतात. ह्या विश्वाची उत्पत्ति त्याच्यापासूनच आहे. प्रत्यक्ष माया सुद्धां त्याची आज्ञा मान्य करण्यास सिद्ध असते. असें असतांहि त्या शंकराचें आचरण पिशाचाप्रमाणें असतें. तात्पर्य, मोठ्यांचें चरित्र अतर्क्य असतें, हेंच खरें ॥ २८ ॥

मैत्रेयमुनि म्हणाले,—विदुरा, कश्यपऋषीनें याप्रमाणें दितीला उपदेश केला; परंतु मदनानें तिचीं इन्द्रियें व्याकुल केलेलीं असल्यामुळें तिनें वेश्येप्रमाणें निर्लज्ज होऊन त्या ब्रह्मर्षीच्या वस्त्राचा पदर धरिला ॥ २९ ॥ तेव्हां निषिद्ध कर्माच्या ठिकाणीं आपल्या पत्नीचा तो आग्रह जाणून कश्यपऋषीनें दैवाला हात जोडले आणि तिच्याबरोबर एकान्तात प्रवेश केला ॥ ३० ॥ नंतर कश्यपमुनीनें उदकाला स्पर्श करून प्राणायाम केला व मौनव्रत धारण केलें आणि निर्मळ अशा सूर्यरूप तेजाचें ध्यान करीत सनातन ब्रह्मरूप गायत्री मंत्राचा जप केला ॥ ३१ ॥ विदुरा, मग दितीला देखील आपल्या निन्द्य कर्मामुळें मोठी लज्जा उत्पन्न झाली. ती त्या ब्रह्मर्षीजवळ गेली आणि खालीं मान करून त्याला म्हणाली ॥ ३२ ॥

हे ब्रह्मज्ञ ऋषे, सर्व भूतांमध्यें श्रेष्ठ असा तो रुद्र या माझ्या गर्भाचा घात न करील असें करा. त्याचा मीं अपराध केला आहे खरा; तरीपण तो भूतांचें रक्षण करणाराच

---

* कश्यपाची स्त्री दिति आणि शंकराची स्त्री सती या दोघी दक्षप्रजापतीच्या कन्या असल्यामुळें कश्यप आणि शंकर हे परस्पर साडू म्हणजे भावांसारखे होते व त्यामुळें शंकर हा दितीचा मेहुणा किंवा दीर होता.

आहे ना ? ॥ ३३ ॥ त्या रुद्ररूपी उग्र महादेवाला नमस्कार असो. तो सकाम व निष्काम अशा सर्व भक्तांना मोक्ष देणारा असून हातांत दण्ड न घेतांहि दुष्टांना दण्ड करतो व तो साक्षात् क्रोधच आहे ॥ ३४ ॥ तो भगवान् रुद्र आम्हांवर प्रसन्न होवो. तो सतीचा पति असा माझा मेहुणा महादेव अत्यंत कृपाळू आहे आणि आम्ही स्त्रिया म्हणजे अनुकंपेस अत्यंत पात्र आहों. पारधी देखील तशी अनुकंपा दाखवितात. ( मग तो महादेव कां बरें दाखविणार नाहीं ? ) ॥ ३५ ॥

मैत्रेयऋषि म्हणाले,—याप्रमाणें आपल्या संततीचें उभय लोकीं कल्याण होईल असा आशीर्वाद तिनें मागितला असतां, तो प्रजापति कश्यप आपलें संध्याकर्म आटोपल्यावर भार्येला म्हणाला ॥ ३६ ॥

कश्यप म्हणाला—हे दुर्दैवी स्त्रिये, तुझा स्वभाव कोपिष्ठ असून अशुद्ध अंतःकरण, संध्याकाळची अशुभ वेळ, माझ्या आज्ञेचा भंग आणि देवांची अवहेलना हे चार दोष तुझ्या हातून या प्रसंगीं घडले आहेत. यास्तव तुला पापी व अधम असे दोन पुत्र होतील आणि ते तिन्ही लोक आणि त्यांचे रक्षक देव यांना, दे माय धरणी ठाय असें करून सोडितील ॥ ३७ ॥ ३८ ॥ अनाथ आणि निरपराधी अशा प्राण्यांचा वध होऊं लागला, स्त्रियांवर बलात्कार होऊं लागला आणि त्यामुळें साधूंना क्रोध उत्पन्न झाला, म्हणजे मग विश्वाचें कल्याण करणारा तो भगवान् विष्णु क्रुद्ध होईल आणि अवतार घेऊन इन्द्र जसा पर्वतांचा नाश करतो, त्याप्रमाणें तो तुझ्या दोन्ही पुत्रांचा वध करील ! ॥ ३९ ॥ ४० ॥

दिति म्हणाली—ऋषे, चक्र धारण केल्यामुळें ज्याचा बाहु शोभायमान झाला आहे, त्या भगवान् विष्णूच्या हातूनच माझ्या पुत्रांचा वध व्हावा; पण कांहीं झालें तरी ब्राह्मणाच्या क्रोधामुळें मात्र तो होऊं नये, अशी माझी इच्छा आहे ॥ ४१ ॥ कारण जे कोणी प्राणिमात्राला पीडा दिल्यामुळें ब्राह्मणाच्या शापानें नाश पावतात, ते नरकांत गेले किंवा दुसऱ्या कोणत्याहि योनींत गेले, तरी तेथील लोक त्यांच्यावर अनुग्रह करीत नाहींत ॥ ४२ ॥

कश्यपऋषि म्हणाले— दिते, केलेल्या अपराधाबद्दल शोक व पश्चात्ताप होऊन ज्या अर्थी तूं त्याच्या युक्तायुक्ततेचा विचार केलास आणि विष्णूचा मोठा मान ठेवून शंकर व मी या दोघांविषयींहि पूज्यबुद्धि ठेविली आहेस, त्या अर्थी, या सर्व कारणांमुळें तुझ्याठायीं होणाऱ्या पुत्राच्या पुत्रांमध्येंच एक पुत्र साधूंनाहि मान्य असा होईल आणि सर्व लोक त्याची पवित्र कीर्ति भगवन्ताच्या कीर्तीच्या बरोबरीनें गातील ॥ ४३ ॥ ४४ ॥ हिणकस सोनें जसें तापवून स्वच्छ करितात, त्याप्रमाणें साधु पुरुष देखील आपला स्वभाव त्याच्यासारखा व्हावा म्हणून निर्वैर, समचित्तत्व इत्यादि उपायांनीं आपलें अन्तःकरण शुद्ध करण्याचा प्रयत्न करतील ॥ ४५ ॥ दिते, हें विश्व भगवन्ताचें स्वरूपच होय. त्या परमेश्वराला संतोष झाला म्हणजे सर्व विश्वहि संतुष्ट होतें. तो सर्वसाक्षी भगवान् तुझ्या त्या पुत्राच्या एकनिष्ठ भक्तीमुळें त्याच्यावर प्रसन्न होईल ॥ ४६ ॥ तो तुझा नातू महात्मा व मोठा भगवद्भक्त

होईल, त्याचें अंतःकरण फार थोर असेल आणि मोठ्यांमध्येंहि मोठी अशी पदवी त्याला प्राप्त होईल. तसेंच तो आपली भक्ति वाढवून तिच्या योगानें आपलें चित्त शुद्ध करील आणि त्यांत श्रीविष्णूची स्थापना करून तो देहादिकांवरील आपला अभिमान सोडून देईल ॥ ४७ ॥ दिते, तो विषयसेवनांत लंपट राहणार नाहीं. तो स्वभावानें उत्तम व गुणांचा केवळ निधिच होईल. दुसऱ्याचें ऐश्वर्य पाहून त्याला संतोष होईल, दुःखी लोकांना पाहून त्याला दुःख होईल व तो कोणाचेंहि शत्रुत्व करणार नाहीं. नक्षत्रराज चंद्र जसा ग्रीष्म-ऋतूंतील संताप शांत करतो, तसा तो विश्वाचें सर्व दुःख दूर करील ॥ ४८ ॥ दिते, कमलनेत्र असा तो निर्मलस्वरूपी परमेश्वर आंत बाहेर सर्वत्र भरलेला आहे व आपल्या भक्तांच्या इच्छेनुसार नाना रूपें धारण करणारा आणि कानांतील दैदीप्यमान कुण्डलांनीं सुशोभित झालेल्या मुखानें युक्त असा तोच भगवान् लक्ष्मीरूप सुंदरीचें सौभाग्य होय, असें ज्ञान तुझ्या त्या नातवाला होईल ॥ ४९ ॥

मैत्रेयऋषि म्हणाले,—याप्रमाणें कश्यपऋषीनें सांगितल्यावरून आपला नातू भगवद्भक्त होणार हें ऐकून दितीला फार आनंद झाला. तसेंच आपल्या पुत्रांचा वध कृष्णाच्या हातूनच होणार, हें तिला समजल्यामुळेंहि तिच्या मनाला धन्यता वाटली ॥ ५० ॥

## चौदावा अध्याय समाप्त

---

# अध्याय १५ वा

दितीनें आपल्या उदरांत गर्भरूपानें धारण केलेलें तें कश्यपप्रजापतीचें वीर्यरूप तेज, त्याच्यापुढें इतरांचा पराक्रम फिका पडणार, व त्यापासून देवांना पीडा उत्पन्न होणार, ह्या भीतीनें दितीनें आपल्या उदरांत शंभर वर्षेंपर्यंत तें तसेंच ठेविलें होतें ॥ १ ॥ त्या गर्भाच्या तेजामुळें जगांतील सूर्य-चन्द्रांचा सर्व प्रकाश नाहींसा झाला आणि इन्द्र, वरुण आदिकरून लोकपालांचे पराक्रम कुण्ठित झाले. दिशा अंधकारामुळें भरून गेल्यामुळें त्यांचा कोणाला उमज पडेना. तेव्हां त्या लोकपालांनीं ब्रह्मदेवाकडे जाऊन हा सर्व वृत्तान्त त्याला निवेदन केला ॥ २ ॥

देव म्हणाले—ब्रह्मदेवा, आपल्या ज्ञानप्रसाराचा मार्ग कालानें मुळींच बाधित झालेला नसल्यामुळें आपल्याला माहीत नाहीं असें कांहींच नाहीं तेव्हां आपण या अंधकाराला जाणीत असालच. आम्ही तर त्यामुळें अगदीं उद्विग्न होऊन गेलों आहोंत ॥ ३ ॥ हे देवाधिदेवा ब्रह्मदेवा, तुम्ही त्रैलोक्यरक्षक आहां व आम्हां लोकपालांचे स्वामीहि तुम्हींच आहां. आपण स्थावर, जंगम किंवा स्थूल, सूक्ष्म अशा सर्व प्राण्यांचे अभिप्राय जाणतां ॥ ४ ॥ ब्रह्मदेवा, विविध ज्ञान हेंच आपलें बल होय. आपणांला नमस्कार असो. आपण मायेच्या योगानें रजोगुणाचा स्वीकार करून हें ब्रह्मदेवरूप धारण केलें. ह्या सर्व प्राण्यांचें कारण आपणच आहां. आपल्याला आमचा नमस्कार असो ॥ ५ ॥ कार्य व कारणें हीं दोन्ही स्वरूपें आपलींच आहेत. ह्या दोन्ही स्वरूपांच्या योगानें आपण स्वतःच्या स्वरूपांत त्रिभुवन गोवून ठेविलें आहे. जीवांना उत्पन्न करणारे आपणच आहां. अशा तुमची जे कोणी एकनिष्ठपणें भक्ति करितात ॥ ६ ॥ त्या भक्तांचा कोठूनहि पराभव व्हावयाचा नाहीं. कारण त्यांनीं आपले प्राण, इन्द्रियें व मन यांचा जय केलेला असतो व त्यामुळें त्यांचा योगाभ्यास पूर्ण दशेला येऊन त्यांनीं तुमची कृपा संपादन केलेली असते ॥ ७ ॥ दावणीनें गाई बांधून ठेवितात, त्याप्रमाणें तुम्हीं आपल्या वाणीच्या योगानें सर्व लोकांना आपल्या स्वाधीन करून ठेविलें आहे, म्हणून ते तुम्हांला बलि अर्पण करितात. तुम्ही सर्वांचे नियंते आहां. तुम्हांला नमस्कार असो ! ॥८॥ ब्रह्मदेवा, या अंधकाराच्या योगानें आमच्या सर्व क्रिया * बन्द पडल्या आहेत. तरी हे सर्वव्यापका, तुम्ही आमचें कल्याण करा. आम्ही विपत्तींत सांपडलेले आहों. आम्ही तुमच्या कृपाकटाक्षाला अगदीं पात्र आहों ॥ ९ ॥ हे ब्रह्मदेवा, ओलसर काष्ठांमध्यें टाकलेला अग्नि पेटूं लागला

---

* दिवस व रात्र हा कालभेद कर्माचा प्रवर्तक आहे, सर्वत्र अंधकार झाल्यामुळें क्रिया बंद पडल्या.

म्हणजे सर्वत्र धूर पसरतो, त्याप्रमाणें कश्यपऋषीनें स्थापन केलेल्या वीर्यापासून उत्पन्न झालेला दितीचा गर्भ वाढत असून सर्व दिशा अंधकारानें भरून टाकीत आहे ॥ १० ॥

मैत्रेय ऋषि म्हणाले—विदुरा, देवांनीं ब्रह्मदेवाची अशी प्रार्थना केली असतां ब्रह्मदेवाला हसूं आलें आणि देवांना संतोष व्हावा म्हणून आपल्या मधुर वाणीनें त्यानें त्याला उत्तर दिलें ॥ ११ ॥

ब्रह्मदेव म्हणाला—देव हो, तुमच्यापूर्वी जन्मास आलेले सनत्कुमारप्रभृति ऋषि माझे मानस पुत्र होत. ते निरिच्छपणें आपल्या या लोकांवरील जे वैकुंठादि लोक त्यांमध्यें आकाशमार्गानें संचार करीत असतात ॥ १२ ॥ एके समयीं ते सनत्कुमारप्रभृति ऋषि फिरत फिरत शुद्धस्वरूपी भगवान् विष्णूच्या सर्व लोकांना पूज्य अशा वैकुण्ठलोकाला गेले ॥ १३ ॥ देव हो, फलाशारहित अशा धर्माचरणानें ज्यांनीं श्रीहरीची आराधना केलेली असते तेच पुरुष विष्णूसारखीं स्वरूपें प्राप्त करून त्या वैकुण्ठलोकांत राहत असतात ॥ १४ ॥ भगवान् धर्मस्वरूपी जे विष्णु ते, ज्यांचें स्वरूप वेदांनींच जाणतां येतें, अशा त्या वैकुण्ठलोकांत शुद्ध सत्त्वगुणात्मक मूर्ति धारण करून आम्हांसारख्या आपल्या भक्तांना सुख देत राहत असतात ॥ १५ ॥ त्या वैकुण्ठलोकांत नैःश्रेयस् नांवाचें एक उद्यान आहे. तें उद्यान म्हणजे जणूं काय मूर्तिमान मोक्षच होय. त्यांतील वृक्षांना सर्वच ऋतूंत फलें, पुष्पें व पल्लव इत्यादि असून ते सर्व मनोरथ पूर्ण करणारे असल्यामुळें त्याला फारच शोभा आली आहे ॥ १६ ॥ त्या उद्यानांत विष्णूचे भक्त आपल्या स्त्रियांसहवर्तमान विमानांत बसून येतात आणि लोकांच्या पापाला दूर करणारीं अशीं श्रीहरीचीं चरित्रें गातात. तेव्हां उदकान्तर्गत अशा वसंतऋतूंतील फुलांच्या मकरन्दयुक्त सुगन्धाकडे त्यांचें लक्ष जाऊन त्यांच्या भगवद्गुणानुवर्णनांत किंचित् विघ्न उत्पन्न होतें खरें; तथापि त्या सुगन्धाला वाहून आणणाऱ्या वायूचा तिरस्कार करून ते आपलें भगद्गुणवर्णन चालूच ठेवितात ॥ १७ ॥ वैकुण्ठवनांतील त्या उद्यानांत पारवे, कोकिल, सारसचक्रवाक, चातक, हंस, रावे, तित्तिर, व मोर ह्या पक्ष्यांचा कलकलाट होत असतो; परंतु एखादा मोठा भ्रमर मोठ्यानें गुंजारव करूं लागला म्हणजे त्यांना हा भ्रमर श्रीहरीचीं चरित्रेंच गात आहे कीं काय, असा भास होऊन त्यांचा तो कलकलाट क्षणमात्र बंद पडतो ॥ १८ ॥ देव हो, त्या नैःश्रेयस् उद्यानांत मंदार, कुन्द, तिलक, कमोद, चंपक, अर्ण, पुंनाग, नागकेसर व पारिजातक असे सुगन्धयुक्त पुष्पवृक्ष आहेत; पण श्रीहरीनें आपल्या कण्ठांत अलंकार म्हणून धारण केलेली जी तुलसीमाला, तिच्या सुगन्धाची भगवान् प्रशंसा करीत असल्यामुळें, ते पुष्पवृक्ष त्या तुळशीची तपश्चर्याच थोर होय असें समजतात ॥ १९ ॥ ते हरिभक्त इतके वैराग्यशील असतात कीं, भव्य कटींनीं आणि मंदहास्यामुळें शोभिवंत झालेल्या मुखांनीं युक्त अशा तेथील रमणीय स्त्रियाहि, आपल्या हास्यादि हावभावांनीं त्यांचा कामविकार जागृत करूं शकत नाहींत ॥ २० ॥ तिचा अनुग्रह आपल्यावर व्हावा म्हणून ब्रह्मदेवप्रभृति देवहि प्रयत्न करीत असतात, ती लावण्यवती लक्ष्मी आपले चाञ्चल्य आदिकरून

दोष सोडून आपल्या चरणकमलांतील नूपुरांचा खुळखुळ शब्द करीत स्फटिकाच्या भिंती आणि सुवर्णाच्या पायऱ्या असलेल्या श्रीहरीच्या घरांत राबत असते. तेथें आपलें क्रीडा-कमल घेऊन ती फिरूं लागली म्हणजे तेथील केरच ती त्या कमलानें काढून टाकीत आहे कीं काय, असा भास होतो ॥ २१ ॥ ब्रह्मदेव म्हणतो—देव हो, लक्ष्मी आपल्यां दासींसह ज्या आपल्या उद्यानांत श्रीहरीची तुलसींनीं पूजा करीत असते, त्या उद्यानांत पोवळ्यांनीं बांधलेल्या निर्मळ व गोड पाण्याच्या विहिरी असून त्यांतील पाण्यांत, सुंदर केशांनीं व सरळ नासिकेनें शोभणाऱ्या आपल्या मुखाचें प्रतिबिंब दिसलें म्हणजे भगवंतानें त्याचें चुंबन घेतलें म्हणूनच ह्याला एवढी शोभा आली कीं काय असें तिला वाटतें ॥ २२ ॥ परमेश्वर सर्व पापांना दूर करणारा असल्यामुळें त्यानें ज्या सृष्टिरचनादिक लीला केल्या, त्यांचें वर्णन करणें हेंच मनुष्याचें कर्तव्य होय. याशिवाय इतर अर्थ, काम इत्यादि विषयांच्या कथा निंद्य होत. त्यांच्या श्रवणानें ऐकणाराच्या बुद्धीला मोह उत्पन्न होऊन त्यामुळें त्यांना वैकुण्ठलोकाची प्राप्ति होत नाहीं. तशा प्रकारच्या त्या दुष्ट कथा हतभागी पुरुषांनीं श्रवण केल्या म्हणजे ऐकणारांचें पुण्य त्या हरण करतात व जेथें कोणी रक्षणकर्ता नाहीं अशा घोर नरकांत त्यांना नेऊन टाकितात ॥ २३ ॥ या मनुष्यजन्माची थोरवी किती वर्णावी ! या मनुष्यजन्मांतच धर्मज्ञानानें युक्त असें ब्रह्मज्ञान प्राप्त होऊं शकतें. आम्ही देव सुद्धां मनुष्यजन्म मिळावा म्हणून परमेश्वराची प्रार्थना करीत असतों. जे लोक मनुष्यजन्माला प्राप्त होऊन परमेश्वराची आराधना करीत नाहींत, त्यांना परमेश्वराच्या अपरिमेय मायेनेंच मोहित केलें आहे, असेंच समजलें पाहिजे ॥ २४ ॥ आपला रक्षणकर्ता जो परमेश्वर त्याच्या उत्तम कीर्तीचें परस्परांशीं वर्णन करतां करतां प्रेम उत्पन्न होऊन देहभान सुटल्यामुळें ज्यांच्या नेत्रांतून आनन्दाश्रु वाहूं लागून शरिरावर रोमाञ्च उभे राहतात, ज्यांच्या उत्कट भक्तीमुळें यमराज त्यांच्याजवळ येण्याला धजत नाहीं आणि ज्यांचें दयालुत्व इत्यादि गुण पाहिले म्हणजे इतरांना देखील आपला असाच स्वभाव व्हावा अशी इच्छा उत्पन्न होते; अशा त्या अनन्यभक्तांना देवश्रेष्ठ विष्णूच्या सेवेनें आमच्या सत्यलोकाच्या वर असलेला वैकुण्ठलोक प्राप्त झालेला असतो ॥ २५ ॥ असो. देवहो, अशा स्वरूपाच्या त्या वैकुण्ठलोकाला ज्या वेळीं सनत्कुमारादि मुनि आपल्या योगसामर्थ्यानें प्राप्त झाले, तेव्हां त्यांना फार आनंद झाला. जगाचा गुरु जो भगवान् विष्णु, तो तेथें राहत असल्यामुळें, मोठमोठ्या देवांच्या चित्रविचित्र विमानांच्या तेजानें प्रकाशित असलेला तो अलौकिक असा वैकुंठ साऱ्या भुवनांना पूज्य झालेला आहे ॥ २६ ॥ तेथें पोंचल्यावर ते सनत्कुमारादि ऋषि इतर कोणत्याहि विषयाकडे लक्ष न देतां सहा चौक ओलांडून सातव्या चौकांत गेले. तों तेथें त्यांना दोन द्वारपाल दृष्टीस पडले. ते दोघेहि वयानें अगदीं समान होते व त्यांनीं आपल्या हातांत गदा आणि शरिरावर बहुमोल बाहु-भूषणें, कुण्डलें व किरीट धारण केलेले असल्यामुळें त्यांचे वेष फारच सुंदर दिसत होते ॥ २७ ॥ त्या दोघांनाहि नीलवर्ण असे चारचार बाहू असून त्यांच्या मधोमध शोभणारी व मत्तभ्रमरांनीं युक्त अशी वनमाला त्यांच्या कंठांत लोंबत होती व वक्र भुवया फुललेल्या

नाकपुड्या आणि लाल नेत्र यांच्या योगानें त्यांच्या मुखावर थोडीशी क्षुब्धता आलेली दिसत होती ॥ २८ ॥ त्या वैकुण्ठलोकांतील दरवाजांच्या फळ्या हिऱ्यांच्या केलेल्या असून त्यांवर सोन्याच्या पट्टया शोभेकरितां लावल्या होत्या. अशा त्या सहा दरवाजांतून कोणालाहि न विचारतां सनत्कुमारमुनि जसे आंत शिरले, तसे सातव्या दरवाजाच्याहि आंत ते शिरूं लागले. तेथें दोघे द्वारपाळ उभे होते. परंतु त्यांना त्यांनीं ' आंत जाऊं काय ? ' असें विचारिलें नाहीं. कारण त्यांना आजपर्यन्त कोठेंच प्रतिबन्ध झाला नव्हता. त्यांची दृष्टि सरळ व कपटशून्य असल्यामुळें ते निःशंकपणें सर्व ठिकाणीं फिरत असत ॥ २९ ॥ पण त्या द्वारपालांचा स्वभाव भगवन्ताच्या स्वभावाच्या उलट होता. यास्तव ह्या चौघां कुमारांना पाहून त्यांना हंसूं आलें; कारण या ऋषींच्या कमरेला वायूशिवाय दुसरें वस्त्रच नव्हतें. ते वयानें वृद्ध होते, तरी पांच वर्षांच्या मुलांसारखे दिसत होते व त्यांना ब्रह्मज्ञानहि झालेलें होतें. अशा स्थितींत त्यांना प्रतिबन्ध करणें योग्य नव्हतें; तरी त्या दोघां द्वारपालांनीं ते आंत जाऊं लागले असतां आपल्या हातांतील वेताच्या काठीनें त्यांना अडवून धरिलें ॥ ३० ॥ ते सनकादि मुनि म्हणजे सर्व पूज्य पुरुषांमध्यें श्रेष्ठ असे होते. तथापि त्यांनाहि सर्व देव पाहत असतांना श्रीविष्णूच्या त्या दोघां द्वाररक्षकांनीं आंत जाण्यास प्रतिबंध केला. मुनींच्या मनांत अत्यंत प्रिय अशा भगवन्ताचें दर्शन घेण्याची उत्कट इच्छा होती. तिचा भङ्ग झाल्यामुळें स्वाभाविकच कामाचा धाकटा बन्धु जो क्रोध तो त्यांच्यांत थोडासा प्रगट झाला व त्यामुळें सनत्कुमारांची दृष्टि क्षुब्ध होऊन ते त्या द्वारपाळांना म्हणाले ॥ ३१ ॥

मुनि म्हणाले—'हे द्वारपाल हो, उत्तमरीतीनें भगवन्ताची आराधना करणारानांच ह्या लोकांत प्रवेश मिळतो व तेथें ते सर्वजण भागवतधर्माचें आचरण करून राहतात. ( तुम्हींहि त्यांपैकीं असला पाहिजे. ) पण त्या धर्माला विरोधी असा हा पक्षपाती स्वभाव तुम्हां दोघांमध्येंच कसा बरें दिसून येतो ? ( भगवानच स्वतः कोणाला आंत येऊं द्यावें व कोणाला प्रतिबंध करावा, असा पक्षपात करीत असणें शक्य नाहीं, ) कारण त्या भगवंताचा स्वभाव अत्यंत शांत असून त्याचा कोणाशींहि विरोध नाहीं, अर्थात् तुम्हांला जशी तुमच्याच कपटी अंतःकरणामुळें आमची शंका आली, तशी त्या भगवंताला कोणाविषयीं येणें शक्य नाहीं ॥ ३२ ॥ भगवंताच्या उदरांत सर्व विश्व भरलेलें असल्यामुळें त्याच्या ठिकाणीं ज्ञानी पुरुषभेद मुळींच मानीत नाहींत. तर, जसें महदाकाशामध्यें घटाकाश असतें त्याप्रमाणें परमात्म्याच्या ठिकाणींच आपण आहों असें ते जाणतात. अशा त्या भगवंताचें पोट कोणी फोडील, अशी भीति तुम्हांला कशामुळें उत्पन्न झाली ? तुमचीं चिन्हें दिसण्यांत तर देवांसारखीं आहेत. ( मग ही बुद्धि तुम्हांला कशी झाली ? ) ॥ ३३ ॥ तुम्ही ह्या वैकुण्ठनायक परमात्म्याचे सेवक आहां. तथापि तुमची बुद्धि अगदीं मन्द झाली आहे. यास्तव तुमचें कल्याण व्हावें म्हणून ( प्रस्तुत अपराधाबद्दल तुम्हांला योग्य दंड कोणता करावा

याचा) आम्ही विचार करतों. तुम्हीं परमेश्वराच्या ठिकाणीं भेददृष्टि ठेवली; म्हणून तुम्हीं येथून जा, आणि भेददृष्टि ठेवणाऱ्या पापी मनुष्याला ज्या लोकांत काम, क्रोध, लोभ हे तीन शत्रु उत्पन्न होतात, त्या लोकांमध्यें राहा ' ॥ ३४ ॥ त्या सनत्कुमारादि मुनींचें ईश्वराला देखील फार भय वाटत होतें ( मग त्याच्या सेवकांना तें वाटेल यांत काय आश्चर्य ? ) त्या दोघांनीं याप्रमाणें मुनींचें भाषण श्रवण केल्यावर हा ब्रह्मशाप आहे व हा कांहीं शस्त्रास्त्रांच्या साहाय्यानें निवारण करण्यासारखा नाहीं, असें त्यांना वाटलें व त्यामुळें भयभीत होऊन त्यांनीं त्या मुनींपुढें नमस्कार घालून त्यांचे पाय धरिले ॥ ३५ ॥ ते म्हणाले,—ऋषि हो, आपण आम्हांला जो दंड केला, तो तसा घडून येवो; कारण त्यामुळें आम्हीं केलेल्या परमेश्वराच्या आज्ञाभंगाचें पाप नष्ट होणार आहे; परंतु या आमच्या अपराधाबद्दल नीच नीच योनींत आम्हांला जन्म घ्यावा लागला असतां, तेथें भगवंताविषयींची आमची स्मृति नष्ट होईल असा मोह मात्र आम्हांला उत्पन्न होऊं नये. आपल्या कृपेनें आम्हांला थोडासा तरी जो पश्चात्ताप उत्पन्न झाला आहे, त्यामुळें आम्हीं ही प्रार्थना करीत आहों ॥ ३६ ॥ आपल्या भक्तांचें हृद्गत जाणणाऱ्या त्या कमलनयन भगवंतानें आपल्या सेवकांनीं अशा रीतीनें साधूंचा अपराध केला, असें जेव्हां पाहिलें; तेव्हां, परमसंतांत श्रेष्ठ असे ते सनत्कुमारमुनि ज्या चरणांच्या दर्शनाकरितां आले होते,त्याच आपल्या चरणांना चालावयास लावून तो लक्ष्मीसह आपल्या स्थानावरून निघाला व जेथें द्वारपालांनीं प्रतिबंध केला होता, त्या दरवाजापाशीं आला ॥ ३७ ॥ भगवान् आपल्या स्थानावरून उठतांच त्यांच्या अंतरङ्गांतील सेवकमंडळांनीं त्यांची छत्र, पादुका इत्यादि सामग्री त्यांना आणून दिली. त्याच्या दोन्हीं बाजूंना हंसपक्ष्यासारख्या शुभ्र अशा दोन चवऱ्या ते वारूं लागले व त्या चवऱ्यांच्या मंदवायूमुळें मस्तकावर धरलेल्या चंद्रासारख्या शुभ्र छत्राला लाविलेल्या मोत्यांच्या सरांतून गळणारे उदकबिंदु त्या भगवंताच्या अंगावर पडूं लागले. अशा रीतीनें गमन करणारा तो भगवान् विष्णु, सनत्कुमारांच्या दृष्टिपथांत आल्यावर त्यांनीं त्याच्याकडे अवलोकन केलें ॥ ३८ ॥ त्या वेळीं भगवान् श्रीविष्णु, द्वारपाल व सनत्कुमार या सर्वांवर अनुग्रह करण्याकरितां उत्सुक दिसत होता. जे गुण आपल्यामध्यें असावे असें लोकांना वाटतें, ते सर्व गुण भगवंताच्या मूर्तीमध्यें ओतप्रोत भरलेले होते. आपल्या प्रेमयुक्त नेत्रकटाक्षांनीं तेथील प्रत्येकाच्या हृदयांत तो आनंद उत्पन्न करीत होता, आणि त्याच्या नीलवर्ण वक्षस्थलाला शोभा आणणाऱ्या लक्ष्मीच्या योगानें स्वर्गलोकाचें शिरोभूषणच, अशा त्या वैकुण्ठनामक स्थानाला फारच शोभा आली होती ॥ ३९॥ भगवन्तानें आपल्या विशाल कमरेला पीताम्बर परिधान केला असून त्यावरून तेजःपुञ्ज कमरपट्टा घातला होत. कण्ठामध्यें त्यानें वनमाळा धारण केली असून तिच्यावर बसलेले भ्रमर गुंजारव करीत होते. आपल्या स्वभावतःच सुंदर अशा हातांत त्यानें कडीं घातलीं होतीं, आणि आपला एक हात गरुडाच्या खांद्यावर ठेवून दुसऱ्या हातानें तो आपलें क्रीडाकमळ गरगर फिरवीत होता ॥ ४० ॥ भगवान् विष्णूनें आपल्या कानांत, विद्युल्लतेलाहि कांतीनें मागें सारणारीं अशीं कुण्डलें घातलीं होतीं. त्या अलंकारांना शोभतील असेंच त्याचें कपाल

आणि नाक सुंदर असल्यामुळें त्याचें मुख फारच रमणीय दिसत होतें. तसाच त्याच्या मस्तकावर रत्नखचित मुकुट असून, चार बाहूंच्या मधोमध लटकणारा मनोहर हार आणि कण्ठांतील कौस्तुभमणि यांच्या योगानें भगवंताची शोभा अपूर्व दिसत होती ।। ४१ ।। आपणच सौंदर्याची केवळ खाण आहों, असा लक्ष्मीला अभिमान असतो, पण भगवंताच्या या सौंदर्यापुढें तिचा तो अभिमान सर्वथैव गळून गेला असला पाहिजे, असा त्या प्रसंगीं भगवद्भक्तांनीं मनाशीं तर्क केला. ब्रह्मदेव म्हणतात, देव हो, त्या भगवंतानें हें जें सुंदर शरीर धारण केलें, तें केवळ तुम्हीं मी आणि शंकर यांच्यावर अनुग्रह करण्यासाठींच होय. अशा ह्या भगवंताला अवलोकन करून तृप्ति न झाल्यामुळें सनत्कुमारादिक मुनींनीं आपल्या मस्तकांनीं त्याला प्रणाम केला ।। ४२ ।। सनत्कुमारमुनि ब्रह्मानंदाचा नित्य अनुभव घेणारे होते; तथापि जेव्हां त्या कमलनेत्र भगवान् विष्णूच्या चरणकमलांवरील केसरानें मिश्रित अशा तुळसीदलांचा सुगंध वायूबरोबर त्यांच्या घ्राणेंद्रियांत गेला तेव्हां त्यांनाहि आनंद झाल्याशिवाय राहिला नाहीं. त्यांचें मन हर्षानें प्रफुल्लित झालें आणि अंगावर रोमांच उभे राहिले ।। ४३ ।। नंतर ते मुनि भगवान् विष्णूच्या मुखाकडे पाहूं लागले. तें मुख म्हणजे जणूं काय कृष्णवर्ण कमलाचा कोशच असून त्याच्या अतिरम्य अशा रक्तवर्ण अधरोष्ठावर कुंदाच्या कळ्याच जणू काय, असें दिसणारें मंदहास्य शोभत होतें. तें मुख पाहूनच आपले सर्व मनोरथ पूर्ण झाले, असें त्या मुनींना वाटलें आणि पुनः नखरूपी लाल मण्यांचा आधारच अशा त्याच्या चरणांकडे त्यांनीं पाहिलें. ( तीं तीच स्थिति ! तेव्हां भगवंताचें प्रत्येक अंगच असें अपूर्व सौंदर्यानें युक्त आहे, त्यांत कोणतें अंग किती पाहावें असें त्यांना झालें; ) आणि ते मनांतच त्याचें ध्यान करूं लागले ।। ४४ ।। ह्या जगांत योगमार्गानीं उत्तम गतीचा शोध करणारे जे पुरुष आहेत, त्यांच्या ध्यानांचा विषय म्हणजे, नेत्रांना आनन्द देणारें असें हें आदरणीय भगवान् विष्णूचें स्वरूपच होय. इतरांना दुर्लभ अशा अणिमादि अष्टसिद्धि त्याच्यामध्यें स्वभावसिद्धच असतात. अशा या स्वरूपाचें ईश्वरानें आपणाला दर्शन दिलें, म्हणून सनत्कुमारमुनींनीं त्याची स्तुति करण्यास प्रारंभ केला ।। ४५ ।।

सनत्कुमारमुनि म्हणाले,—हे अनंता, तूं सर्वांच्या हृदयांत राहत असून पापी पुरुषांना तुझें स्वरूप समजून येत नाहीं. आमच्या अन्तःकरणांतून तूं कधींहि अदृश्य होत नाहींस, पण आमच्या डोळ्यांना मात्र तुझें प्रत्यक्ष दर्शन आजच घडलें. तुझ्यापासून उत्पन्न झालेल्या आमच्या पित्यानें जेव्हां तुझ्या रहस्याचा आम्हांला उपदेश केला, तेव्हांच तूं कर्णरन्ध्रानें आमच्या बुद्धींत प्रविष्ट झालास ।। ४६ ।। हे देवा, तोच तूं परमात्मस्वरूपी असून सांप्रत आपल्या शुद्ध सत्त्वगुणयुक्त मूर्तीनें आपल्या भक्तांना संतोष उत्पन्न करीत आहेस, हें आम्हीं जाणतों. वैराग्यशील अशा मुनींवर तुझी कृपा झाली, म्हणजे त्यांना भक्तियोगाचें ज्ञान होतें; आणि तो भक्तियोग दृढ होत गेला, म्हणजे त्यांच्या अहंकाराची गांठ नष्ट होऊन, त्यांना त्यांच्या हृदयांमध्यें या तुझ्या सत्त्वमूर्तीचें ज्ञान होतें ।। ४७ ।। हे ईश्वरा, जे तुझ्या चरणांचा आश्रय करितात, तेच खरे सुखी होत. तुझी कीर्ति वर्णन

करण्यास योग्य असून पवित्र आहे. ज्यांना एकदां तुझ्या कथांचा उत्तम रीतीनें रसास्वाद कळला, त्यांना मग तुझा अतिशय मोठा असा प्रसाद जो मोक्ष त्याचाहि आदर वाटत नाहीं; मग तुझी नुसती भुवई वांकडी झाल्यानें ज्या स्थानांना भय उत्पन्न होतें, त्या इंद्र-पदादि स्थानांचा ते कशाला विचार करितील ? ॥ ४८ ॥ हे देवा, जर आमचें मन भ्रमराप्रमाणें तुझ्या चरणीं रममाण होईल, किंवा तुलसीप्रमाणें आमची वाणीहि तुझ्या चरणांच्या वर्णनानें स्वतःला सुशोभित करील, अथवा आमचीं कर्णच्छिद्रें तुझ्याच गुण-गणांच्या श्रवणानें भरून जातील, तर आमच्या पातकांमुळें आम्हांला नरकांमध्यें जन्म आला, तरी खुशाल येवो ॥ ४९ ॥ हे ईश्वरा, तुझी कीर्ति अनंत आहे. तूं जें हें रूप आम्हांपुढें प्रगट केलेंस, त्यामुळें आमच्या दृष्टीला अत्यंत सुख झालें आहे. इन्द्रियें स्वाधीन नसलेल्या अशा पुरुषांना तुझें दर्शन होणें दुर्घट आहे; पण तें दर्शन आम्हांला झालें, म्हणून ऐश्वर्यसंपन्न अशा तुला आम्ही हा नमस्कार करितों ॥ ५० ॥

### पंधरावा अध्याय समाप्त

---

# अध्याय १६ वा

ब्रह्मदेव म्हणाला—देव हो, योग व भागवतधर्म हे दोन्ही पूर्णपणें जाणणाऱ्या अशा त्या सनकादिमुनींनीं केलेली स्तुति श्रवण करून वैकुण्ठवासी अशा त्या विष्णूला मोठा आनंद वाटला आणि त्याच्या भाषणाचा गौरव करून तो त्यांच्यांशीं बोलूं लागला ॥ १ ॥

भगवान् विष्णु म्हणाला,—मुनि हो, आपल्यापुढें उभे असलेले हे दोघे जय व विजय नांवांचे माझे सेवक आहेत. त्यांनीं माझी अवहेलना करून आपलाहि फार अपमान केला आहे ॥ २ ॥ मुनिहो, तुम्ही माझे अनुयायी भक्त असल्यामुळें देवच आहां, यास्तव तुमची अवहेलना केल्यामुळें तुम्हीं यांना जो दंड केला, तो आम्हांलाहि मान्य आहे ॥ ३ ॥ यास्तव मीं आतां तुमचें मन प्रसन्न करितों; कारण ब्राह्मण म्हणजे माझें श्रेष्ठ दैवत होय. माझ्या सेवकांनीं आपला अनादर केला, तो प्रत्यक्ष माझ्या हातूनच घडला असें मीं समजतों ॥ ४ ॥ लोकांची अशीच चाल आहे कीं, सेवकाकडून कांहीं अपराध घडला कीं धन्याला ते नांवें ठेवूं लागतात आणि मग कुष्ठादि रोग जसा त्वचेचा नाश करितो, तसा त्या धन्याच्या कीर्तीचाहि त्या लोकनिन्देमुळें नाश होतो ॥ ५ ॥ माझ्या अमृतासारख्या निर्मळ कीर्तीचें श्रवण केल्यानें चांडालापासून तों श्रेष्ठ जातीपर्यंत सर्व जग तत्काळ पवित्र होतें. असा जो मीं वैकुंठवासी विष्णु त्याला त्या पवित्र कीर्तीचा लाभ तुमच्यापासूनच झालेला असल्यामुळें, माझा स्वतःचा प्रत्यक्ष बाहु जरी तुमचें अप्रिय करील तर त्यालाहि मीं तोडून टाकण्यास कमी करणार नाहीं ! ॥ ६ ॥ ऋषि हो, आपल्यासारख्या ब्राह्मणांच्या सेवेमुळेंच माझ्या चरणकमलावरील धूळ पवित्र झाली आहे व त्यामुळेंच मी लोकांचीं सर्व पापें तत्काळ दूर करूं शकतों. आपल्या सेवेनेंच मला सुस्वभाव प्राप्त झाला आहे. लक्ष्मीचा कृपाकटाक्ष तिळमात्र तरी आपल्यावर पडावा, याकरितां ब्रह्मादिक देव व्रतनियमांचें आचरण करितात, पण तिच्या संबधानें मीं पूर्ण वैराग्य दाखवीत असतांहि ती मला सोडीत नाहीं ॥ ७ ॥ सनत्कुमार हो, आपल्या सर्व कर्मांचीं फळें मला अर्पण करून मोठ्या संतोषानें प्रत्येक घांस मिटक्या मारीत खाणाऱ्या ब्राह्मणाच्या मुखानें अन्न खाऊन जसा मीं तृप्त होतों, तशी तृप्ति यज्ञामध्यें यजमानानें दिलेले तुपानें थबथबलेले हविर्भाग अग्निमुखानें भक्षण करूनहि मला होत नाहीं ॥ ८ ॥ माझ्या योग-मायेचें ऐश्वर्य अपरिमित आहे व त्याला कोठेंहि प्रतिबन्ध नाहीं. माझें चरणतीर्थ सर्व जगाला पवित्र करून शंकरासहित सर्वांना पवित्र करतें, असा मी असूनहि ज्या ब्राह्मणांची निर्मळ पायधूळ मुकटांवर धारण करतों, त्या ब्राह्मणांनीं केलेला क्षुल्लक अपकार कोण बरें सहन करणार नाहीं ? ॥ ९ ॥ अहो मुनि हो, माझी राहण्याचीं तीन स्थानें आहेत. एक उत्तम ब्राह्मण, दुसरें गाई व तिसरें निराश्रित प्राणी. ह्या तिन्हींविषयीं जे भेदभाव ठेवतात,

त्यांच्या दृष्टि पापामुळें अगदीं नाहींशा झाल्या, असेंच म्हटलें पाहिजे. अशा लोकांना शिक्षा देण्याकरितां यमराजाची योजना मीं केलेली आहे व त्याचे सर्पासारखे क्रोधिष्ठ असे गृध्ररूपी दूत क्रोधानें त्यांच्या अंगाचे लचके तोडतात ॥ १० ॥ ब्राह्मण जरी कठोर भाषण करीत असले, तरी ते मत्स्वरूपीच होत असें समजून, जे लोक त्यांची पूजा करतात, व अंतःकरणांत नेहमीं आनंदित राहून हंसत असतात आणि जे आपल्या प्रेमयुक्त मधुर-वाणीनें ब्राह्मणांना पुत्रवत् समजून माझ्याप्रमाणें गौरव करतात, त्यांचा मी नित्य अंकित असतों ॥ ११ ॥ तरी यांचा स्वामी जो मीं, त्या माझा अभिप्राय लक्ष्यांत न घेतां त्यांनीं तुमचा जो अपमान केला त्याबद्दल त्यांना अधोगति तत्काळ प्राप्त होवो; पण ती प्राप्त झाल्यावर पुनः लवकर ते माझ्याजवळ यावे आणि या माझ्या सेवकांचा वियोग लवकर संपावा; म्हणजे तोच माझ्यावर तुमचा मोठा अनुग्रह होईल ॥ १२ ॥

ब्रह्मदेव म्हणतो, देव हो, त्या सनत्कुमारादि ऋषींना जरी क्रोधानें व्याप्त केलेलें होतें, तथापि भगवंताचें तें मनोहर आणि दिव्य असें अनुकूल भाषण ऐकून त्यांचा राग शांत झाला; पण त्यांची मति गुंग झाली ॥ १३ ॥ परमेश्वराच्या त्या भाषणांत शब्द थोडे पण अर्थ थोर असल्यामुळें तें समजण्यास फार कठीण होतें. सनत्कुमारादि मुनींनीं तें चांगलें लक्ष देऊन ऐकिलें व त्यांतील खोल अर्थाचा आणि भारदस्त शब्दांचा, त्यांनीं आपल्या मनाशीं बराच विचारहि केला; परंतु भगवंताच्या मनांत काय कर्तव्य आहे, ( आपल्याला दोष द्यावयाचा आहे, कीं आपलें अभिनंदन करावयाचें आहे, ) हें त्यांना समजलें नाहीं ॥ १४ ॥ परंतु परमेश्वरानें आपल्या अत्यंत थोर ऐश्वर्याचा उत्कर्ष करण्यासाठींच योग-मायेच्या बलानें हें सर्व केलें, असें शेवटीं त्यांना समजलें आणि त्यांना आनंद होऊन त्यांच्या अंगावर रोमांच उभे राहिले. तेव्हां मग हात जोडून ते भगवंताला म्हणाले॥ १५॥

ऋषि, म्हणतात,— हे सर्वैश्वर्यसंपन्न देवा, तूं सर्वांचा अधिपति असूनहि ‘ माझ्या सेवकांनीं जो अपराध केला तो मींच केला, तरी माझ्यावर अनुग्रह करावा ’ असें जें म्हटलेंस, त्यामुळें तुझ्या मनांतील अर्थ काय आहे याविषयीं आम्हीं गोंधळून गेलों आहों ॥ १६ ॥ परमेश्वरा, तूं ब्राह्मणांचा कैवारी आहेस व ब्राह्मण हेंच आपलें श्रेष्ठ दैवत असें तूंच म्हणतोस हें खरें; परंतु वास्तविक पाहिलें तर हे भगवंता, तूंच देवांना देखील पूज्य अशा ब्राह्मणांचा आत्मा व दैवत आहेस ॥ १७ ॥ हे प्रभो, सनातनधर्माची उत्पत्ति तुझ्यापासूनच झाली आहे आणि तूंच अनेक अवतार घेऊन त्याचें रक्षण करतोस. व तो धर्म आचरण करून मिळवावयाचें जें गूढ फळ तेंहि तूंच आहेस, ही गोष्ट वेदांनाहि मान्य आहे ॥ १८ ॥ देवा, तुझ्या कृपेनेंच योगी जन वैराग्यशील होऊन जन्ममरणरूप संसाराला तरून जातात. असें असतां तुझ्यावर इतरांनीं अनुग्रह करावा, ही गोष्ट कशी काय जुळते बरें ? ॥ १९ ॥ द्रव्येच्छु लोक लक्ष्मीची पायधूळ आपल्या मस्तकावर धारण करितात; पण ती लक्ष्मी आपण होऊन नित्य तुझी सेवा करीत असते. अशी सेवा करण्यांत, एखाद्या पुण्यवान् पुरुषानें तुमच्या पायांवर

तुळशींची नूतन माळ आणून घातली असतां, तिच्यावर भाग्यशाली भ्रमर जसा येऊन बसतो, तसा अधिकार आपल्यालाहि व्हावा, अशीच तिची इच्छा असते ॥ २० ॥ लक्ष्मी आपल्या शुद्ध आचरणानें तुझी अशी सेवा करीत असतांहि तूं तिचा फारसा मान ठेवीत नाहींस. कारण तुझें तिच्या ठिकाणीं तसें प्रेमच नाहीं. तुझें खरें प्रेम आपल्या भक्तांवरच असतें. अशा प्रकारचा तूं असतांना प्रतिमार्गांत लागलेली ब्राह्मणांची पवित्र पायधूळ आणि श्रीवत्सचिन्ह * हीं तुला पवित्र करणारीं आहेत, म्हणून तूं त्यांचा स्वीकार केलास असें कसें म्हणतां येईल ? तूं सर्व ऐश्वर्यांचा निधि असल्यामुळें या जोडीचा स्वीकार केवळ संग्रह म्हणून तूं केला आहेस हेंच खरें ॥ २१ ॥ हे ईश्वरा, तूं तीन युगांत उत्पन्न होत असतोस. धर्म हें ऐश्वर्यसंपन्न अशा तुझें स्वरूप होय. आपल्या धर्मस्वरूपी तीन चरणांनीं तूं या जराचर विश्वाचें देवांकरितां व ब्राह्मणांकरितां रक्षण करतोस. त्या धर्माचा नाश करणारे असे जे रजोगुण व तमोगुण त्यांचें निराकरण करून त्यांचें रक्षण करण्यासाठीं ही सत्त्वगुणात्मक अशी कल्याणप्रद मूर्ति तूं धारण केली आहेस ॥ २२ ॥ हे देवा, तूं धर्मरूप असून श्रेष्ठ अशा ब्राह्मणकुलाचें रक्षण करणें हें तुझें कर्तव्यच होय. जर तूं मधुर भाषणानें त्याचा आदर करून रक्षण करणार नाहींस, तर त्यामुळें तूंच स्थापन केलेला असा कल्याणकारक धर्ममार्ग त्वरित नष्ट होईल आणि तूं श्रेष्ठ असून असें करशील तर तुझें हे दुसरे लोक प्रमाण मानून त्याचेंच अनुकरण करतील ॥ २३ ॥ हे ईश्वरा, लोकांचें कल्याण करावें अशीच तुझी इच्छा असल्यामुळें राजे इत्यादि आपल्या मूर्तशक्तींनीं तूं अधर्मप्रवर्तकांचा नाश करीत असतोस. तूं सत्त्वगुणाची खाण आहेस; अर्थात् तुझ्या धर्ममार्गाचा नाश होणें ही गोष्ट तुला सर्वथा अनिष्टच आहे. ( यास्तव या धर्ममार्गाचें पालन व्हावें म्हणून तूं आम्हांला नमस्कार करतोस हें ठीकच आहे. ) पण असा नमस्कार तूं केलास म्हणजे तेवढ्यानें तुझें तेज उणें होतें असें मात्र नाहीं. तो तुझा केवळ विनोद आहे. कारण तूं त्रैलोक्याचा स्वामी असून विश्वाचें पोषण करणारा आहेस ॥ २३ ॥ हे देवा, तूंच आम्हां सर्वांचा अधिपति असल्यामुळें या द्वारपालांना तूं दंड केलास किंवा त्यांना अधिक वेतन दिलेंस, तरी तें आम्ही निष्कपटपणें सर्व मान्य करूं. फार काय, पण हे तुझे द्वारपाल निरापराधी असतांना आम्हीं त्यांना जो शाप दिला, त्याबद्दल जो उचित दंड आहे असेल तोहि आम्हांला तूं कर ! ॥ २५ ॥

सनत्कुमारांचें हें भाषण ऐकून भगवान् म्हणाले,—हे दोघे लवकरच दैत्ययोनींत उत्पन्न होतील आणि तेथें विरोधाच्या आवेशामुळें ह्यांचें चित्त माझ्या ठिकाणीं सारखें

---

* भृगुऋषीनें विष्णूच्या सात्त्विकपणाची परीक्षा पाहण्यासाठीं त्याच्या वक्षःस्थलावर लाथ मारिली असतां विष्णूनें न रागावतां उलट भृगूचा परम आदर केला आणि तें लाथेचें चिन्ह प्रसाद म्हणून कायमचें धारण करण्याचें ठरविलें. तें चिन्ह म्हणजे श्रीवत्सचिन्ह होय.

लागून राहील. अशा रीतीनें त्यांचा भक्तियोग दृढ झाला म्हणजे पुनः हे लवकरच माझ्याजवळ प्राप्त होतील. त्यांना तुम्हीं जो शाप दिला, तो वस्तुतः मींच निश्चित केला होता, असें तुम्हीं समजा ! ॥ २६ ॥

एवढें सांगून ब्रह्मदेव म्हणाला--देव हो, नंतर त्या सनत्कुमारप्रभृति ऋषींनीं नेत्रांना मोठ्या आनंदाचें ठिकाण असा तो भगवान् विष्णु आणि त्याचें स्वयंप्रकाशित असें तें वैकुंठनामक निवासस्थान याचें पुनः एकदां दर्शन घेतलें ॥ २७ ॥ नंतर त्यांनीं श्रीहरीला प्रदक्षिणा करून नमस्कार केला आणि त्याची अनुमति घेऊन मोठ्या आनंदानें विष्णूच्या ऐश्वर्याचें वर्णन करीत ते परत गेले ॥ २८ ॥ ऋषि गेल्यावर भगवान् आपल्या सेवकांना म्हणाले, जयविजयहो, जा, तुम्हीं भिऊं नका, तुमचें कल्याण असो. ऋषींच्या शापाचें निरसन करण्याचें माझ्या अंगीं जरी सामर्थ्य आहे; तथापि ब्रह्मतेज मला मान्य असल्यामुळें मी त्याचा विघात करूं इच्छित नाहीं. ॥ २९ ॥ ( विष्णु म्हणाले, ) जयविजयहो, पूर्वीं मीं योगनिद्रा घेत असतां लक्ष्मी माझ्या मंदिरांत येत होती, तेव्हां दरवाजांत तुम्ही तिला प्रतिबंध केला होता आणि त्या वेळीं तिनेंहि रागावून असेंच सांगून ठेविलें होतें ( व त्याप्रमाणें आज घडून आलें ) ॥ ३० ॥ यास्तव तुम्हीं माझी विरोधभक्ति करा; म्हणजे तिच्या योगानें ब्राह्मणांचा अपमान केल्याच्या पापापासून मुक्त होऊन थोडक्याच कालानें माझ्याजवळ पुनः परत याल ॥ ३१ ॥ याप्रमाणें आपल्या द्वारपालांना आज्ञा करून भगवान् विष्णूनें, विमानांच्या अनेक रांगा लागून गेल्यामुळें शोभायमान झालेल्या आणि सृष्टीच्या संपत्तींत सर्वश्रेष्ठ व वैभवानें युक्त अशा आपल्या स्वतःच्या मंदिरांत प्रवेश केला ॥ ३२ ॥ ब्रह्मदेव म्हणतो,—देवहो, याप्रमाणें ब्राह्मणाच्या दुस्तर अशा शापाच्या योगानें त्या देवश्रेष्ठ जयविजयांचें तेज आणि अभिमान नष्ट होऊन ते त्या वैकुंठलोकापासून भ्रष्ट झाले ॥ ३३ ॥ हे पुत्रहो, ते दोघे द्वारपाळ वैकुण्ठांतून खालीं पडत असतां विमानांत बसलेल्या श्रेष्ठ लोकांमध्यें मोठा हाहाःकार उडाला ॥ ३४ ॥ असो. तेच श्रीहरीचे दोघे मुख्य द्वारपाल सांप्रत कश्यपऋषीच्या दितीच्या उदरांत स्थापित झालेल्या तीव्र तेजांत प्रविष्ट झाले आहेत ॥ ३५ ॥ त्या दोन जुळ्या असुरांच्या तेजानें आज तुमचें तेज फिकें पडलें आहे. या वेळीं श्रीहरीच्या मनांत तसेंच करण्याची इच्छा आहे ॥ ३६ ॥ देव हो, या कामीं आम्हीं कितीहि विचार केला, तरी कांहीं निष्पत्ति होणार नाहीं. ह्या वेळीं तो त्रैलोक्याचा स्वामी श्रीहरीच आमचें कल्याण करील. तो सृष्टीची उत्पत्ति, स्थिति व संहार यांचें कारण असून, मोठमोठ्या योगी लोकांना देखील त्याच्या मायेचा अन्त लागत नाहीं ॥ ३७ ॥

**सोळावा अध्याय समाप्त**

---

# अध्याय १७ वा

मैत्रेयऋषि म्हणाले—विदुरा, ब्रह्मदेवानें याप्रमाणें सांगितलेलें दितीच्या गर्भाच्या घोर तेजाचें कारण श्रवण केल्यातर देवांची भीति नाहींशी झाली आणि ते तेथून स्वर्गास परत गेले ॥ १ ॥ पतीनें सांगितल्यावर त्या साध्वी दितीच्या मनांत, आपल्या पुत्रांविषयीं मोठी भीति होतीच. शंभर वर्षें पूर्ण झाल्यावर तिला दोन जुळे पुत्र झाले ॥ २ ॥ त्या पुत्रांच्या जन्माच्या वेळीं स्वर्गांत, आकाशांत व पृथ्वीवर पुष्कळ उत्पात झाले आणि त्यांमुळें लोकांना फार भय वाटूं लागलें ॥३॥ जिकडेतिकडे भूकंप झाले, पर्वत हालूं लागले, सर्व दिशा पेटल्यासारख्या दिसूं लागल्या, उल्कापात झाले, विजा कडकडल्या व अरिष्टसूचक असे धूमकेतूहि उगवले ॥ ४ ॥ अंगास झोंबणारा सोसाट्याचा वारा वारंवार वाहूं लागला. त्यांचीं वावटळीरूप सैन्यें आणि धुळीचीं निशाणें जिकडेतिकडे फडकूं लागलीं; आणि त्यामुळें अनेक प्रचंड वृक्ष उपटून पडले ॥ ५ ॥ आकाशांत जिकडेतिकडे मेघांच्या रांगा दिसूं लागल्या. विजांचा कडकडाट सुरू झाला, नक्षत्रें दिसेनाशीं झालीं आणि सर्व आकाश अंधकारानें भरून जाऊन त्यांत पाऊलभर देखील जागा मोकळी दिसत नाहीशी झाली ॥ ६ ॥ समुद्र एखाद्या दुखणेकऱ्यासारखा घाबरून गर्जूं लागला. त्याच्या लाटा उंच उंच उसळूं लागल्या व त्याच्या उदरांतील मगर, सुसरी, इत्यादिक प्राणी खवळून गेले. तळीं, विहिरी व नद्या गढूळ झाल्या व त्यांतील कमळें सुकून गेलीं ॥ ७ ॥ चंद्र-सूर्यांना वारंवार खळीं पडून राहु-केतूंची पीडा होऊं लागली. आकाशांत अभ्रें नसतांनांच मेघगर्जना होऊं लागल्या व पर्वतांच्या गुहांतून रथाच्या खडखडाटासारखे ध्वनि उत्पन्न होऊं लागले ॥ ८ ॥ तोंडांतून भयंकर अग्नीच्या ठिणग्या सोडणाऱ्या कोल्ह्या गांवांत शिरून अशुभ शब्द करूं लागल्या; व त्यांच्याबरोबर कोल्हे आणि घुबडेंहि कर्कशपणें ओरडूं लागलीं ॥ ९ ॥ कुत्रे आपल्या माना उंच करून कधीं गाण्यासारखे,तर कधीं रडण्यासारखे असे अनेक प्रकारचे हेल काढीत ओरडत जिकडेतिकडे फिरूं लागले ॥ १० ॥ हे विदुरा, गर्दभांचे कळपचे कळप उन्मत्त होऊन आपल्या जातीला अनुसरून जलदीनें कर्कश शब्द करीत धावूं लागले आणि आपल्या कठोर खुरांनी पृथ्वीवर ताडताड प्रहार करीत चोहोंकडे धावूं लागले ॥ ११ ॥ पक्षी त्या गर्दभांच्या शब्दांनीं घाबरून जाऊन ओरडतओरडत आपल्या घरट्यांतून उडून जाऊं लागले. तसेंच पशूहि गोठ्यांत व अरण्यांतील पशु देखील अगदीं गांगरून जाऊन मलमूत्र सोडूं लागले ॥ १२ ॥ गाईहि घाबरल्या, आणि त्यामुळें दुधाऐवजीं त्यांच्या कांसांतून रक्त पडूं लागलें. मेघांतून पुवाची वृष्टि होऊं लागली, देवांच्या मूर्तिहि रडूं लागल्या आणि वाऱ्याशिवायच झाडें मोडून पडूं लागलीं ॥ १३ ॥ मंगल, शनि इत्यादि पापग्रहांना

विशेष उत्तेजन आलें आणि ते सौम्य अशा बुध, गुरु इत्यादि इतर ग्रहांचें व नक्षत्रगणांचें उल्लंघन करून जाऊं लागले. तसेंच ते पुढें गेले असतांहि पुनः उलट गतीनें मागें फिरून एकमेकांशी युद्ध करूं लागले ॥ १४ ॥ या आणि दुसऱ्या उत्पाताचें खरें कारण एकट्या सनत्कुमारांशिवाय इतर कोणालाहि माहीत नव्हतें, त्यामुळें हे मोठे उत्पात पाहिल्याबरोबर सर्व लोकांना भीति उत्पन्न होऊन विश्वाचा प्रलय होण्याची वेळ आली कीं काय, असें त्यांस वाटूं लागलें ॥ १५ ॥ ते दोघे आदिदैत्य उत्पन्न झाल्याबरोबर लगेच त्यांचा पूर्वसिद्ध पराक्रम प्रगट होऊं लागला. दोघांचींही शरीरें दगडासारखीं बळकट होतीं व क्रमाक्रमानें तीं वाढून प्रचंड पर्वतासारखीं दिसूं लागलीं ॥ १६ ॥ त्यांच्या मस्तकांवर सुवर्णाचा मुगुट असून त्या मुगुटांचीं अग्रें आकाशमण्डळाला लागलीं होतीं. दोघेहि चालतांना पावलोंपावलीं आपल्या पायांच्या प्रहारांनीं पृथ्वीला कांपवीत असत. दोघांच्याहि कमरेला उत्तम कमरपट्टे असून ते उभे राहिले म्हणजे त्यांच्या कटिप्रदेशानें सूर्यहि झांकून जात असे ॥ १७ ॥ मग कश्यपमुनींनीं त्या जुळ्या मुलांचीं नांवें ठेविलीं आणि त्याप्रमाणें जो त्याच्या देहापासून प्रथम[1] उत्पन्न झाला तो हिरण्यकशिपु व प्रसूतिकाळीं दिति ज्याला प्रथम प्रसवली तो हिरण्याक्ष असें लोक समजूं लागले ॥ १८ ॥ हिरण्यकशिपूनें ब्रह्मदेवापासून आपल्याला कोठूनहि मृत्यु नसावा असा वर मिळविला आणि त्याच्या बळावर उन्मत्त होऊन आपल्या बाहुबळानें लोकपालांसहित साऱ्या त्रैलोक्याला आपल्या स्वाधीन करून घेतलें ॥ १९ ॥ हिरण्यकशिपूची आपला कनिष्ठ बंधु जो हिरण्याक्ष त्यावर फार प्रीति असे व हिरण्याक्षहि त्याचें प्रेम संपादन करण्यांत दक्ष असे. हिरण्याक्षाला युद्धाची आवड असल्यामुळें तो एकदां आपल्या हातांत गदा घेऊन युद्धप्रसङ्ग उपस्थित करण्याकरितां स्वर्गलोकीं गेला ॥ २० ॥ त्याच्या पराक्रमापुढें टिकाव धरणें फार कठीण होतें. त्याच्या पायांतील सुवर्णाचें नूपुर खुळखुळ वाजत होतें व गळ्यांत वैजयन्ती माळ घालून त्यानें खांद्यावर मोठी गदा टाकिली होती. शौर्य, शारीरबल आणि त्यांत देवांचा वर ह्या तीन कारणांनीं तो अतिशय गर्विष्ठ झाला होता. अशा रीतीनें निष्प्रतिबंध व निर्भय होऊन तो स्वर्गलोकांत फिरूं लागला असतां गरुडाला पाहून जशी सर्पांची त्रेधा उडते व ते कोठे तरी जाऊन लपून बसतात, त्याप्रमाणें त्या हिरण्याक्षाला पाहूनहि देव भयभीत झाले आणि लपून बसले ॥ २१ ॥ २२ ॥ तेव्हां इंद्रासह ते सर्व देव आपल्या तेजामुळें लपून बसले आहेत असें पाहून व त्यांच्यामध्यें

---

१ यदाविशेद्द्विधाभूतं बीजं पुष्पं परीक्षरत् । द्वौ तदा भवतो गर्भौ सूतिर्वेशविपर्ययात् ॥ जेव्हां गर्भोत्पत्तीच्या वेळीं पुष्पाकार गर्भाशयामध्यें रेताचे दोन भाग होऊन रेत मागेंपुढें प्रविष्ट होतें तेव्हां जुळीं अपत्यें होतात. पित्याकडून प्रथम ज्या गर्भाची स्थापना झालेली असते तो गर्भ गर्भाशयांत मागें असतो व पाठीमागून स्थापलेला पुढें असतो, म्हणून प्रसूतिकाळीं दुसरा गर्भ प्रथम बाहेर येतो व प्रथम स्थापिलेला मागाहून येतो. म्हणजे गर्भोत्पत्तीच्या उलट प्रसूतिक्रम असतो. म्हणूनच ज्येष्ठत्व व कनिष्ठत्व प्रसूतिक्रमानें न धरतां तिच्या उलट म्हणजे गर्भस्थापनेच्या क्रमानें मानितात.

मत्तपणा दिसून येत नाहीं असें जाणून, त्या दैत्यानें मोठ्यानें गर्जना केली ।।२३।। मग तो महापराक्रमी हिरण्याक्ष स्वर्गांतून निघून खोल व भयंकर गर्जना करणाऱ्या अशा समुद्राजवळ आला आणि क्रीडा करावी अशा उद्देशानें एखाद्या मदोन्मत्त हत्तीप्रमाणें त्यानें त्या अपार समुद्रांत उडी घेतली।। २४।।तो समुद्रांत शिरला असतां वरुणाचे सैनिक जे जलचर प्राणी त्यांचे समुदाय हतबुद्ध होऊन घाबरून गेले आणि हिरण्याक्षानें जरी कोणालाहि मारलें नाहीं, तरी केवळ त्याच्या तेजानेंच पराभूत झाल्यासारखे होऊन ते दूर पळून गेले।।२५।।हे विदुरा, तो महापराक्रमी हिरण्याक्ष अनेक वर्षें समुद्रांत संचार करीत असतां वायूनें उसळणाऱ्या मोठमोठ्या लाटांना आपल्या लोखंडी गदेनें वारंवार तडाखे देत देत वरुणाच्या विभावरीनामक राजधानीस येऊन पोंचला ।। २६ ।। तेथें दैत्यलोकांचा अधिपति आणि सर्व जलचर प्राण्यांचा नायक असा जो वरुण, त्याच्याजवळ तो गेला आणि त्याचा उपहास करण्याकरितां नीचासारखा त्याला नमस्कार करून हंसत हंसत म्हणाला,—' अहो राजाधिराज, मला युद्धदान द्याल काय ? ।।२७।। अहो महाराज, आपण लोकांचे प्रतिपालक असे राजाधिराज आहां व तुमची कीर्ति सर्वत्र मोठी पसरलेली आहे. जे कोणी मदोन्मत्त लोक स्वतःला पराक्रमी मानितात, त्यांच्या पराक्रमाची फजिती करणारे तुम्हीच आहां. कारण, पूर्वी आपण जगांतील सर्व दैत्यांना व दानवांना जिंकून राजसूय यज्ञ केला होता ।।२८।। दुष्ट हिरण्याक्ष गर्वानें उच्छृंखल झाला व त्यानें अशा रीतीनें भगवान् वरुणाचा फार उपहास केला असतां वरुणाला क्रोध आला; परंतु विचार करून त्यानें तो राग शांत केला आणि हिरण्याक्षाला तो म्हणाला,—' अहो दैत्यमहाराज, आम्हीं आतां युद्धादि प्रकार सोडून देऊन शांतीचा स्वीकार केलेला आहे ।। २९ ।। हे दैत्यश्रेष्ठा, तूं युद्धकलेंत निष्णात आहेस. तुझ्याबरोबर युद्ध करून तुझें समाधान करणारा प्राणी पुराणपुरुषावांचून दुसरा कोणी मला दिसत नाहीं; यास्तव तूं त्या पुराणपुरुषाकडेच जा ! तुझ्यासारखे गुणी पुरुष त्याची प्रशंसा करीत असतात ।। ३० ।। साधूंवर अनुग्रह करावा आणि तुझ्यासारख्या दुष्टांचा निग्रह करावा, या उद्देशानें तो पुराणपुरुष अनेक अवतार धारण करीत असतो. त्या वीराशीं तुझी जर गांठ पडेल, तर तुझा गर्व सर्वस्वीं नाहींसा होईल आणि मग तूं वीरांना योग्य अशा रणांगणांतील शय्येवरच खुशाल झोंप घेशील आणि तुझ्याभोंवतीं कुत्र्यांचा गराडा पडेल ।। ३१ ।।

## सतरावा अध्याय समाप्त

# अध्याय १८ वा

मैत्रेयऋषि म्हणाले,—विदुरा, याप्रमाणें वरुणाचें तें भाषण ऐकून हिरण्याक्षाला फार आनंद झाला. उन्मत्तपणामुळें त्याची त्यानें मुळींच क्षिति केली नाहीं आणि नारदऋषींपासून तो भगवान् आदिवराह कोठें आहे हें समजून घेऊन मोठ्या त्वरेनें तो रसातळांत शिरला ॥ १ ॥ तेथें अजिंक्य असा वराहरूपी भगवान् आपल्या दाढेच्या टोंकावर पृथ्वी धारण करून तिला वर घेऊन येत आहे, असें त्याच्या दृष्टीस पडलें. त्यानें आपल्या आरक्तवर्ण नेत्रांच्या कान्तीनें हिरण्याक्षाचें तेज फिक्कें पाडलें होतें. त्याला पाहून, अहो, हा तर अरण्यांत राहणारा पशु आहे! असें म्हणून हिरण्याक्षानें त्याचा उपहास केला ॥२ ॥ हिरण्याक्ष आदिवराहाला आणखी म्हणाला,–हे मूर्खा, इकडे ये आणि ह्या पृथ्वीला सोडून दे. विश्वकर्म्यानें आम्हां पाताळवासी लोकांना ही पृथ्वी दिलेली आहे. अधम देवा, तूं हें वराहाचें शरीर कपटानें धारण केलें आहेस. मी पाहत असतां हिला घेऊन जाशील, तर तुझें कल्याण होणार नाहीं ॥ ३ ॥ अरे, आमचे शत्रु जे देव त्यांनीं तुला आमच्या नाशाकरितां पोसलें आहे काय? तूं दृष्टीआड राहूनच दैत्यांना जिंकीत असतोस आणि त्यांचा वध करतोस. मूर्खा! योगमायेच्या आधारावरच काय तो तुझा पराक्रम. वास्तविक तुझा पराक्रम क्षुद्र आहे. हा पाहा तुला मारून माझ्या बांधवांचा शोक मी आतां नाहींसा करतों ॥ ४ ॥ आमच्या हातांतून सुटलेल्या ह्या गदेनें तुझ्या मस्तकाचे तुकडे होऊन तूं मरण पावलास म्हणजे तुझी आराधना करीत असलेले तुझे जे भक्त, ऋषि व देव त्या सर्वांचा आधार तुटून ते सर्व नष्ट होतील * ॥ ५ ॥ शत्रूचीं तीं शल्यासारखीं भाषणें परमेश्वराच्या हृदयास झोंबलीं; परंतु त्यानें आपल्या दाढेच्या

---

* ३ पासून ५ पर्यंतच्या श्लोकांत हिरण्याक्षानें वराहरूपी भगवंताला उद्देशून जें भाषण केलें, त्याचा सरळ लौकिक अर्थ वर आला आहे; पण हिरण्याक्ष हा मूळ भगवंताचा भक्त असल्यामुळें त्यानें अंतर्यामीं त्याची स्तुतीच केली असली पाहिजे, असें समजून या पांच श्लोकांत द्व्यर्थी शब्दांची योजना केली आहे. त्यांपैकीं स्तुतिपर अर्थ असाः—

" हिरण्याक्ष त्याला म्हणाला,——हे वराहस्वरूपा, या पृथ्वीचा तूं उद्धार कर, कारण ही कांहीं रसातळांत राहणाऱ्यांना ब्रह्मदेवानें दिलेली नाहीं. मीं पाहत असतां ही घेऊन तुला सुखरूपपणें वर जातां येणार नाहीं काय? अवश्य येईल. कारण हे परमेश्वरा, देव देखील तुझ्या मानानें खालच्या पदवीचे आहेत आणि तूं तर या पृथ्वीच्या उद्धारासाठींच वराहरूप धारण केलें आहेस ॥ ३ ॥ आमचे सावत्र बंधु जे देव, ऋषि इत्यादि त्यांनीं संसारविमुक्तीसाठीं तुला संतुष्ट केलें आहे. असुरांचा वध तूं मायेच्या योगानें करितोस, कारण तूं अप्रत्यक्षपणें विजय संपादन करतोस. तूं योगमायेच्या बलानें युक्त

अग्रावर असलेली पृथ्वी भ्यालेली आहे असें पाहून, ते तीक्ष्ण वाक्प्रहार त्यानें सहन केले आणि मगरानें पीडिलेला हत्ती जसा हत्तिणीसह पाण्यांतून बाहेर पडतो, त्याप्रमाणें तो वराहरूपधारी विष्णु पृथ्वीला घेऊन पाण्यांतून वर आला ॥ ६ ॥ हत्ती पाण्यांतून बाहेर पडूं लागला म्हणजे मगर जसा त्याच्या मागें लागतो, त्याप्रमाणें पाण्यांतून बाहेर पडतेवेळीं हिरण्याक्ष भगवान् आदिवराहाच्या मागें लागला होता. त्या दैत्याचे केंस सुवर्णासारखे असून दाढा भयंकर होत्या, व शब्द मेघगर्जनेसारखा होता; तशा त्या आपल्या शब्दानें हिरण्याक्ष ईश्वरास म्हणाला, ज्यांनीं लज्जा सोडून दिली अशा दुष्टांना निन्देची क्षिति असते काय ?' * ॥ ७ ॥ त्या आदिवराहानें पूर्वीप्रमाणें उदकावरील योग्य स्थळीं पृथ्वीला बसवून तिच्यामध्यें भगवन्तानें आपली शक्ति स्थापन केली. त्या वेळीं हिरण्याक्षासमक्ष ब्रह्मदेवानें आदिवराहाची स्तुति केली आणि देवांनीं त्यावर पुष्पवृष्टि केली ॥ ८ ॥ शरिरावर सुवर्णाचे अलंकार, हातांत प्रचण्ड गदा आणि अंगांत सोन्याचें अद्भुत चिलखत घातलें होतें, असा तो दैत्य भगवंताच्या पाठीस लागून त्याला ताडन करीत असतां भगवन्ताला मोठा क्रोध आला आणि त्याचा उपहास करीत त्याला त्यांनीं उत्तर दिलें ॥ ९ ॥

भगवान् म्हणाले—अरे, आम्हीं रानांत फिरणारे पशूच आहों, यांत शंका नाहीं; पण सध्यां मी तुझ्यासारख्या कुत्र्यांना शोधीत आहें. अरे दुर्दैवी दैत्या, तूं या वेळीं मृत्यूच्या पाशांनीं अगदीं जखडलेला असल्यामुळें तुझ्या या वल्गना वीरपुरुष मुळींच मनावर घेणार नाहीं ॥ १० ॥ हे पाहा, आम्हीं रसातळवासी लोकांची ठेव पळवून नेत आहों. आम्हीं निर्लज्ज तर आहोंच, आणि तूं आपल्या गदेनें आम्हांला पळवून लाविलें

---

असल्यामुळें, इतरांचा पराक्रम तुझ्यापुढें क्षुद्र आहे. तूं अज्ञानी लोकांचेहि योगक्षेम चालवितोस. हे भगवन्, तुझी स्थापना मीं आपल्या अंतःकरणांत योग्याप्रमाणें करून, मीं आपल्या बांधवांचेंहि दुःख नष्ट करीन ॥ ४ ॥ माझ्या हातून निसटून गदा तुझ्या मस्तकाला लागलीच, तरी तें विदीर्ण होणार नाहीं. तूं स्वस्थच राहशील आणि तुला पूजा अर्पण करणारे जे देव आणि ऋषि आहेत, त्या सर्वांचा आधार तुटणार नाहीं ॥५॥

* ६ आणि ७ या श्लोकांतहि श्लेषार्थ आहे. तो असा:— त्या प्रसंगीं शत्रुरूप धारण केलेल्या हिरण्याक्षाच्या खोल अशा भाषणांचा अर्थ ब्रह्मदेवादिकांना न कळल्यामुळें वराहरूपी भगवंताला खेद झाला, आणि पृथ्वी देखील भयानें व्याकुळ झाली आहे असें पाहून, तो त्या खेदाचा विचार करीत करीत, ज्याप्रमाणें नक्रानें पीडिलेला हत्ती हत्तिणीसह पाण्याच्या बाहेर येतो, त्याप्रमाणें आपल्या दाढेवरील पृथ्वीसह उदकाबाहेर जाऊं लागतांच त्या सुवर्णसारखे केश असलेल्या हिरण्याक्षानें, नक्र हत्तीची पाठ धरतो, त्याप्रमाणें भगवंताची पाठ धरिली आणि भयंकर दाढा व मेघगर्जनेप्रमाणें शब्द असलेला तो दैत्य भगवंताला म्हणाला,—' लोकनिंदेला भिणाऱ्या साधुश्रेष्ठालाहि प्रसंगीं पळून गेल्यासारखें दाखविणें निंदा होत नाहीं. ' ॥ ७ ॥

आहेस. तुझ्याशीं युद्ध करण्याचें आमच्या अंगीं सामर्थ्य नाहीं, तथापि कसेंहि करून तुझ्यापुढें युद्धाला उभें राहाणें आम्हांला भागच आहे; कारण तुझ्यासारख्या बलवानाशीं वैर केल्यावर आतां आम्हीं जाणार तरी कोठें? ॥ ११ ॥ तूं पादचारी योद्धयांमध्यें अग्रगण्य आहेस, अशी तुझी जिकडेतिकडे प्रसिद्धि आहे. तुला कोणाची धास्ती नाहीं, यास्तव आतां आमचा नाश करण्यास तूं लवकर सिद्ध हो आणि आपल्या बान्धवांचे शोकाश्रु पुसून टाक. कारण, जो आपली प्रतिज्ञा पूर्ण करीत नाहीं, त्याला लोक असभ्य समजतात ॥ १२ ॥

मैत्रेयमुनि विदुराला सांगतात,–हे विदुरा, एखाद्या मोठ्या सर्पाला डंवचून खेळवूं लागलें म्हणजे तो जसा फार संतापतो, त्याप्रमाणें भगवंतानें हिरण्याक्षाचा असा धिक्कार करून त्याचा फार उपहास केला. त्यामुळें त्या दैत्याला दुःसह क्रोध उत्पन्न झाला ॥ १३ ॥ मग हिरण्याक्ष इतका रागवला कीं. त्याचे श्वासोच्छ्वास जोरानें चालूं लागले आणि इन्द्रियें क्रोधानें थरथर कांपूं लागलीं. तो त्या वराहाच्या अंगावर धांवून गेला आणि त्यानें आपली गदा त्याच्या अंगावर फेंकली ॥ १४ ॥ विदुरा, तेव्हां योगी जसा मृत्यूला टाळतो, त्याप्रमाणें शत्रूनें वक्षःस्थलाचा नेम धरून सोडलेला त्या गदेचा वेग भगवंतानें जरासें वांकडें होऊन साफ चुकविला ॥ १५ ॥ नंतर हिरण्याक्षानें आपली गदा पुनः उचलून घेतली आणि तो गरगर फिरवीत ती क्रोधानें ओंठ चावूं लागला. इतक्यांत भगवंतानें संतापून त्याच्या अंगावर उडी घेतली ॥ १६ ॥ विदुरा, भगवंतांनीं आपल्या गदेनें शत्रूच्या उजव्या भुंवईवर प्रहार केला खरा; परंतु तितक्यांत हिरण्याक्षानें आपल्या गदेनें भगवंताच्या गदेवर तडाखा दिला. कारण तोहि गदायुद्धांत निष्णातच होता ॥ १७ ॥ अशा रीतीनें हिरण्याक्ष व भगवान् आदिवराह हे दोघेहि अगदीं हातघाईवर आले आणि आपआपल्या प्रचण्ड गदांच्या योगानें एकमेकांस जिंकण्याच्या इच्छेनें दोघांनींहि परस्परांवर प्रहार चालविले ॥ १८ ॥ ज्याप्रमाणें दोघे मदोन्मत्त बैल एखाद्या गाईसाठीं परस्परांस जिंकण्याच्या इच्छेनें स्पर्धेनें लढतात, त्याप्रमाणें वराह व हिरण्याक्ष हे दोघे लढूं लागले. पृथ्वीच्या स्वामित्वासाठीं त्यांची स्पर्धा लागली व कठोर गदांच्या प्रहारांनीं दोघांचींहि शरीरें ठेंचून गेलीं. जखमांतून वाहणाऱ्या रक्ताच्या दर्पामुळें दोघांचेहि क्रोध अधिक अधिक वाढत गेले होते; व अशा स्थितींत अनेक प्रकारचे गदेचे हात करीत चालू असलेलें त्यांचें युद्ध आश्चर्य करण्यासारखें भासूं लागलें ॥ १९ ॥ विदुरा, मायेनें वराहरूप धारण केलेला तो महासमर्थ यज्ञरूपी ईश्वर आणि तो हिरण्याक्ष दैत्य यांचें पृथ्वीच्या स्वामित्वाविषयीं वैर उत्पन्न होऊन जें हें युद्ध चालू झालें, तें पाहण्यासाठीं ब्रह्मदेव ऋषिमंडळीसह तेथें आला ॥ २० ॥ तेव्हां हजारों ऋषींना समागमें घेऊन आलेल्या त्या भगवान् ब्रह्मदेवाला असें दिसून आलें कीं, त्या दैत्याचें शौर्य मोठें असून त्याला भीति कशी ती मुळींच वाटत नाहीं; तसेंच भगवन्तानें योजिलेल्या प्रत्येक युक्तीचा तो प्रतिकार करीत असून त्याच्या पराक्रमाचा नाश करणें फार कठीण आहे. हें पाहून ब्रह्मदेव त्या आदिवराहरूपी नारायणाला सांगूं लागला ॥ २१ ॥

ब्रह्मदेव म्हणाला—हे ईश्वरा, आम्ही तुझ्या पायांजवळ शरण आलों आहों. हा दैत्य, देव, ब्राह्मण, गाई व निरपराधी प्राणी यांचा छळ करितो आणि त्यांना भय दाखवून त्याचे प्राण व संपत्ति हरण करितो. ह्यानें माझ्यापासून वर मिळविला असून मलाच तो काट्यासारखी पीडा करीत आहे. ह्याच्या जोडीचा योद्धा कोणी नसल्यामुळें, तसा प्रतिस्पर्धी आपणास भेटतो काय हें पाहात तो त्रैलोक्यांत फिरत असतो ॥ २२ ॥ २३ ॥ हे देवा, हा कपटी, गर्विष्ठ, निर्भीड आणि अत्यंत दुष्ट आहे. परिणामीं काय होईल हें न ओळखून चवताळलेल्या भुजंगाशीं लहान मूल खेळत असतें, त्याप्रमाणें या दुष्टाशीं तुम्हीं खेळत आहां, असें दिसतें. तरी तसें करूं नका ॥ २४ ॥ हे ईश्वरा, जोंपर्यंत याची अनुकूल वेळ जी संध्याकाळ ती प्राप्त होऊन याचें बळ वाढलें नाहीं, तोंपर्यंतच तुम्हीं आपल्या देवमायेचा स्वीकार करून त्या पापी दैत्याचा वध करा ! ॥ २५ ॥ हे प्रभो, आपण सर्वांचे अन्तर्यामीं राहत आहां, ही लोकांचा घात करणारी अशी भयंकर वेळ अगदीं जवळ येत आहे. तरी आपण आतां देवांना जय मिळवून द्या ॥ २६ ॥ या वेळीं अभिजित् नांवाचा दोन घटिकांचा शुभयोग आहे; परंतु तो लवकर जाईल म्हणून ह्या सुमुहूर्तावर या भयंकर दैत्याचा वध करा आणि आपल्या भक्तांचें रक्षण करा ॥ २७ ॥ देवा, ह्याचा मृत्यु आपल्या हातून होणार हें आपणच ठरविलें आहे. या वेळीं सुदैवानें हा आपल्याजवळ प्राप्त झाला आहे; तरी आपण याला युद्धांत पराजित करून याचा वध करा आणि त्रैलोक्याचें कल्याण करा ! ॥ २८ ॥

**अठरावा अध्याय समाप्त**

---

# अध्याय १९ वा

मैत्रेयऋषि म्हणाले—विदुरा, निष्कपट व अमृततुल्य असें तें ब्रह्मदेवाचें भाषण ऐकून भगवंतास हंसू[1] आलें आणि त्यानें आपल्या प्रेमयुक्त नेत्रकटाक्षानें ब्रह्मदेवाकडे अवलोकन करून त्याची ती सूचना मान्य केली ॥ १ ॥ पण तो आपला शत्रु आपल्यापुढें निर्भयपणें संचार करीत आहे असें पाहून त्या भगवान् वराहानें उडी मारली आणि त्या दैत्याच्या हनुवटीवर आपल्या गदेनें प्रहार केला ॥ २ ॥ तेव्हां हिरण्याक्षानेंहि आपल्या गदेचा भगवन्ताच्या गदेवर उलट प्रहार केला असतां भगवन्ताची गदा त्याच्या हातांतून निसटून गिरक्या खात खात खालीं पडली व शोभूं लागली; पण ही गोष्ट मोठी आश्चर्य मानण्याजोगीच झाली, ( असें ब्रह्मदेवादिकांना वाटलें ) ॥ ३ ॥ त्या वेळीं हिरण्याक्षाला चांगलीच संधि सांपडली होती; परंतु त्यानें भगवंताच्या हातांत आयुध नसल्यामुळें त्याच्यावर प्रहार केला नाहीं. युद्धांतहि धर्माचा मान राखून त्यायोगें तो भगवन्ताला त्वेष उत्पन्न करिता झाला ॥ ४ ॥ भगवन्ताच्या हातांतून गदा निसटून खालीं पडली, तेव्हां प्रेक्षकमंडळींत मोठा हाहाःकार उसळला; पण हिरण्याक्षानें युद्धाचा धर्म पाळून प्रहार न केल्याबद्दल भगवंतानें त्याची प्रशंसा केली आणि आपल्या सुदर्शनचक्राचें स्मरण केलें ॥५॥ त्याबरोबर तें चक्र शत्रु वधासाठीं सिद्ध होऊन भगवंताच्या हातांत आलें. तें पाहून स्वतःच्याच सेवकगणांतील प्रमुख सेवक असलेल्या, पण आतां दितिपुत्राच्या रूपानें अधम अशा स्थितींत अवतरलेल्या त्या हिरण्यक्षानें भगवंताशीं युद्ध करण्यासाठीं विशेष लगट केली. तेव्हां भगवंताचें सामर्थ्य न जाणणाऱ्या देवांना भीति वाटून ते निरनिराळ्या प्रकारें कल्पना करूं लागले आणि ' हे भगवंता ! तुझें कल्याण असो, तूं याचा वध कर, ' असे आशीर्वाद त्या भगवंताला देऊं लागले ॥ ६ ॥ तेव्हां कमलासारखे नेत्र असलेला तो भगवान् आपलें सुदर्शनचक्र हातांत घेऊन युद्धासाठीं आपल्यापुढें उभा आहे, असें पाहून हिरण्याक्षाचें सर्वाङ्ग क्रोधानें कांपूं लागलें. त्याचा श्वास जोरानें चालूं लागला आणि क्रोधानें तो आपले ओंठ चावू लागला ॥ ७ ॥ आणि तो भयंकर दाढांचा हिरण्याक्ष, डोळे वटारून पाहूं लागला असतां भगवंताला जाळूनच टाकतो कीं काय, असें भासूं लागलें. त्यानें उडी मारून 'हा पाहा मेलास ! ' असें म्हणून आपल्या गदेनें प्रहार केला ॥ ८ ॥ विदुरा, ती गदा वायुवेगाप्रमाणें भगवंताच्या अंगावर आली; परंतु भगवंतानें शत्रूच्या देखतच त्या गदेला डाव्या पायानें सहज प्रहार करून ती

---

१ मीं कालस्वरूपीच प्रत्यक्ष असतां ब्रह्मदेव मला शुभाशुभ मुहूर्त सांगतो, असें वाटून भगवन्ताला हंसू आलें ( श्रीधर ).

खालीं पाडली ॥ ९ ॥ व यज्ञवराहावतारी परमेश्वर त्यास म्हणाला, हे हिरण्याक्षा, जर तुझ्या मनांतून मला जिंकण्याची इच्छा असेल, तर तूं ही आपली गदा पुन्हा घे आणि उद्योगाला लाग ! असें भगवान् बोलतात तोंच हिरण्याक्षानें मोठ्यानें गर्जना केली आणि ती गदा भगवंताच्या अंगावर फेंकली ॥ १० ॥ भगवंतानें ती गदा आपल्याकडे येत आहे असें पाहून व तितक्याच तयारीनें उभें राहून ती जवळ येतांच, ज्याप्रमाणें गरुड नागिणीला सहज धरतो, त्याप्रमाणें त्यांनीं तिला सहज धरलें ॥ ११ ॥ तेव्हां त्या महादैत्याचें सर्व पौरुष नष्ट झालें. त्याला आपल्या सामर्थ्याचा जो अभिमान होता तोहि पार नाहींसा झाला आणि तो निस्तेज झाला. भगवान् त्याची गदा त्याला परत देऊं लागले; परंतु त्यानें ती गदा परत घेतली नाहीं ॥ १२ ॥ ज्याप्रमाणें एखाद्यानें विद्वान् ब्राह्मणावर जारणमारणादि प्रयोग करावा, त्याप्रमाणें हिरण्याक्षानें वराहरूप धारण केलेल्या भगवंतावर टाकण्याकरितां प्रखर अग्नीप्रमाणें प्रज्वलित असा त्रिशूळ हातांत घेतला ( आणि फेंकला ) ॥ १३ ॥ त्या महाशूर दैत्यानें जोरानें फेंकलेला तो अति तेजस्वी त्रिशूळ, आकाशांत चकाकूं लागला असतां पूर्वी ज्याप्रमाणें गरुडानें टाकून दिलेलें पीस इंद्रानें तोडून टाकलें, त्याप्रमाणें विष्णूनेंहि आपल्या तीक्ष्ण धारेच्या चक्रानें त्या त्रिशूळाचे तुकडे केले ॥ १४ ॥ शत्रूनें आपल्या त्रिशूळाचे अनेक तुकडे केले असें पाहून हिरण्याक्ष फारच रागावला. तो गर्जना करीत भगवंताजवळ आला आणि लक्ष्मीच्या चिन्हानें युक्त अशा त्याच्या विशाळ वक्षःस्थलावर आपल्या दृढ मुष्टीनें प्रहार करून स्वतः अदृश्य झाला ॥ १५ ॥ विदुरा, ज्याप्रमाणें हत्तीला पुष्पमाळेनें ताडिलें असतां, त्यायोगें त्याच्यावर कांहींच परिणाम होत नाहीं, त्याप्रमाणें दैत्यानें दृढ मुष्टिप्रहार केला असतांहि, भगवान् किंचित्सुद्धां जाग्यावरून हालले नाहींत ॥ १६ ॥ नंतर त्या हिरण्याक्षानें योगमायेचा चालक अशा श्रीहरीवर अनेक प्रकारचे मायेचे प्रयोग सुरू केले. तो प्रकार पाहून लोक त्रस्त झाले व जगाचा प्रलयकाळ जवळ आला कीं काय असें त्यांस वाटलें ॥ १७ ॥ त्या वेळीं भयंकर सोसाटयाचे वारे वाहूं लागले व धूळ उडून जिकडेतिकडे अंधार पडला. गोफणींनीं मारल्याप्रमाणेंच जणूं काय दशदिशांतून दगड पडूं लागले ॥ १८ ॥ आकाशांत विजा चमकूं लागल्या आणि मेघांचाहि गडगडाट सुरू झाला. ढगांतून पूं, केंस, रक्त, विष्ठा, मूत्र व हाडें यांची वरचेवर वृष्टि सुरू झाली. मेघपंक्तीनें आकाश आच्छादून गेल्यामुळें नक्षत्रसमुदाय दिसेनासा झाला ॥ १९ ॥ विदुरा, त्या वेळीं जणूं काय पर्वत अनेक शस्त्रांचा वर्षावच करीत आहेत कीं काय असा भास होऊं लागला आणि त्यांतच हातांत त्रिशूळ धारण करून केंस मोकळे सोडलेल्या दिगंबर राक्षसिणी जिकडेतिकडे दिसूं लागल्या ॥ २० ॥ हातांत शस्त्रें घेऊन युद्धास उद्युक्त झालेले अनेक यक्ष, राक्षस, पादचारी, रथ, घोडे व हत्ती यांनीं अतिशय भयंकर व क्रूरपणाचे शब्द उच्चारिले ॥ २१ ॥ तेव्हां तीन वेद हेच ज्याचे पाय आहेत अशा श्रीविष्णूनें आपलें सुदर्शनचक्र घेतलें आणि त्यायोगें प्रगट

झालेल्या आसुरी मायेचा समूळ उच्छेद केला ॥ २२ ॥ त्या वेळीं दितीला आपल्या पतीच्या वचनाचें स्मरण होऊन एकाएकीं हृदयांत कंप भरला आणि स्तनांतून एकसारखा रक्तस्राव होऊं लागला ॥ २३ ॥ आपल्या सर्व माया नष्ट झाल्या असें पाहून हिरण्याक्ष पुनः भगवंताकडे आला आणि भगवंताला वेगानें आवळून धरूं लागला, तोंच भगवान् त्याला बाहेर असलेले दिसूं लागले ॥ २४ ॥ ज्याप्रमाणें इन्द्रानें वृत्रासुराला मारिलें, त्याप्रमाणें भगवंतानें—आपल्या हातानें वज्रासारख्या कठोर मुष्टींनीं प्रहार करणाऱ्या—त्या हिरण्याक्षाच्या एक कानशिलांत मारली ॥ २५ ॥ सर्व जगाला जिंकणाऱ्या अशा भगवन्तानें त्या हिरण्याक्षावर सहज आनंदानें जरी प्रहार केला; तरी त्यामुळें हिरण्याक्षाचें शरीर गरगर फिरूं लागलें, डोळे बाहेर आले आणि हात, पाय व केंस तुटून जाऊन ज्याप्रमाणें वाऱ्यानें प्रचंड वृक्ष मोडून पडावा, त्याप्रमाणें तो खालीं पडला ! ॥ २६ ॥ हिरण्याक्षाचा पराक्रम आजपर्यंत कोठेंहि कुंठित झाला नव्हता. त्याच्या दाढा भयंकर होत्या, मरणापूर्वीं त्या वीरानें आपले ओंठ चावले होते, ते अद्यापि तसेच दिसत होते. अशा स्थितींत पृथ्वीवर मरून पडलेल्या त्या हिरण्याक्षाला पाहून ब्रह्मदेवादि सर्व देव त्याची प्रशंसा करूं लागले. ते आश्चर्यानें म्हणूं लागले कीं असें मरण कोणाला बरें प्राप्त होईल ? ॥ २७ ॥ योगीजन आत्म्यावर, आरोपिलेल्या अशा मिथ्यारूपी लिङ्गशरिरापासून सुटावें, या इच्छेनें समाधियोगाचा आश्रय करून ज्याचें ध्यान करितात, त्या ईश्वराच्या मुखाकडे पाहत पाहत ह्या दुष्ट दैत्यानें, परमेश्वराचा चरणप्रहार होतांच आपल्या शरीराचा त्याग केला ॥२८॥ विदुरा, हिरण्याक्ष व हिरण्यकशिपु हे दोघे विष्णूचेच द्वारपाळ होते; परंतु शाप झाल्यामुळें दैत्ययोनींत ते जन्माला आले. असे कांहीं जन्म घेतल्यावर पुनः ते आपल्या स्थानाला जातील ॥ २९ ॥

देव म्हणाले, ' हे परमेश्वरा, सर्व यज्ञांचा विस्तार तुझे ठिकाणीं आहे. तूं सृष्टीचें पालन करण्यासाठीं शुद्ध सत्त्वगुणात्मक शरीर धारण करितोस. तुला पुनःपुन्हा नमस्कार असो. तूं ह्या त्रैलोक्याला पीडा देणाऱ्या हिरण्याक्षाला ठार केलेंस, ही आनंदाची गोष्ट झाली आणि आम्हीहि तुझ्या चरणांची भक्ति केल्यामुळें सुखी झालों ' ॥ ३० ॥

मैत्रेयऋषि म्हणाले, ' विदुरा, हिरण्याक्षाची शक्ति अपरिमित होती. तरीहि त्याचा विष्णूनें वराहावतार घेऊन याप्रमाणें वध केला. तेव्हां ब्रह्मदेवप्रमुख सर्व देवांनीं त्याची स्तुति केली आणि तो आनंदमय अशा आपल्या वैकुंठलोकाला गेला ॥ ३१ ॥ विदुरा, तूं माझा चांगला मित्र आहेस. हा हिरण्याक्ष महापराक्रमी होता; म्हणूनच परमेश्वरानें वराहअवतार घेऊन याच्याशीं घोर संग्राम केला आणि एखाद्या खेळण्याप्रमाणें त्याला सहज मारून टाकिलें. ही सर्व ईश्वराची लीला मला माझ्या गुरूंनीं ज्याप्रमाणें सांगितली त्याप्रमाणें मीं तुला सांगितली आहे ' ॥ ३२ ॥

सूत म्हणाले,—शौनकऋषे, विदुर मोठा भगवद्भक्त होता. मैत्रेयमुनींनीं सांगितलेली कथा याप्रमाणें ऐकून घेऊन त्यास फार आनंद झाला ॥ ३३ ॥ नल, धर्म इत्यादि दुसऱ्या पुण्यश्लोक महायशस्वी साधूंच्या कथा श्रवण करून जर आनंद होतो, तर मग श्रीवत्स-

लांछन विष्णूच्या कथा ऐकून आनंद होईल हें काय पुनः सांगितलें पाहिजे ? ॥ ३४ ॥ जेव्हां गजेंद्राला मगरानें पकडलें तेव्हां त्याच्या स्त्रिया चीत्कार करून मोठ्यानें आरोळ्या फोडूं लागल्या; पण गजेंद्रानें परमेश्वराच्या चरणकमलाचें ध्यान करतांच भगवंतांनीं येऊन त्वरित त्याला संकटांतून सोडविलें ॥ ३५ ॥ परमेश्वराशिवाय दुसरा कोणीहि ज्यांचा रक्षक नाहीं, अशा सरळ स्वभावाच्या पुरुषांना भगवंताची आराधना करणें फार सुलभ आहे; परंतु दुष्टांना त्याची आराधना करणें फार कठीण आहे. असें हें भगवंताचें चरित्र जाणून कोणता पुरुष भगवंताची आराधना करणार नाहीं बरें ? ॥ ३६ ॥ ऋषि हो, भगवंतांनीं पृथ्वीला रसातळांतून वर काढण्याकरितां वराहअवतार घेऊन हिरण्याक्षाचा वध केला, हें ईश्वराच्या लीलेचें आश्चर्यकारक आख्यान जो मनुष्य श्रवण करतो, वर्णन करतो अथवा वक्त्याला किंवा श्रोत्याला उत्तेजन देतो तो मनुष्य ब्रह्महत्येसारख्या मोठ्या पापापासून देखील सहज मुक्त होतो ॥ ३७ ॥ शौनकमुने, हें हिरण्याक्षवधाचें आख्यान जे ऐकतात त्यांना मोठें स्वर्गादि फल मिळतें, कीर्ति मिळते, आयुष्य व भोग प्राप्त होतात व प्राण आणि इन्द्रियें यांच्या शक्ति वाढतात आणि अंतकाळीं नारायणपदाची प्राप्ति होते ॥ ३८ ॥

## एकोणिसावा अध्याय समाप्त

---

# अध्याय २० वा

शौनकऋषि म्हणाले---सूता[1], स्वायंभुवमनूला राहण्याकरितां पृथ्वी मिळाली, तेव्हां त्यानें अलीकडच्या लोकांच्या उत्पत्तीकरितां कोणते उपाय योजिले ? ( कारण सर्व जग परमेश्वरस्वरूपीं लीन झालेलें होतें ) ॥ १ ॥ सूता, विदुर मोठा भगवद्भक्त होता. त्याचें श्रीकृष्णावर निःसीम प्रेम होतें. त्यामुळें त्यानें आपल्या ज्येष्ठ बंधूचा ( धृतराष्ट्राचा ) आणि त्याच्या पुत्रांचाहि त्याग केला; कारण धृतराष्ट्रानें श्रीकृष्णाचा अनादर केला होता. ( श्रीकृष्णानें धृतराष्ट्राचा व पांडवांचा संधि करण्याकरितां मसलत दिली होती ती धृतराष्ट्रानें ऐकिली नाहीं ) ॥ २ ॥ विदुर व्यासमुनींचा पुत्र होता; परंतु त्याचा महिमा व्यासांपेक्षां कमी योग्यतेचा नव्हता. त्याचें अंतःकरण सर्वस्वीं श्रीकृष्णाकडे लागून गेलेलें असे व त्याचें वर्तनहि पूर्ण श्रीकृष्णभक्तांप्रमाणेंच असे ॥ ३ ॥ विदुराचें सर्व पाप तीर्थयात्रा करून दूर झालें. नंतर तो हरिद्वारांत गेला. तेथें मैत्रेयमुनि बसलेले होते. ते मोठे तत्त्वज्ञानी होते. त्यांच्याजवळ जाऊन विदुरानें कोणते प्रश्न केले ? ॥ ४ ॥ सूता, त्या विदुर-मैत्रेयांच्या संवादांत निश्चयानें पवित्र कथा उत्पन्न झाल्या असाव्यात. जसें गंगेचें पाणी श्रीकृष्णाच्या चरणकमलाचा आश्रय केल्यामुळें पापाला दूर करतें, त्याप्रमाणें विदुर-मैत्रेयांच्या त्या श्रीकृष्णसंबन्धीं कथा पापाला दूर करणाऱ्या आहेत ॥ ५ ॥ सूता, श्रीकृष्णाचीं चरित्रें उत्तम असून वर्णन करण्यासारखीं आहेत. त्या अमृतासारख्या गोड श्रीकृष्णचरित्रांचा रस समजूं लागला म्हणजे कोणता पुरुष अतृप्त होईल बरें ? म्हणून तीं श्रीकृष्णचरित्रें तूं आम्हांला सांग. तुझें कल्याण असो ॥६ ॥ नैमिषारण्यवासी ऋषींनीं याप्रमाणें सूताला प्रश्न केला असतां सूताचें मन परमेश्वराचे ठिकाणीं जडलेलें होतेंच; मग तो त्या ऋषींना म्हणाला, ऋषिहो, ऐका ! ॥७ ॥

सूत म्हणाले---ऋषिहो, श्रीविष्णूने आपल्या मायेच्या योगानें वराहअवतार धारण केला आणि पृथ्वीला रसातलांतून वर काढलें. ही श्रीहरीची लीला व त्यानें सहज केलेला हिरण्याक्षाचा वध, ह्या दोन्ही कथा श्रवण केल्यावर विदुराला फार आनंद झाला आणि तो मैत्रेयमुनीला म्हणाला ॥ ८ ॥

विदुर म्हणाला---ऋषे, मरीचिप्रभृति प्रजापतींचा अधिपति जो ब्रह्मदेव तो सृष्टि-रचनेचा पूर्ण ज्ञानी होता. त्यानें प्रजापतींना उत्पन्न केल्यावर कोणत्या कार्यास आरंभ केला, तें मला सांगा ॥ ९ ॥ ऋषे, मरीचिप्रभृति ब्राह्मण ( प्रजापति ) व स्वायंभुवमनु यांना ब्रह्मदेवानें आज्ञा केली, तेव्हां त्यांनीं हें जग कसें निर्माण केलें ? ॥ १० ॥ मुने, त्या

---

१ सूत हा शब्द जातिवाचक आहे; म्हणून रोमहर्षणाला जसें सूत म्हणत, तसें त्याच्या मुलालाहि सूत म्हणत असत.

प्रजापतीनें सृष्टि करण्याच्या कामीं स्त्रियांचें साहाय्य घेतलें होतें किंवा कर्मामध्यें स्वतंत्रपणें वागत होते? अथवा सर्वांनीं मिळून हें जग निर्माण केलें? ॥ ११ ॥

मैत्रेयऋषि म्हणाले,—विदुरा, ज्याचा तर्क सुद्धां करणें अशक्य आहे, जसें जीवांचें अदृष्ट, प्रकृतीचा चालक, पुरुष व काल या तीन निमित्तांनीं निर्विकार परमेश्वरापासून त्रिगुणात्मक प्रकृतीमध्यें क्षोभ उत्पन्न होतो, तेव्हां तिच्यापासून महत्तत्त्व उत्पन्न होतें ॥ १२ ॥ जीवांच्या अदृष्टानें प्रेरणा केली म्हणजे रजोगुणप्रधान महत्तत्त्वापासून सात्त्विक, राजस व तामस असा तीन प्रकारचा अहंकार उत्पन्न होतो. हाच अहंकार सूक्ष्म पंचभूतांचा आदिकारण होय. याच्यापासूनच पांच सूक्ष्म भूतें, पांच महाभूतें, पांच ज्ञानेन्द्रियें, पांच कर्मेन्द्रियें व त्यांच्या देवता उत्पन्न झाल्या ॥ १३ ॥ भूतें, इन्द्रियें व देवता हीं सर्व जोंपर्यंत पृथक् पृथक् असतात, तोंपर्यंत या प्रत्येकामध्यें सृष्टि करण्याचें सामर्थ्य नसतें; परंतु तीं सर्व दैवयोगानें एकत्र होऊन त्यांनीं भूतांपासून एक सुवर्णमय अण्ड उत्पन्न केलें ॥ १४ ॥ ईश्वरानें प्रवेश करण्यापूर्वीं तें अण्ड समुद्राच्या पाण्यांत पूर्ण हजार वर्षें तसेंच पडलें होतें. नंतर ईश्वरानें त्यांत प्रवेश केला ॥ १५ ॥ त्या ईश्वराच्या नाभीपासून एक कमळ उत्पन्न झालें. हें कमळ हजार सूर्यांप्रमाणें अतिशय तेजस्वी होतें व ह्यांत सर्व जीवसमूह राहात होता. याचेच ठिकाणीं ब्रह्मदेव आपोआप उत्पन्न झाला ॥ १६ ॥ नंतर गर्भोदकांत[1] राहणाऱ्या परमेश्वरानें ब्रह्मदेवाचे ठिकाणीं प्रवेश केला आणि ब्रह्मदेवानें पूर्वकल्याप्रमाणें जगाची रचना पद्धतवार नांवें व रूपें देऊन केली ॥ १७ ॥ ब्रह्मदेवानें प्रथम छायेच्या ( अज्ञानाच्या ) योगानें पांच प्रकारची अविद्या उत्पन्न केली. ते पांच प्रकार तामिस्र[2], अन्धतामिस्र, तम, मोह व महामोह हे होत ॥ १८ ॥ ब्रह्मदेवाला आपली अज्ञानमय सृष्टि पसंत पडली नाहीं. म्हणून त्यानें तिचा नाद सोडला. ह्या सृष्टीपासून रात्रिरूपी शरीर उत्पन्न झालें व त्यापासून यक्ष व राक्षस उत्पन्न झाले आणि त्यांनीं क्षुधा व तृषा उत्पन्न करणाऱ्या अशा त्या रात्रीचा अङ्गीकार केला ॥ १९ ॥ ते यक्ष व राक्षस क्षुधेनें व तृषेनें व्याकुळ होऊन ब्रह्मदेवाला खाण्याकरितां[3] त्याच्या मागून धावूं लागले आणि जेव्हां त्यांचीं आंतडीं तहानेनें व भुकेनें पिळवटून गेलीं तेव्हां त्यांपैकीं कित्येक ह्या ब्रह्मदेवाला जिवन्त सोडूं नका असें म्हणाले व कित्येक याला खाऊन टाका असें म्हणाले ॥ २० ॥ ( हें ऐकल्याबरोबर ) ब्रह्मदेव घाबरून गेला आणि त्या यक्षराक्षसांना म्हणाला कीं,

---

१ अंड्यांत असलेल्या पाण्याला गर्भोदक म्हणतात. ह्या गर्भोदकानेंच आंत असलेल्या गर्भाचें पोषण होतें.

२. स्कं. ३, अ १०, श्लोक १७ मध्यें पञ्चपर्वा अविद्येचे प्रकार सांगितले आहेत व स्कं ३, अ. १२, श्लोक २ मध्यें त्या प्रकारांचें स्पष्टीकरण केलें आहे. ३ हीं भुतें ब्रह्मदेवाला खाण्याकरितां तयार झालीं याचा अर्थ इतकाच कीं, तीं उग्रस्वभावाचीं झालीं. त्यांमध्यें ज्यांनीं ‘ जिवन्त राखूं नका, ’ असें म्हटलें ते राक्षस झाले व ज्यांनीं ‘ खाऊन टाका ’ असें म्हटलें ते यक्ष झाले.

मला खाऊं नका, माझें रक्षण करा ! यक्षराक्षस हो, तुम्ही माझी प्रजा आहां ॥ २१ ॥ पुढें ब्रह्मदेवानें प्रकाशरूप धारण करून आपल्या कान्तीच्या योगानें मुख्यत्वेंकरून देव उत्पन्न केले आणि त्या प्रकाशरूपाचा त्याग केला, त्या प्रकाशाची दिवसरूप एक स्त्री झाली. देवांनीं त्या स्त्रीला खेळवितां खेळवितां आपल्या स्वाधीन करून घेतलें ॥ २२ ॥ नंतर ब्रह्मदेवानें आपल्या कमरेच्या पुढच्या भागापासून दैत्य उत्पन्न केले. ते विषयलंपट होत्साते कामवासनेनें उच्छृंखल झाले आणि आपल्या बापाच्या अंगावर मैथुनाकरितां धावून आले ॥ २३ ॥ तेव्हां ब्रह्मदेवाला हंसूं आलें; पण ते निर्लज्ज दैत्य ब्रह्मदेवाच्या पाठीसच लागले. तेव्हां ब्रह्मदेव संतापून घाबरा झाला व त्वरेनें पळत सुटला ॥ २४ ॥ आणि भगवान् विष्णु शरणागतांचें दुःख दूर करितात व भक्तांवर अनुग्रह करण्याकरितां प्रसंगानुरूप आपलें योग्य स्वरूप प्रगट करतात, असें समजून तो त्या विष्णूकडे आला ॥ २५ ॥ ( आणि त्याला म्हणाला ), परमेश्वरा, माझें रक्षण करा ! तुमच्या आज्ञेनें मी प्रजा उत्पन्न केल्या; परंतु प्रभो, त्या पापी प्रजा बलात्कारानें मैथुन करण्याकरितां माझ्या-मागें धांवून येत आहेत ॥ २६ ॥ परमेश्वरा, दुःखी लोकांचें दुःख दूर करणारा तूंच एक आहेस अशी तुझी प्रसिद्धि आहे व तुझ्या चरणाला जे शरण येत नाहींत त्यांना क्लेश देणाराहि एक तूंच आहेस ॥ २७ ॥ भगवंताला दुसऱ्याच्या मनांतील सर्व विचार समजत होते. त्यांनीं ब्रह्मदेवाची ती दीनावस्था पाहिली आणि सांगितलें कीं, ब्रह्मदेवा, तूं ही काम-विकारानें बिघडलेली आपली तनु सोडून दे. असें सांगितल्याबरोबर ब्रह्मदेवानें आपल्या शरिराचा त्याग केला. ( ह्या प्रकरणांत सर्व ठिकाणीं शरीर सोडलें ह्याचा अर्थ, नाद किंवा अभिमान सोडला असा समजावा ) ॥ २८ ॥ ( ब्रह्मदेवानें टाकलेलें हें शरीर संध्याकाळ होय. कामवासना प्रदीप्त होण्याची हीच वेळ असते. ) दैत्यांना ती संध्याकाळची वेळ एखाद्या सुंदर स्त्रीप्रमाणें भासली व त्या वेळचे गंभीर शब्द, आकाशाची लाली, चाञ्चल्य इत्यादि धर्म पुढीलप्रमाणें तिच्या ठिकाणीं अलंकारासारखे असलेले त्यांस भासले. विदुरा, ह्या स्त्रीनें आपल्या चरणकमळांत घातलेलीं पैंजणें खुळखुळ वाजत आहेत, हिचे डोळे तारुण्यमदानें लाल झाले आहेत, लाल पैठणी नेसलेली असल्यामुळें हिचा कटिप्रदेश झांकलेला असून वर घातलेल्या कमरपट्ट्याची कान्ति तिजवर पडली आहे, हिचे स्तन उंच असून एकमेकांशीं लागलेले असल्यामुळें त्यांमध्यें यत्किंचित्‌हि अंतर दिसत नाहीं, हिची नासिका सुन्दर व दन्तपंक्तिहि सुन्दर आहे, ही हंसत लीलेनें सर्वांकडे पाहत असल्यामुळें हिचें प्रेम स्पष्ट दिसून येत आहे, लज्जेनें ही आपलें शरीर पदरानें झांकून घेत आहे, हिच्या मस्तकावर काळ्या केंसांचा बुचडा आहे, अशी ती संध्या मूर्तिमती स्त्रीच आहे, असें वाटून सर्व दैत्य मोहित झाले ॥ २९ ॥ ३० ॥ ३१ ॥

---

१ यक्षराक्षसांनीं रात्रिरूप स्त्रीचा स्वीकार केला व देवांनीं दिवसप्रभारूपी स्त्री स्वाधीन करून घेतली. याचा भाव इतकाच कीं त्या वेळा त्यांना प्रिय होत्या ( श्रीधर ).

ते आणखीहि आपापसांत बोलूं लागले कीं, काय हो ! हिचें स्वरूप, धैर्य, अभिनव व तारुण्य अगदीं विलक्षण आहे बोवा ! हिला पाहिल्याबरोबर आम्हांला कामविकार उत्पन्न होतो; पण हिच्याठायीं मात्र मुळींच कामविकार दिसून येत नाहीं. ही खुशाल आमच्यामधून फिरत आहे ॥ ३२ ॥ त्या संध्येची आकृति अगदीं हुबेहुब स्त्रीसारखीच दिसत होती. तिच्यासंबंधानें दैत्यांनीं अनेक कल्पना काढल्या. त्यांना तिच्याबद्दल कामवासना उत्पन्न झाली आणि तिला विश्वासानें ते सत्कारपूर्वक विचारूं लागले ॥ ३३ ॥ सुंदरि, तूं कोण आहेस ? किंवा तूं कोणाची आहेस ? येथें तुझें काय प्रयोजन आहे ? सुंदरि, तुझें स्वरूप अमोल आहे, तूं तें विकण्याकरितां मांडलें आहेस खरें; परंतु तें आम्हांला मात्र अर्पण करीत नाहींस, त्यामुळें आम्हांला फार दुःख होत आहे ॥ ३४ ॥ स्त्रिये, तुझी जाति कोणतीहि असो. तुझें दर्शन आम्हांला झालें, ही मोठी आनंदाची गोष्ट होय. तुझा चेंडूचा खेळ पाहून आमच्या मनांतहि चेंडूसारखी गडबड उडाली आहे ॥ ३५ ॥ हे सुंदरि, हा चेंडू खालीं आपटत आहे व तूं त्यावर आपल्या तळहातानें वारंवार प्रहार करीत आहेस. तुझे चरणकमल एका जागेवर मुळींच ठरत नाहींत. तुझी कमर अगोदरच बारीक आहे व तिच्यावर पुष्ट स्तनांचा भार पडून ती दडपून गेली आहे. त्यांत आणखी ती खेळण्यामुळें थकून जात आहे. तुझी स्वच्छ दृष्टि शांतपणानेंच कीं काय आपलें कार्य करीत आहे. तुझा केशकलापहि अत्यंत सुंदर आहे ॥ ३६ ॥ याप्रमाणें सायंकाळची वेळ एखाद्या स्त्रीप्रमाणें दिसत होती व ती आपल्याकडे पाहणाऱ्यांना भुलवीत होती. त्यामुळें दैत्यांची बुद्धि गुंग झाली व त्या सायंसंध्येला स्त्री आहे असें मानून त्यांनीं तिचा स्वीकार केला ॥ ३७ ॥ नंतर ब्रह्मदेवानें शृंगारिक अभिप्रायानें गंभीर हास्य केलें, तेव्हां त्या हास्यापासून आपल्याच स्वरूपसौंदर्यानें गर्विष्ठ अशी कांतिरूप मूर्ति उत्पन्न झाली आणि त्या कांतीच्या योगानें ब्रह्मदेवानें पुष्कळ गंधर्व व अप्सरा उत्पन्न केल्या ॥ ३८ ॥ ब्रह्मदेवानें सौन्दर्ययुक्त व आवडत्या अशा त्या कांतिरूपी शरिराचा त्याग केला. हें शरिरच चंद्रिका होय. नंतर विश्वावसु आदिकरून गंधर्वांनीं व अप्सरांनीं त्या शरिराचा स्वीकार केला ॥ ३९ ॥ नंतर ब्रह्मदेवानें आपल्या आळसाच्या योगानें भूतें व पिशाचें निर्माण केलीं. तीं दिगंबर ( नग्न ) होतीं व त्यांचे केंस मोकळे सुटलेले होते. अशा त्या आपल्या अद्भुत प्रजेला पाहतांच ब्रह्मदेवानें आपले डोळे मिटून घेतले ॥ ४० ॥ विदुरा, नंतर त्या ब्रह्मदेवानें टाकलेलें जांभई नांवाचें शरीर त्याच भूतपिशाचांनीं स्वीकारिलें. ह्याच शरिराला निद्रा असेंहि म्हणतात. ह्या निद्रेच्या योगानें प्राण्यांच्या इन्द्रियांचा शिथिलपणा दिसून येतो आणि त्या शैथिल्यामुळें अपवित्रपणा घडला म्हणजे त्या प्राण्यास जो भ्रान्तियुक्त करतो त्या भूतगणास उन्माद असें म्हणतात. तन्द्रा, जांभई, निद्रा व उन्माद हे चार ह्या निद्रारूपी शरिराचे भेद आहेत. तसेंच भूतें, पिशाचें, उन्माद इत्यादि भूतयोनींतील प्रकार होत ॥ ४१ ॥ नंतर सर्वैश्वर्यसंपन्न व समर्थ अशा ब्रह्मदेवाला मी बलिष्ठ आहें असा अभिमान उत्पन्न झाला आणि त्यानें आपल्या अदृश्य रूपानें साध्यगण व पितृगण उत्पन्न केले ॥ ४२ ॥ त्या साध्यांनीं व

पितरांनीं स्वतःला उत्पन्न करणाऱ्या ब्रह्मदेवाच्या अदृश्य शरिराचा स्वीकार केला. ह्या शरिराला उद्देशून कर्ममार्गी लोक साध्यांना व पितरांना हव्य व कव्य अर्पण करितात ॥४३॥ नंतर ब्रह्मदेवानें आपल्या तिरोधान शक्तीनें सिद्ध व विद्याधर उत्पन्न केले आणि त्यांना अद्भुत असा अन्तर्धान नांवाचा देह अर्पण केला ॥ ४४ ॥ ब्रह्मदेवानें आपलें प्रतिबिम्ब पाहिलें व स्वतःच्या सौंदर्याबद्दल आपणच मान डोलविली[1]. नंतर त्यानें आपल्या प्रतिबिम्बाच्या योगानें किंन्नर व किंपुरुष उत्पन्न केले ॥ ४५ ॥ नंतर ब्रह्मदेवानें आपलें प्रतिबिम्बरूप शरीर सोडून दिलें,तेव्हां किन्नर व किंपुरुषांनीं त्याचा स्वीकार केला व ते एकत्र होऊन उषःकाळीं ब्रह्मदेवाच्या चरित्रांनीं त्याची स्तुति करूं लागले ॥ ४६ ॥ पुढें ब्रह्मदेव आपला विस्तीर्ण देह पसरून काळजींत स्वस्थ पडला असतां, सृष्टि वाढत नाहीं असें पाहून क्रुद्ध झाला; आणि त्यानें आपलें शरीर टाकून दिलें ॥ ४७ ॥ विदुरा, त्या शरिरापासून जे केंस गळून पडले ते अहिनामक सर्पविशेष झाले. तेंच शरीर चळवळ करूं लागलें तेव्हां त्यापासून सर्प व नाग उत्पन्न झाले. हे क्रूर असतात व फणांमुळें ह्यांच्या माना मोठ्या असतात ॥ ४८ ॥ शेवटीं तो ब्रह्मदेव स्वतःला कृतकृत्य झाल्याप्रमाणें मानूं लागला. तेव्हां त्याच्यापासून लोकांचें रक्षण करणारे मनु उत्पन्न झाले ॥ ४९ ॥ जितेन्द्रिय अशा त्या ब्रह्मदेवानें आपलें पुरुषशरीर मनूंना अर्पण केलें, तेव्हां जे देव, पितर व गन्धर्व इत्यादि पूर्वीं उत्पन्न केले होते, ते त्या मनूंना पाहून ब्रह्मदेवाची प्रशंसा करूं लागले ॥ ५० ॥ हे प्रजापते, आपण मनूंना उत्पन्न केलें, हें आपलें काम फार उत्तम झालें आहे; कारण अग्निहोत्रादिक सर्व क्रिया या मनुसृष्टींत चालतात; म्हणून आम्ही तुझ्याबरोबर हविर्भाग भक्षण करूं ॥ ५१ ॥ नंतर ब्रह्मदेव तपश्चर्या, उपासना योग व वैराग्य आणि ऐश्वर्य इत्यादिकांनीं युक्त, तसेंच समाधियोगानेंहि युक्त असा होऊन व आपलीं इंद्रियें वश करून ऋषिस्वरूप झाला आणि त्यानें ऋषिस्वरूप प्रजा उत्पन्न केल्या ॥ ५२ ॥ ऋषिसृष्टि ज्या शरिरापासून झाली, त्या शरिरांत समाधियोग, अणिमादिसिद्धि, तप, ज्ञान व वैराग्य हे भाग होते. त्यांपैकीं एकेक भाग ब्रह्मदेवानें प्रत्येक ऋषीला देऊन टाकिला ॥ ५३ ॥

---

१ सुंदर मनुष्य आपलें प्रतिबिंब आरशांत पाहून जसा संतुष्ट होतो व स्वतःशींच म्हणतो कीं, वाः ठीक आहे, त्याप्रमाणें ब्रह्मदेवानें आपलें प्रतिबिंब पाहून आपली आपणच तारीफ केली. ह्या प्रतिबिंबित शरिरापासून उत्पन्न झालेली प्रजा, किन्नर व किंपुरुष नेहमीं बरोबरीनें फिरतात व एकमेकांची प्रशंसा करीत असतात.

## विसावा अध्याय समाप्त

# अध्याय २१ वा

विदुर म्हणाला—हे मैत्रेया, स्वायंभुवमनूचा वंश जगांत फारच मान्य झालेला आहे. कारण ह्याच वंशांत मैथुनसृष्टि होण्यास प्रथम प्रारंभ झाला. तेव्हां अशा त्या वंशाचा इतिहास मला सांगा ॥ १ ॥ स्वायंभुवमनूला प्रियव्रत व उत्तानपाद असे दोन पुत्र होते. त्यांनीं सप्तद्वीपे[1]वती पृथ्वीचें राज्य धर्मानुसार केलें ॥ २ ॥ हेनिष्पाप मैत्रेयमुने, स्वायंभुवमनूला देवहूति नांवाची प्रख्यात कन्या झाली व त्यानें ती कर्दमप्रजापतीला दिली असें तूं आम्हांला सांगितलें ॥ ३ ॥ मैत्रेयमुने, तो कर्दमऋषि मोठा योगी होता व त्याची पत्नी देवहूतिहि यमनियमादि योगलक्षणांनीं युक्त होती. त्या ऋषीपासून देवहूतीला किती अपत्यें झालीं तें मला सांगा. कारण तें कथानक ऐकण्याची मला इच्छा आहे ॥ ४ ॥ रुचि व दक्षप्रजापति हे दोघे ब्रह्मदेवाचे पुत्र होत. रुचीला मनूची कन्या आकूति व दक्षाला प्रसूति अशा भार्या मिळाल्यानंतर त्यांनीं सृष्टि कोणत्या क्रमानें निर्माण केली तें सांगा ॥ ५ ॥

मैत्रेयमुनि म्हणाले,--विदुरा, ब्रह्मदेवानें कर्दमऋषीला प्रजा उत्पन्न करण्यास सांगितलें, तेव्हां तो सरस्वतीनदीच्या कांठीं गेला आणि तेथें त्यानें दहा हजार वर्षेंपर्यंत तपश्चर्या केली ॥ ६ ॥ कर्दमऋषीला पूर्ण माहीत होतें कीं, परमेश्वर सर्व दुःखें पार नाहींशीं करणारा आहे; आणि त्याला जे शरण येतात, त्यांना तो अभीष्ट वर देत असतो; म्हणून तो समाधियोगानें युक्त होऊन व भक्तिपूर्वक श्रीहरीची पूजा करून त्याला शरण गेला ॥ ७ ॥ विदुरा, त्या वेळीं कृतयुग चालू होतें. त्यामध्यें कमलनेत्र श्रीहरीनें वेदांनीं वर्णन करण्यास योग्य असें आपलें ब्रह्मरूप शरीर धारण केलें आणि कर्दमऋषीला दर्शन दिलें ॥ ८ ॥ त्या वेळीं कर्दमानें पाहिलें तों भगवान् विष्णु गरुडाच्या खांद्यावर बसून कमळाप्रमाणें सुंदर असे आपले पाय ठेवून आकाशांत उभे आहेत असें त्याच्या दृष्टीस पडलें. या वेळीं भगवन्ताचें स्वरूप स्वच्छ शुभ्रवर्णाचें होतें. त्याची कांति सूर्यासारखी होती. त्यानें गळयांत पांढऱ्या कमळांच्या व कमोदांच्या माळा घातलेल्या होत्या. मुखकमळावर तुळतुळीत काळेभोर केंस शोभत होते. अंगावरील वस्त्र अत्यंत स्वच्छ होतें. मस्तकावर किरीट व कानांत कुण्डलें होतीं. तीन हातांत शंख, चक्र व गदा हीं आयुधें धरलीं असून चौथ्या हातांत त्याचें खेळण्याचें पांढरें कमल होतें. त्याचें हास्य व त्याची दृष्टि पाहिल्याबरोबर पाहणाराच्या मनाला आनंद होत असे. आणखी भगवन्ताच्या वक्षःस्थलावर लक्ष्मी व कण्ठांत कौस्तुभरत्न होतें. अशा त्या भगवन्ताला अवलोकन करतांच ॥ ९ ॥ १० ॥ ११ ॥ आपला मनोरथ पूर्ण झाला असें कर्दमाला

---

१ जंबु, प्लक्ष, शाल्मलि, कुश, क्रौंच, शाक व पुष्कर हीं सात द्वीपें होत [ स्कं. ५, अ. २, गद्य ३२ पाहा. ]

वाटून आनंद झाला व त्यानें आपलें मस्तक पृथ्वीवर ठेवून त्यास साष्टांग नमस्कार घातला. प्रीति हा कर्दमाच्या मनाचा स्वतःसिद्ध धर्म होता. त्यानें आपले हात जोडून वाणीनें भगवन्ताची स्तुति करण्यास प्रारम्भ केला ॥ १२ ॥

कर्दमऋषि म्हणाले,—हे परमेश्वरा, तूं स्तुतीस सर्वथा पात्र आहेस. योगी लोक उत्तमोत्तम अनेक जन्म घेऊन योगाभ्यास पूर्ण झाला म्हणजे ज्या तुझ्या दर्शनाची इच्छा करितात, त्या अखिल सत्त्वगुणनिधि अशा तुझें दर्शन मला आज घडल्यामुळें आमच्या नेत्रांचें साफल्य झालें ॥ १३ ॥ ईश्वरा, तुझें चरणकमळ संसारसमुद्र तरून जाण्याची एक नौकाच होय. जे भोग नरकांत देखील प्राप्त होतात, त्या स्त्रीपुत्रादि भोगांकरितां जे त्या तुझ्या चरणकमळाची उपासना करितात, त्यांची बुद्धि तुझ्या मायेनें मोहित झाली आहे, असेंच म्हटलें पाहिजे. हे परमेश्वरा, तूं मात्र त्यांचे तेहि भोग पूर्ण करतोस ॥ १४ ॥ परमेश्वरा, माझी सुद्धां तशाच प्रकारची इच्छा आहे. मला माझ्यासारखी मनमिळाऊ व गृहस्थाश्रमांतील तीन्ही धर्मादि पुरुषार्थ साधून देणारी अशी पत्नी मिळावी, अशी माझी इच्छा आहे. त्याकरितांच मी सर्व इच्छा पूर्ण करणाऱ्या कल्पवृक्षासारख्या तुझ्या चरणाला शरण आलों आहें. कारण सर्वांचें आदिकारण तूं आहेस ॥ १५ ॥ हे परमेश्वरा, ह्या लोकांना कामानें फारच पीडा दिली आहे. तूं प्रजापालक आहेस. ज्याप्रमाणें दावणीनें बैलाला बांधून ठेवावें, त्याप्रमाणें तूं आपल्या वेदरूप वाणीनें सर्वांना बांधून ठेविलें आहेस. परमेश्वरा, शुद्ध वैदिक धर्म व काल हीं तुझीं स्वरूपें आहेत. मीहि ह्या लोकांपैकींच एक असल्यामुळें त्यांचें अनुकरण करीत आपल्याला पूजा अर्पण करितों. ( देव, पितर व मनुष्यें यांच्या ऋणांतून मुक्त होण्याकरितां पत्नी मिळावी अशी माझी इच्छा आहे ) ॥ १६ ॥ हे परमेश्वरा, तुझे भक्त लोकांकडे व लोकांना अनुसरणाऱ्या माझ्यासारख्यांकडे लक्षच देत नाहींत, तर ते केवळ तुझ्या चरणकमळरूपी छत्राचा आश्रय करून राहात असतात व परस्परांशीं तुझ्या अमृतासारख्या सरस कथांची चर्चा करीत असल्यामुळें तहानभूक वगैरे देहधर्म त्यांना अगदीं सोडून देतात व तुझ्या कथा मद्याप्रमाणें मादक असल्यामुळें जे त्याचें सेवन करितात त्यांना संसाराची अगदीं विस्मृति होऊन जाते ॥ १७ ॥ यास्तव तुझ्या कालचक्राची अशा भक्तांवर मुळींच शक्ति चालत नाहीं व तें कालचक्र त्यांच्या आयुष्याचा नाशहि करूं शकत नाहीं. हा काल म्हणजे एक चक्रच आहे. चक्राला आंस, पाकळ्या इत्यादि असतात, त्याप्रमाणें यालाहि आहेत. पाहा ! ! ब्रह्म हें ह्या चक्राचा कणा असून ह्यावर हें फिरत असतें. अधिक महिन्यासुद्धां तेरा महिने हे ह्या कालचक्राच्या पाकळ्या, तीनशें साठ दिवस हीं पेरें व सहा ऋतु ह्या धांवा होत. ह्या चक्राला क्षण, लव इत्यादि दांते किती आहेत याचा अंतच नाहीं. तीन चातुर्मास्य हे ह्या चक्राच्या नाभि ( ज्यांवर पाकळ्या बसविलेल्या असतात ते गोल ) होत. ह्याचा वेग फार भयंकर आहे. सगळ्या जगाला व्यापून हें चक्र धांवत असतें. ( ह्या ठिकाणीं कालचक्र ह्या शब्दानें एक वर्ष विवक्षित आहे, हें वर्णनावरून सहज लक्षांत येईलच. ) ॥ १८ ॥ हे भगवन्, तूं स्वतः एकच आहेस, पण तुला सृष्टि उत्पन्न

करण्याची इच्छा झाली म्हणजे तूं दुसऱ्या एका योगमायेचा स्वस्वरूपी स्वीकार करतोस व जसा भिंतीवर जाळें घालणारा कोळी तंतुरूपी आपल्या शक्तीनें जाळें उत्पन्न करितो, त्यांत कांहीं वेळ खेळतो व कांहीं वेळानें मोडून टाकतो, त्याप्रमाणें तूंही हें जग आपल्या सत्त्वादि शक्तींनीं निर्माण करितोस, त्याचें रक्षण करतोस व पुनः प्रलयही करतोस. ॥ १९ ॥ परमेश्वरा, तूं आपल्या मायेच्या योगानें शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध अशा ह्या पांच सूक्ष्मभूत विषयसुखांचा आमच्यापुढें विस्तार करतोस. म्हणजे तीं आम्हांला देतोस खरा; पण हीं सुखें देणें तुझ्या मनाला खरोखर आवडत नाहीं. तरीहि आमच्यावर अनुग्रह करण्याकरितां हीं विषयसुखें दे म्हणजे आम्ही त्यांच्या सेवनानें तिन्हीं ऋणांतून मुक्त होऊं, कारण मला तुझ्या ज्या स्वरूपाचें दर्शन मिळालें आहे, तें मायेनें परिच्छिन्नासारखें आहे. त्याच्यावर तुलसीची माळा शोभत आहे. अशा प्रकारच्या स्वरूपाचें दर्शन झालें म्हणजे भोग आणि मोक्ष दोन्हीं प्राप्त होतात ॥ २० ॥ परमेश्वरा, तूं आपल्या मायेच्या योगानें ह्या जगाच्या राहाटीला उपयोगी साधनें तयार करीत असतोस. अर्थातच प्राण्यांना उपभोग प्राप्त करून देणारा तसेंच ज्ञानाच्या योगानें प्राण्यांचीं सर्व कर्मफलें नाहींशीं करून त्यांना मुक्ति देणारा तूंच आहेस. सकाम किंवा निष्काम दोन्ही भक्तांना तुझीं चरणकमळें वन्द्य आहेत व स्वल्प आराधना केली असतांहि तूं भक्तांचे मनोरथ पूर्ण करतोस. अशा तुला मी नमस्कार करतों ॥ २१ ॥

मैत्रेयऋषि म्हणाले—विदुरा, कर्दमऋषीनें याप्रमाणें परमेश्वराची निष्कपटपणें स्तुति केली. ह्या वेळीं गरुडाच्या पंखावर बसल्यामुळें भगवन्मूर्ति फारच शोभत होती. तेव्हां प्रेम व हास्य हीं त्याच्या दर्शनावरून स्पष्ट दिसून येत होतीं व त्यामुळें त्यांची भ्रुकुटि चंचल दिसून येत होती. पुढें आपल्या अमृततुल्य वाणीनें भगवान् कर्दमऋषीजवळ बोलूं लागले ॥ २२ ॥

श्रीविष्णु म्हणाले—हे कर्दम ऋषे, तूं ज्या उद्देशानें अनेक मनोनिग्रहाचे नियम धारण करून माझी आराधना केलीस,तो तुझा अंतःकरणांतील अभिप्राय ओळखून त्याची मीं पूर्वींच योजना करून ठेविली आहे ॥२३॥ हे लोकाधिपते, जे लोक एकाग्र चित्त करून माझी आराधना करितात, त्यांची आराधना जर निष्फळ होत नाहीं, तर मग तुझ्यासारख्यांनीं केलेली माझी आराधना निष्फळ कशी बरें होईल ? ॥२४॥ ब्रह्मदेवाचा पुत्र स्वायंभुवमनु म्हणून एक सार्वभौम राजा आहे. तो आपल्या गुणांनीं व सदाचरणानें सर्वत्र प्रसिद्ध आहे. सध्यां ब्रह्म वर्तांत राहून सप्तसमुद्रांकित पृथ्वीचें पालन करीत असतो ॥२५॥ हे कर्दमऋषे, तो राजा धर्मशास्त्रांत प्रवीण असून राजर्षि आहे, तो तुला पाहण्याकरितां आपल्या शतरूपा नांवाच्या पट्टराणीला बरोबर घेऊन परवांच्या दिवशीं येथें येईल ॥ २६ ॥ हे कर्दमा, त्याची कन्या उपवर झाल्यामुळें आपल्याला योग्य पति केव्हां मिळेल अशी वाटच पाहात आहे. तिचे नेत्रकटाक्ष काळेभोर असून वय, स्वभाव व इतर

गुणहि तुझ्याशीं अनुरूप आहेत; म्हणून तो आपली कन्या अनुरूप अशा तुला देईल ॥ २७ ॥ त्या पत्नीवर तुझें मन उत्तम प्रकारें जडेल, व हे कर्दमा, लवकरच ती राजाची कन्या अनेक वर्षेपर्यंत तुझी यथेच्छ सेवा करीत राहील ॥ २८ ॥ तिला तुझ्या वीर्यापासून गर्भधारणा होऊन नऊ अपत्यें होतील. नंतर तुझ्या वीर्यापासून उत्पन्न झालेल्या संततीच्या ठिकाणीं ऋषि अनायासें पुत्र उत्पन्न करतील ॥ २९ ॥ अशा रीतीनें तूं माझ्या आज्ञेप्रमाणें उत्तम प्रकारें वागून केलेल्या सर्व कर्मांचीं फळें मला अर्पण केलींस म्हणजे तुझें अंतःकरण शुद्ध होईल आणि शेवटीं तूं माझ्या स्थानाला प्राप्त होशील ॥ ३० ॥ तूं गृहस्थाश्रमांत प्राण्यांवर दया करशील व पुढें संन्यासी होऊन त्यांना अभयदान देशील. तेव्हां तूं स्वतःला व जगाला माझ्या ठिकाणीं पाहशील, ॥ ३१ ॥ हे मुनिश्रेष्ठा, तुझी पत्नी जो देवहूती तिच्या उदरीं तुझ्या वीर्यासह मी आपल्या अंशरूपानें प्रवेश करून अवतार घेईन व तत्त्वसंहिता ( सांख्यशास्त्र ) निर्माण करीन ॥ ३२ ॥

मैत्रेयऋषि म्हणाले,—विदुरा, सर्व इन्द्रियें अन्तर्मुख करून ध्यान करीत बसलें असतां ज्या प्रभूचें दर्शन होतें, तो भगवान् याप्रमाणें कर्दमऋषीशीं संभाषण करून सरस्वतीनदीनें वेष्टिलेल्या बिन्दुसरोवरापासून जाऊं लागला असतां, ॥ ३३ ॥ तपश्चर्या, मन्त्रसाधन इत्यादि साधनांचें अनुष्ठान करून सिद्ध झालेले योगी लोक ज्याच्या वैकुण्ठ-मार्गाची प्रशंसा करीत असतात, तो भगवान् गरुडावर बसून गरुडाच्या पंखांनीं अभिव्यक्त होणारें साम व त्याला आश्रयभूत असे ऋचांचे समुदाय श्रवण करीत कर्दमऋषीच्या समक्ष निघून गेला ॥ ३४ ॥ शुभ्र कांति असणारे भगवान् विष्णु निघून गेल्यावर कर्दम ऋषि, भगवंतांनीं पूर्वी सांगितलेल्या योग्य वेळेची वाट पाहत तेथेंच स्वस्थ बसला ॥ ३५ ॥ हे धनुर्धरा विदुरा, स्वायंभुव मनु आपल्या पत्नीला सुवर्णालंकारमंडित रथांत बसवून पृथ्वीपर्यटन करीत करीत, भगवंतांनीं जो दिवस पूर्वी सांगितला होता त्या दिवशीं, शांत स्वभावाच्या अशा त्या कर्दमऋषीच्या आश्रमाजवळ आला ॥ ३६ ॥ ३७ ॥ ज्या ह्या आश्रमामध्यें कर्दमऋषि भगवंताला शरण आले, त्या आश्रमामध्यें त्यावर श्रीहरीनें अनुग्रह केला; पण अंतःकरण कृपेनें अतिशय भरून आल्यामुळें त्या श्रीहरीच्या नेत्रांतून जे अश्रुबिंदु गळून पडले, ॥ ३८ ॥ त्या गळून पडलेल्या श्रीहरीच्या अश्रुबिंदूंच्या योगें तेथें एक सरोवर निर्माण झालें. म्हणून त्या सरोवराला बिंदुसरोवर असें नांव प्राप्त झालें. हें पुण्यकारक सरोवर सरस्वती नदीनें वेष्टिलेलें आहे. ह्याचें पाणी आरोग्यदायक असून अमृतासारखें गोड आहे. मोठमोठे ऋषिगण ह्या सरो-वराच्या आश्रयाला येऊन राहत असतात ॥ ३९ ॥ त्या आश्रमांत पवित्र वृक्ष व लतांचे समूह आहेत व पवित्र हरिण आणि पक्षीहि तेथें शब्द करीत असून तो सर्व ऋतूंतील फुलांनीं व पुष्पांनीं भरलेला आश्रम असून वनपंक्तीच्या शोभेनें युक्त होता. ॥ ४० ॥ विदुरा, तेथें उन्मत्त पक्षिगण शब्द करीत असल्यामुळें सारखा नाद चालला होता. तसेंच

भ्रमरादि गुंग होऊन विनोद करीत होते, उन्मत्त मयूररूपी नटांच्या नृत्याची तेथें गडबड उडाली होती व उन्मत्त झालेले कोकिळ त्या ठिकाणीं परस्परांना आव्हान करीत होते ॥४१॥ कदंब, चंपक, अशोक, करंज, बकुल, असाणा, कुंद, मंदार, कुडे ह्या अनेक वृक्षांनीं व आंब्याच्या लहान लहान रोपांनीं त्या वनाला फार शोभा आली होती ॥४२॥ पाणकावळे, प्लव ( पाणकोंबड्यांची एक जात ), हंस, टिटवी, पाणकोंबडे, सारस, चक्रवाक, चकोर हे पक्षी तेथें मधुर मधुर शब्द करीत होते ॥ ४३ ॥ त्याचप्रमाणें हरिण, डुकर, साळी, गवे, हत्ती, गोपुच्छ ( एकप्रकारचीं माकडें ) वानर, माकडें, मुंगुस व कस्तुरीमृग यांनीं तें आश्रमस्थल वेढलेलें होतें ॥ ४४ ॥ विदुरा, स्वायम्भुवमनु हा पृथ्वीवरील पहिला राजा होय. तो आपल्या कन्येला बरोबर घेऊन त्या श्रेष्ठ तीर्थाच्या ठिकाणीं प्राप्त झाला, तोंच त्यानें तेथें अग्नीमध्यें हवन करून बसलेल्या एका मुनीला अवलोकन केलें ॥ ४५ ॥ त्या ऋषीनें पुष्कळ कालपर्यंत आपलें शरीर घोर तपश्चर्येकडे लावलेलें होतें, त्यामुळें तेजानें तें फारच तेजस्वी दिसत होतें. तपश्चर्या करणारा शरीरानें कृश असतो; पण तो ऋषि भगवन्ताच्या प्रेमकटाक्षामुळें व भगवद्वचनरूपी चन्द्रकलेंतील अमृताचें श्रवणद्वारा प्राशन झाल्यामुळें फारसा कृश दिसत नव्हता ॥ ४६ ॥ त्या ऋषीची अंगकाठी उंच होती. त्याचे डोळे कमलपत्रासारखे असून मस्तकावर जटाभार होता व त्यानें वल्कलें परिधान केलीं होतीं. ही सर्व स्थिति स्वायंभुवमनूला दुरून दिसली आणि तो जवळ जाऊन पाहतो तों, त्याला जसें एखादें महामोल रत्न वरचेवर पुसलें नसल्यामुळें मलिन दिसते त्याप्रमाणें तो मळकट झाला आहे असें दिसून आलें ॥ ४७ ॥ नंतर राजा आपल्या पर्णकुटिकेच्या अगदीं जवळ येऊन आपल्यापुढें नमस्कार करीत आहे, असें पाहिल्यावर कर्दमानें त्याचें अभिनंदन केलें व त्याला अनुरूप अशी पूजा करून त्याचा सत्कार केला ॥ ४८ ॥ भगवन्तांनीं सांगितलेली गोष्ट कर्दममुनीच्या ध्यानांत होतीच. राजाहि ऋषीनें केलेली पूजा स्वीकारून स्वस्थ बसला होता, तेव्हां तो संतुष्ट व्हावा म्हणून कर्दमऋषि आपल्या मधुर वाणीनें त्याला बोलूं लागला ॥ ४९॥ राजा, तूं प्रत्यक्ष विष्णूची पालनशक्ति आहेस व तुझें पृथ्वीपर्यटण निश्चयानें दुष्टांच्या वधाकरितां व सत्पुरुषांच्या संरक्षणाकरितां आहे ॥ ५० ॥

राजा, तूं शुक्लस्वरूपी भगवान् विष्णुच आहेस व तूंच जगाच्या संरक्षणाकरितां सूर्य, चन्द्र, अग्नि, वायु, यमधर्म व वरुण हीं स्वरूपें त्या वेळीं स्वीकारीत असतोस, तुला नमस्कार असो ॥ ५१ ॥ राजा, टणत्कार करणारें तुझें धनुष्य फार भयंकर आहे. तुझ्या रथाचा शब्द ऐकल्याबरोबर शत्रु अगदीं घाबरून जातात. तुझ्या सैन्याच्या पायांनीं तुडविलेलें पृथ्वीतल कांपूं लागतें. अशा मोठ्या सेनेला घेऊन जर तूं सूर्यासारखा फिरणार नाहींस ॥ ५२ ॥ ५३ ॥ तर राजा, ज्यांच्या योगानें वर्णव्यवस्था व आश्रमव्यवस्था चालतात, त्या श्रीहरीनें बांधून दिलेल्या सर्व धर्ममर्यादा दुष्ट लोक तत्काळ मोडून नाहींशा

करून टाकतील ॥ ५४ ॥ तूं जर स्वस्थ निजून राहशील, तर विषलंपट लोकांना उपदेश करून वाटेवर आणणारा कोणीच नसल्यामुळें अधर्म फार वाढेल आणि हें जग दुष्टांनीं पीडिलें जाऊन नाश पावेल ॥ ५५ ॥ राजा, तूं शूर आहेस व लोकसंरक्षणाकरितांच तूं फिरत असतोस; तथापि येथें तूं कोणत्या उद्देशानें आला आहेस तें सांग. तुझ्या उत्तराचा आम्ही अगदीं निष्कपट मनानें अङ्गीकार करूं ॥ ५६ ॥

## एकविसावा अध्याय समाप्त

# अध्याय २२ वा

मैत्रेयमुनि म्हणाले,—विदुरा, अशा प्रकारें कर्दममुनीनें, सार्वभौम राजा जो स्वायंभुवमनु, त्याच्या सर्व गुणवैभवाची व चरित्रवैभवाची प्रशंसा केली, तेव्हां तो लाजल्यासारखा झाला; परंतु कर्दममुनि आपलें भाषण संपवून स्वस्थ बसतात तोंच त्या राजानें बोलण्यास प्रारंभ केला ॥ १ ॥

स्वायंभुवमनु म्हणाला,—मुने, ब्रह्मदेव वेदस्वरूप आहे. आपलें शरीररक्षण व्हावें म्हणजेच वेदमार्गाची प्रवृत्ति व्यवस्थित चालावी म्हणून त्यानें आपल्या मुखांतून तुम्हां ब्राह्मणांना उत्पन्न केलें. तुम्ही तप, ज्ञान व योग यांनीं युक्त असून निष्काम आहां ॥ २ ॥ त्या ब्रह्मदेवाला हजारों पाय व हजारों हात आहेत. तुम्हां ब्राह्मणाचें रक्षण करण्यासाठीं म्हणून त्यानें आपल्या हजारों बाहूंपासून आम्हां क्षत्रियांना उत्पन्न केलें. यास्तव ब्राह्मणवर्ण म्हणजे त्याचें हृदय व क्षत्रियवर्ण म्हणजे त्याचें शरीर असें म्हणण्याचा प्रघात पडला आहे ॥ ३ ॥ यास्तव ते ब्राह्मण व क्षत्रिय परस्परांचें रक्षण करितात व त्या दोघांचें रक्षण देव करीत असतो तो देव निर्विकार असून सर्व सृष्टीचें कारण व सृष्टिस्वरूप आहे ॥ ४ ॥ मुने, तुझ्या दर्शनानें माझे सर्व संशय दूर झाले; कारण प्रजापालन करणाऱ्या राजांचे धर्म कोणते हें तूं स्वतःला सांगितलें आहेस ॥५॥ ज्यांचीं इंद्रियें आपल्या ताब्यांत नाहींत, अशा लोकांना तुझें दर्शन होणें फार कठीण आहे. मला आपलें दर्शन झालें हें माझें मोठें भाग्य होय. माझ्या मस्तकाला आपली पवित्र पायधूळ लागली हेंहि माझें सुदैवच म्हणावयाचें ॥६॥ मुने,आपण मला उपदेश करून माझ्यावर मोठा अनुग्रह केला, हें माझें सुदैव होय. तसेंच मी आपल्या उघड्या कर्णरंध्रांनीं तुझें मनोहर भाषण श्रवण केलें, हें माझें मोठें भाग्यच समजलें पाहिजे ॥ ७॥ ऋषे, ह्या कन्येवर माझी प्रीति आहे; त्यामुळें माझें अंतःकरण अतिशय खिन्न झालें असून मी अगदीं दीन झालों आहें. तेव्हां आपण माझी एवढी विज्ञापना ऐकून घ्यावी ॥८॥ ही देवहूति, प्रियव्रत व उत्तानपाद यांची बहीण व माझी कन्या होय. वय, स्वभाव, दया इत्यादि गुणांनीं संपन्न असलेला पति आपल्याला असावा अशी तिची इच्छा आहे ॥ ९ ॥ हिनें नारदमुनीच्या मुखांतून तुझा स्वभाव, दया, रूप, वय इत्यादि गुणांचें वर्णन श्रवण केलें, तेव्हांपासून तर हिचा तुला वरण्याबद्दल निश्चयच झाला आहे ॥ १० ॥ शिवाय तुला देण्याकरितां हिला भक्तिपुरःसर मी येथें घेऊन आलों आहे. गृहस्थाश्रमांतील कर्में करण्याकरितां ही सर्वस्वीं तुला अनुरूप आहे. यास्तव हे ब्राह्मणश्रेष्ठा, तूं हिचा स्वीकार कर ! ॥ ११ ॥ कारण सर्वसंगपरित्यागी मनुष्यालाहि आपोआप प्राप्त झालेल्या उपभोगांचा त्याग करणें योग्य नाहीं, तर मग तुझ्यासारख्या उपभोगांत गढून गेलेल्या मनुष्यानें चालत आलेला उपभोग्य विषयाचा अव्हेर करणें योग्य

नाहीं, हें काय सांगितलें पाहिजे ? ॥१२॥ मुने, जो मनुष्य आपण होऊन प्राप्त झालेल्या विषयांचा अनादर करतो, व पुढें त्याच विषयांकरितां कृपणाजवळ जाऊन याचना करितो, त्याचें चोहोंकडे पसरलेलें यश क्षीण होतें व दुसऱ्यानें केलेल्या अपमानामुळें त्याचा मानभङ्गहि होतो ॥ १३ ॥ कर्दममुने, तुम्ही विद्वान् आहां. विवाह करण्याकरितां उत्सुक झाला आहां, असें मीं ऐकिलें आहे. म्हणून ज्या अर्थी तुम्ही विवाहाची इच्छा करीत आहां, त्या अर्थी मी ही कन्या तुम्हांला दिली आहे, हिचा तुम्ही अङ्गीकार करा ॥१४॥

कर्दमऋषि म्हणाले—राजा, ठीक आहे. माझी विवाह करण्याची इच्छा आहे व तुझी कन्या तूं अजून कोणाला दिली नाहींस तर आमचा दोघांनाहि अनुरूप असा हा विवाहविधि जगांतील पहिलाच विवाहप्रसंग आहे ॥१५॥ राजा, वेदांमध्यें जो विवहाविधि सांगितला आहे, त्याप्रमाणें आपला विवाह व्हावा अशी तुझ्या कन्येची इच्छा आहे. हिच्या अङ्गकांतीपुढें अलंकाराचीहि शोभा तुच्छ आहे, तर मग अशा तुझ्या ह्या सुंदर कन्येचा अव्हेर कोण बरें करील ? ॥१६॥ राजा, ही तुझी कन्या एकदां राजवाड्याच्या गच्चीवर खेळत होती,तेव्हां हिचे पाय नूपुरांच्या रुणझुण शब्दांनीं फारच शोभत होते व हिचे चंचल चेंडू पाहण्याकडे लागले होते.अशा ह्या देवहूतीला विश्वावसु गन्धर्वानें पाहिलें,तेव्हां त्याचें चित्त व्याकुळ झालें आणि मूर्च्छा येऊन तो आपल्या विमानांतून खालीं पडला ॥ १७ ॥ ही कन्या सुन्दर आहे व स्त्रियांनाहि भूषणभूत असून आपण होऊन तुझी प्रार्थना करीत आहे. ज्यांनीं लक्ष्मीच्या चरणाची सेवा केली नाहीं, अशा लोकांना हिचें दर्शन सुद्धां मिळावयाचें नाहीं. त्यांतून ही स्वायंभुवमनूची कन्या व उत्तानपादाची बहीण आहे; मग कोणता पुरुष तिचा अङ्गीकार करणार नाहीं ? ॥ १८ ॥ यास्तव, हे स्वायंभुवमनुराजा, मीं ह्या साध्वीचा अंगीकार करतों; पण माझी एक अट आहे. ती अशी कीं, हिच्या ठिकाणीं गर्भ राहीपर्यंतच मी हिच्याबरोबर गृहस्थाश्रम करीन; परंतु, पुढें शुक्लस्वरूप श्रीहरीनें सांगितलेलें ज्ञानसंपादनाचे मुख्य जे अहिंसा इत्यादि धर्म त्यांचें अनुष्ठान मीं करणार आहें; कारण हाच उत्तम मार्ग असें मला वाटतें ॥ १९ ॥ राजा, ज्या परमेश्वरापासून हें अनेक चमत्कारांनीं भरलेलें विश्व उत्पन्न झालें, ज्याच्या स्वरूपांत हें लय पावणार व जो ह्याचें पालन करतो, तो हा ब्रह्मदेवप्रभृति प्रजापतींचा स्वामी श्रीहरिच मला मान्य आहे ॥२०॥

मैत्रेयमुनि म्हणाले,—हे धनुर्धरा विदुरा, तो कर्दममुनि इतकेंच बोलला आणि आपल्या बुद्धीनें पद्मनाभ श्रीहरीचें ध्यान करीत स्वस्थ बसला. तेव्हां त्याच्या मुखवर हास्याची शोभा आली होती. त्याला पाहून देवहूतीचें मन अगदीं लुब्ध झालें ॥ २१ ॥ कर्दममुनीचें भाषण ऐकून मनूला आनंद झाला आणि आपल्या प्रिय पट्टराणीचा व कन्येचा निश्चय स्पष्टपणें जाणून त्यानें सर्वगुणसंपन्न कर्दममुनीला आपली अनुरूप कन्या अर्पण केली ॥ २२ ॥ त्या वेळीं महाराणी शतरूपा हिनें सुद्धां त्या वधूवरांना संतोषानें आंदण म्हणून महामोल अलंकार, वस्त्रें व संसाराचें सर्व साहित्य अर्पण केलें ॥ २३ ॥ याप्रमाणें अनुरूप अशा वराला कन्या दिल्यानंतर सार्वभौम अशा स्वायंभुवमनूनें आपल्या

कन्येला बाहूंनीं आलिंगन दिलें. तिला योग्य पति मिळाल्यामुळें तो काळजींतून मुक्त झाला खरा; पण तिचा विरह त्याला सहन होईना. उत्कण्ठेनें त्याचें अन्तःकरण व्याकुळ झालें व त्याच्या डोळ्यांतून अश्रुधारा सुरू झाल्या आणि हे मुली ! तान्हे, लाडके पुत्री ! ! असे उद्गार काढीत त्यानें आपल्या नेत्राश्रूंनीं देवहूतीच्या मस्तकावरील केस भिजवून टाकिले ॥ २४ ॥ २५ ॥ मग, राजानें कर्दमऋषीचा निरोप घेतला आणि त्यानें आज्ञा दिल्यावर आपले सेवक व पत्नी यांसह तो रथांत बसून आपल्या नगरीला जाण्यास निघाला ॥ २६ ॥ वाटेंत त्याला सरस्वतीनदी लागली. ती ऋषिसमुदायाला फारच उपयोगी पडणारी असून तिच्या मनोहर अशा दोन्ही तीरांवर शांत वृत्तींच्या ऋषींचे अनेक आश्रम होते. त्या आश्रमांची शोभा पाहत पाहत मनुराजा आपल्या नगराला आला ॥ २७ ॥ त्या वेळीं आपला राजा येत आहे असें समजतांच त्याच्या प्रजाजनांना अतिशय आनंद झाला आणि ब्रह्मावर्त देशाहून निघून त्याची स्तुति गात व वाद्यघोष करीत त्याला सामोरे गेले ॥ २८ ॥ त्या ब्रह्मावर्त देशामध्यें सर्व संपत्तीनें भरलेली बर्हिष्मती * नांवाची राजधानी होती. ह्याच ठिकाणीं पूर्वी यज्ञवराहानें आपलें शरीर थरथर कांपविलें असतां त्याचे केंस खालीं गळले होते ॥ २९ ॥ गळलेल्या केंसांपासून नित्य हिरव्या रंगाचे राहणारे असे दर्भ आणि काश हे उत्पन्न झाले. ह्या दोन्ही जातींच्या दर्भांच्या योगानें यज्ञांत विघ्नें आणणाऱ्या राक्षसादिकांचा पराभव करून यज्ञस्वरूपी श्रीहरीच्या संतोषाकरितां ऋषींनीं यज्ञानुष्ठान केलें होतें ॥ ३० ॥ त्या ठिकाणीं भगवान् मनूनेंहि यज्ञवराहापासून आपल्यासाठीं पृथ्वीरूपी राहाण्याचें स्थान मिळवून यज्ञपुरुषस्वरूपी श्रीहरीच्या संतोषाकरितां कुश आणि काश हे दोन्ही प्रकारचे दर्भ पसरून यज्ञपुरुषाचें पूजन केलें होतें ॥ ३१ ॥

समर्थ असा तो मनुराजा ज्या बर्हिष्मती नांवाच्या पुरीमध्यें राहत होता, त्या नगरींत पुनः आल्यावर त्यानें तापत्रय दूर करणाऱ्या अशा आपल्या मंदिरांत प्रवेश केला आणि त्या ठिकाणीं आपली पत्नी व प्रजा यांसह धर्म आणि अर्थ ह्या पुरुषार्थांना विरोध येणार नाहीं अशा रीतीनें विषयोपभोगाचें सेवन केलें. तेथें गंधर्व आपल्या स्त्रियांसह येऊन त्याच्या पवित्र कीर्तीचें गायन करीत आणि तो स्वतः आपलें चित्त श्रीहरीकडे लावून त्याच्या कथा श्रवण करी ॥ ३२ ॥ ३३ ॥ तो स्वायंभुवमनु भगवंताच्या स्वरूपांतच नित्य रममाण होत असे. योगाभ्यासामुळें त्याला आपल्या इच्छेप्रमाणें वाटेल ते भोग उत्पन्न करण्याचें सामर्थ्य प्राप्त झालेलें असतांहि, सांसारिक विषय त्याचें अंतःकरण भ्रष्ट करूं शकले नाहींत ॥ ३४ ॥ त्यामुळें त्याच्या स्वतःच्या मन्वंतरांतील काल कधींहि निष्फळ गेला नाहीं. तो आपली प्रत्येक वेळ कांहीं तरी सार संपादन करण्यांत घालवीत असे. कधीं तो

* बर्हि म्हणजे दर्भ. वराहाचे केंस गळून त्याचे दर्भ जेथें झाले, त्या ठिकाणीं ती नगरी वसल्यामुळें तिला **बर्हिष्मती** असें नांव पडलें.

भगवंताच्या कथा रचीत असे, तर कधीं त्याच कथा मुखानें बोलत असे व कधीं त्यांचें श्रवण आणि कधीं मनन करीत असे ॥ ३५ ॥ याप्रमाणें जागृत, स्वप्न आणि सुषुप्ति यांवर भगवद्भक्तीच्या योगानें जय मिळवून मनुराजानें चार युगांचे एकाहत्तर फेरे असलेल्या मन्वंतराचा काळ सुखानें घालविला ॥ ३६॥ विदुरा, सगळीं दुःख हरण करणाऱ्या अशा श्रीहरीचा जो आश्रय करतो, त्या पुरुषाला शारीरिक दुःखें, मानसिक दुःखें, तसेंच आकाशांत उत्पन्न होणारे उत्पात, मनुष्यांपासून उत्पन्न होणारे भयादिकप्रसंग आणि पंचमहाभूतांपासून उत्पन्न होणारे क्लेश हे कसे बरें पीडा देऊं शकतील ? ॥३७॥ असो. विदुरा, स्वायंभुवमनु नेहमीं प्राणिमात्रांचें हित करण्यांत दक्ष असे, यास्तव ऋषींनीं विचारिल्यावरून त्यानें सामान्यतः मनुष्यांचे धर्म व त्यांतील वर्णांचे आणि आश्रमांचे शुभकारक असे अनेक विशिष्ट धर्म त्यांना सांगितले ॥ ३८ ॥ विदुरा, पृथ्वीवरील हा पहिला राजा स्वायंभुवमनु फार वर्णनीय होऊन गेला. त्याचें अद्भुत चरित्र मीं तुला येथवर सांगितलें. आतां त्याच्या मुलांच्या उत्कर्षाचा इतिहास सांगतों, तो श्रवण कर ॥ ३९ ॥

## बाविसावा अध्याय समाप्त

---

# अध्याय २३ वा

मैत्रेयमुनि म्हणाले, —विदुरा, पतिव्रता देवहूति पतीचें हृद्गत जाणणारी असल्या-मुळें, आपले माता व पिता आश्रमांतून निघून गेल्यावर ज्याप्रमाणें पार्वती शंकराची शुश्रूषा करिते, त्याप्रमाणें आपल्या पतीची ती प्रेमानें नित्य सेवा करूं लागली ॥ १ ॥ विदुरा, ती कधींहि निष्काळजी न राहतां पतिसेवा करण्यांत दक्ष असे. केवळ भोगेच्छा, कपट, द्वेष, लोभ, निषिद्धाचरण आणि उन्मत्तपणा, यांचा तिनें त्याग केला होता व विश्वास, शारीरिक आणि मानसिक शुद्धता, आदर, इंद्रियनिग्रह, प्रेम व मधुरवाणी यांच्या योगानें आपल्या अतितेजस्वी अशा पतीला ती नित्य संतुष्ट ठेवीत असे ॥ २ ॥ ३ ॥ विदुरा, देव व ऋषि यांमध्यें श्रेष्ठ असलेल्या त्या कर्दममुनीची ती मनुकन्या देवहूति उत्तम प्रकारें सेवा करीत असतां, दैवाला आपल्या सामर्थ्यानें मागें सारणारा जो आपला पति त्यापासून आपल्याला मोठमोठ्या उपभोगांची प्राप्ति होईल,अशी तिची अपेक्षा होती.पुष्कळ काळपर्यंत तिनें आपला देह त्याच्या सेवेनें कृश करून घेतला होता. हें पाहिल्यावर एकदां कर्दमऋषीला दयेनें गहिंवर आला आणि सद्गदित होऊन तो देवहूतीला म्हणाला, ॥ ४ ॥ ५ ॥

कर्दमऋषि म्हणाले, — हे मनुकन्ये, तूं आजवर सन्मानपूर्वक माझी सेवा केलीस. तुझ्या उत्तम सेवेनें व उत्कृष्ट भक्तीनें मी आज संतुष्ट झालों आहें. प्राण्यांना आपलें शरीर अतिशय प्रिय असतें; पण तूं हें आपलें स्तुत्य शरीर माझ्यासाठीं झिजविण्यास मागेंपुढें पाहिलें नाहींस ॥ ६ ॥ हे मनुकन्ये, मी स्वधर्माचरणांत नेहमीं अनुरक्त असतों व आज-पर्यंत मी तपश्चर्या, समाधि व उपासना करून श्रीहरीच्या ठिकाणीं प्रेम संपादन केलें, त्यामुळें श्रीहरीनें प्रसन्न होऊन मला दिव्यभोग प्राप्त करून दिले आहेत. देवहूति, तूं माझी उत्तम-प्रकारें सेवा केलीस म्हणून मी तुला आतां अशी दिव्यदृष्टि देतों कीं, तिच्या योगानें माझे तेच भोग तुला प्राप्त झालेले आहेत, असें तुला दिसेल. ह्या भोगांना भय मुळींच नसून ह्यांच्या सेवनानें परिणामीं शोकहि उत्पन्न होणार नाहीं ॥ ७ ॥ हे देवहूति, महापराक्रमी अशा श्रीहरीच्या भ्रुकुटीच्या वक्रतेमुळें ज्याचीं मनोराज्यें ढांसळून पडणारीं आहेत, असे इतर उपभोग काय उपयोगाचे ? तूं कृतार्थ झाली आहेस. यास्तव तूं आपल्या पाति-व्रत्यानें प्राप्त करून घेतलेल्या या दिव्य भोगांचा उपभोग घे ! हे दिव्य भोग राजेलोकांच्या सर्व संपत्तीच्या दानानेंहि कोणाला मिळण्यासारखे नाहींत ॥ ८ ॥ विदुरा, सर्व योगमाया व त्यांच्या उपासनांचे प्रकार यांत निपुण असलेला तो कर्दममुनि, याप्रमाणें बोलत आहे असें पाहून त्या अबलेची काळजी दूर झाली. ती किंचित् लज्जायुक्त दृष्टीनें आपल्या पतीकडे

पाहूं लागली. मनोहर हास्याच्या योगानें तिच्या मुखाला फारच शोभा आली. विनयानें व प्रेमामुळें तिचा कंठ भरून आला आणि सद्गदित होऊन ती पतीशीं बोलूं लागली ॥ ९ ॥

देवहूति म्हणाली, —हे समर्थ ब्राह्मणश्रेष्ठा ! हे नाथ ! आपली योगमाया अमोल आहे व आपण तिचे अधिपति आहां. आपल्याजवळ हे सर्व उपभोग सिद्ध आहेत हें मी जाणतच आहें व त्यामुळें मला आनंदहि होतो. यास्तव पूर्वी जो आपण संकेत केला होता, त्याप्रमाणें एकवार आपला समागम व्हावा. आपल्यासारख्या परमपतीपासून अपत्य-प्राप्ति होणें ही स्त्रियांना मोठी आनंदाची गोष्ट वाटते ॥ १० ॥ हे नाथ, आपण समर्थ आहां, आपण कामशास्त्राला अनुसरून समागमोत्सवाला उपयुक्त अशीं साधनें निर्माण करावीं. आपण माझ्या ठिकाणीं कामाचा उद्रव केला, त्यामुळें तो मला फार पीडा देत आहे. माझें शरीर रतिसुखाच्या उत्कट इच्छेमुळें अतिशय कृश झालें आहे. तेव्हा अभ्यंग, पान, भोजन इत्यादि सामग्री आपण सिद्ध केली, म्हणजे माझें हें दीन शरीर आपल्याशीं रतिक्रीडा करण्यास समर्थ होईल. यास्तव एखाद्या योग्य मंदिराची योजना करावी ॥ ११ ॥

मैत्रेयमुनि म्हणाले--हे विदुरा, कर्दममुनीनें आपल्या प्रियपत्नीचे मनोरथ-पूर्ण करावे ह्या इच्छेनें आपल्या यौगिक शक्तीचा उपयोग करून त्याच क्षणीं इच्छेप्रमाणें गमन करतां येईल असें एक विमान निर्माण केलें ॥ १२ ॥ तें अलौकिक विमान सर्वमनोरथ पूर्ण करणारें असून सर्व प्रकारच्या रत्नांनीं व संपत्तीनें भरलेलें होतें. इतकेंच नव्हे तर त्यांतील संपत्तीची यथाक्रम वृद्धिहि होत असे आणि त्याला रत्नांचे स्तंभ लाविलेले असल्यामुळें तें फारच सुशोभित दिसत होतें ॥ १३ ॥ त्यांतील सर्व साहित्य देवांना योग्य असें असून कोणत्याहि ऋतूंत तें सुखावह होईल अशी योजना केलेली होती आणि लहानमोठ्या चित्रविचित्र ध्वजापताकांनीं तें भूषित केलेलें होतें ॥ १४ ॥ त्या विमानावर रंगीबेरंगी फुलांच्या माळा लाविलेल्या होत्या व त्या माळांवर बसलेले भ्रमर मधुर गुंजारव करीत होते. त्याच्या वरतीं पैठण्या, पीतांबर इत्यादि रेशमाचीं, तशींच कापसाचीं व लोकरीचीं अनेक वस्त्रें लाविलीं असल्यामुळें त्याला विशेष शोभा आली होती ॥१५॥ त्या विमानांत एकावर एक रचिलेल्या मजल्यांत जागोजाग विश्रांती-साठीं शय्यागृहें तयार केलीं असून त्यांमधील निरनिराळया शय्या, पलंग, पंखे आणि आसनें यांच्या विशिष्ट मांडणीमुळें तें विमान फारच रमणीय दिसत होतें ॥१६॥ त्यांत ठिक-ठिकाणीं नाना प्रकारचे कलाकौशल्याचे पदार्थ मांडिलेले होते व त्यामुळें त्याला मोठी मनो-वेधकता आली होती. एक मोठें थोरलें पाचूच्या मण्यांनीं बांधिलेलें पटांगणहि त्यांत असून जागोजागीं पोंवळयांनीं बांधिलेले ओटे होते ॥ १७ ॥ त्याच्या सर्व दरवाजांचे उंबरठे पोंवळयाच्या शिळांनीं बांधिलेले असून त्यामुळें ते फार तेजस्वी दिसत होते. त्याच्या दाराच्या फळ्या रत्नखचित होत्या व त्यांचीं शिखरें इंद्रनील मण्यांचीं असून त्यांवर सुवर्णाचे कलश ठेविले होते ॥ १८ ॥ त्याच्या भिंती रत्नांच्या असून त्यांवर उंची पद्मरागमण्यांचें नकशी काम केलेलें असल्यामुळें तिकडे पाहणाराला हे ह्या विमानाचे डोळेच आहेत कीं काय,

असा भास होई. त्यामध्यें महामोल चित्रविचित्र रंगाचीं छतें लाविलीं असून सुवर्णाचीं तोरणें ठिकठिकाणीं उभारिलीं होतीं ॥ १९ ॥ त्या विमानावर अनेक स्थळीं बसविलेलीं हंस, पारवे इत्यादि पक्ष्यांचीं चित्रें इतकीं हुबेहुब साधलीं होतीं कीं, त्यांना पाहून खरोखरीच्या हंसांना व पारव्यांना हे आपल्यासारखेच जिवंत पक्षी आहेत असा भास होई व त्यांचे थवेच्या थवे त्या चित्रांजवळ वरच्यावर येत आणि विमानाच्या शिखरांवर बसून शब्द करीत असत ॥ २० ॥ त्या विमानामध्यें कर्दमानें उपभोगासाठीं जशीं पाहिजेत तशीं अनेक स्थलें निर्माण केलीं होतीं. क्रीडेची जागा, शयनस्थळ, उपभोगांचें स्थान, घराच्या बाहेरील चौक, तटाच्या बाहेरील मैदान इत्यादि स्थळें तर इतकीं उत्तम साधलीं होतीं कीं, त्यांना पाहून तीं रचणाऱ्या स्वतः कर्दममुनीला देखील आश्चर्य वाटलें ॥ २१ ॥ कर्दमऋषि सर्व प्राण्यांच्या मनांतील अभिप्राय ओळखणारा होता. आपल्या पत्नीचें मन ह्या विमानाला पाहून जसें प्रसन्न व्हावयास पाहिजे तसें प्रसन्न झालेलें नाहीं, असें त्याला आढळलें. तेव्हां तो देवहूतीला म्हणाला ॥ २२ ॥ हे भित्र्ये, ह्या बिंदुसरोवरामध्यें स्नान करून ह्या विमानांत येऊन बैस. हें शुक्लस्वरूपी श्रीहरीनें निर्मिलेलें बिंदुसरोवरतीर्थ मनुष्यांचे सर्व मनोरथ पूर्ण करणारें आहे ॥ २३ ॥ पतीचें भाषण ऐकून मलिन वस्त्र परिधान केलेली ती कमलनयना देवहूति आपल्या केसांत जटा पडल्या आहेत आणि दाट मळानें अंग भरलेलें असून स्तनांवरहि त्याचे डाग पडले आहेत अशा स्थितींत पवित्र उदकानें युक्त अशा त्या सरस्वतीच्या डोहांत स्नानासाठीं उतरली ॥ २४ ॥ २५ ॥ त्या सरोवरांत तिनें प्रवेश केला असतां आपल्या विमानरूपी मंदिरांत कमलाच्या सुवासानें घमघमणाऱ्या एक सहस्र दासी उभ्या आहेत, असें तिला तेथून दिसलें ॥ २६ ॥ देवहूतीला पाहिल्याबरोबर त्या सर्व स्त्रिया एकदम उठून उभ्या राहिल्या व हात जोडून तिला म्हणाल्या, ‘ आम्ही तुझ्या दासी आहों. आम्ही काय काम करूं, तें आम्हांला सांगा ॥ २७ ॥ असें बोलून त्या दासींनीं मानी अशा देवहूतीला मोठा मान देऊन उंची उंची उटणीं व तेलें वगैरे लावून स्नान घातलें आणि परिधान करण्यासाठीं दोन नवीं रेशमी वस्त्रें अर्पण केलीं ॥ २८ ॥ तसेंच, देवहूतीला आवडणारे असे उत्कृष्ट तेजस्वी उंची अलंकार, षड्रस अन्नें व पिण्यासाठीं अमृतासारखीं रुचिकर पेयें हे त्यांनीं दिलीं ॥ २९ ॥ याप्रमाणें दासींनीं बहुमानपूर्वक मंगलस्नान घातलें असतां, देवहूतीनें आपला निर्मळ देह आरशामध्यें अवलोकन केला. त्या वेळीं तिला मस्तकावरून स्नान घातलेलें असून तिनें गळ्यांत माळा धारण करून निर्मळ वस्त्रें परिधान केलीं होतीं. आपल्या शरिरावर सर्व अलंकार घातले होते आणि गळ्यांत सुवर्णाच्या माळा, हातांत कंकणें आणि पायांत रुणझुण शब्द करणाऱ्या सुवर्णाच्या तोरड्या घातल्या होत्या ॥ ३० ॥ ३१ ॥ तसाच रत्नखचित असा सुवर्णाचा कमरपट्टा तिनें कमरेंत घातला असून तिच्या कंठामध्यें मोठ्या किंमतीचा हार व मंगळसूत्र हीं शोभत होतीं ॥ ३२ ॥ तिचे दांत सुंदर असून, भुवया मनोहर होत्या. तिचे नेत्र कटाक्षांनीं

युक्त असून व कमलाशीं स्पर्धा करणारे होते व काळ्या केसांमुळें तिचें मुख फारच खुलून दिसत होतें ॥३३॥ अशा प्रकारचें आपलें प्रतिबिम्ब आरशांत पाहिल्यावर जेव्हां देवहूतीला आपल्या ऋषिश्रेष्ठ अशा प्रियपतीचें स्मरण झालें, तेव्हां जेथें जेथें तो प्रजापति कर्दमऋषि आहे, तेथें तेथें आपणहि आपल्या दासींसह आहोंच, असें तिला आढळून आलें ॥३४॥ याप्रमाणें एक हजार दासींसहवर्तमान आपण आपल्या पतीच्या पुढें उभ्या आहों, असें तिच्या दृष्टीस पडतांच आपल्या पतीचें तें योगसामर्थ्य पाहून तिला मोठा चमत्कार वाटला ॥ ३५ ॥ हे शत्रुनाशका विदुरा, स्नान करून शरिरावरील मळ घालविल्यामुळें त्या देवहूतीला इतकें तेज आलें होतें कीं, विवाहापूर्वी पितृगृहीं सुखोपभोग भोगून सुखावलेलें जें तिचें रूप होतें, त्याहूनहि अधिक मनोहर व सुंदर असें तें दिसूं लागलें. ती उत्तम वस्त्र नेसली असून चोळीनें तिचे मनोहर स्तन झांकले होते व एक सहस्र विद्याधरस्त्रिया तिची सेवा करीत होत्या. असें तिचें रूप पाहून कर्दममुनीच्या हृदयांत प्रेम उत्पन्न झालें आणि त्यानें तिला त्या विमानांत नेऊन बसविलें ॥३६॥३७॥ मग कर्दममुनि सुद्धां स्वतः त्या विमानांत बसला. आपल्या प्रिय पत्नीविषयीं त्याला अतिशय प्रेम वाटत होतें; तथापि त्यानें आपलें माहात्म्य लुप्त होऊं दिलें नाहीं. त्या विमानांत बसल्यावर विद्याधरस्त्रिया त्याची सेवा करूं लागल्या असतां, तारांनीं वेष्टिलेल्या आकाशस्थ रमणीय चंद्राप्रमाणें फुललेल्या कमलांनींच जणूं काय वेष्टिलेला असा तो मुनिहि शोभूं लागला ॥ ३८ ॥

नंतर त्या विमानाच्या साहाय्यानें तो कर्दममुनि अष्ट दिक्पाळांचे विहार करण्याचे जे कुलपर्वत त्यांतील श्रेष्ठ अशा मेरूच्या गुहांत गेला आणि मदनाचा मित्रच असा जो वायु त्याच्या शीतल व सुगन्धयुक्त प्रवाहानें मनोहर आणि गंगेच्या धबधब्याच्या ध्वनीनें पवित्र झालेल्या त्या स्थळीं सिद्धादि देवगण त्याची स्तुति करीत असतां, कुबेराप्रमाणें त्यानें पुष्कळ काळपर्यंत क्रीडा केली ॥ ३९ ॥ कर्दममुनि स्वभावतः आनंदी असल्यामुळें वैश्रम्भक, सुरसन, नंदन, पुष्पभद्रक आणि चैत्ररथ्य ह्या देवांच्या उद्यानांत तसाच मानससरोवरांतहि त्यानें आपल्या भार्येसहित विहार केला ॥ ४० ॥ अशा रीतीनें अतिशय विस्तीर्ण, तेजस्वी व वाटेल तिकडे नेतां येणाऱ्या त्या विमानांत बसून वायूप्रमाणें त्रैलोक्यांत संचार करीत असतां कर्दममुनीनें नित्य विमानांत बसून फिरणाऱ्या देवांना देखील मागें टाकिलें ॥४१॥ विदुरा, ज्यांनीं सर्व दुःखांचा नाश करणाऱ्या अशा श्रीहरीच्या चरणांचा आश्रय केला, त्या उदात्त अंतःकरणाच्या पुरुषांना दुर्मिळ काय असणार? ॥ ४२ ॥ कर्दममुनि महान् योगी होता. त्यानें या भूमण्डलाचीं द्वीपें, खंडें इत्यादि जेवढी म्हणून रचना आहे, तीमधील सर्व आश्चर्यकारक स्थळें आपल्या पत्नीला दाखविलीं आणि नंतर आपल्या आश्रमाला तो परत फिरला ॥ ४३ ॥ आश्रमांत आल्यावर सुरतक्रीडेसाठीं उत्सुक झालेली मनुकन्या जी देवहूति तिला, कर्दममुनीनें आपल्या शरिराची

नऊ प्रकारानें विभागणी करून रमविलें आणि दोन घटकाच कीं काय अशा रीतीनें अनेक वर्षेपर्यंत तिच्यासह क्रीडा केली ॥ ४४ ॥ त्या विमानांत रतिक्रीडेविषयींची उत्सुकता वाढविणारी उत्तम शय्या घातलेली होती. त्या सुखशय्येवर बसून आपल्या सुंदर पतीशीं समागम करीत असतां किती काळ गेला हेंहि देवहूतीला समजलें नाहीं ॥४५॥ देवहूति व कर्दमऋषि हीं दोघेंहि विषयोपभोग भोगण्यांत फार उत्सुक होतीं. त्यांनीं याप्रमाणें आपल्या योगसामर्थ्यानें विषयोपभोग भोगण्यांत शंभर वर्षांचा काल घालविला, तरी तो त्यांना थोडा-साच वाटला ॥४६॥ आत्मज्ञानी कर्दमऋषीला देवहूतीचे सर्व मनोरथ ठाऊक असून ते पुरविण्यास तो समर्थहि होता. यास्तव त्यानें देवहूति ही आपली अर्धाङ्गी होय, या भावनेनें त्यानें आपल्या रूपाचे नऊ भाग करून तिच्यामध्यें वीर्याची स्थापना केली ॥४७॥ त्यामुळें देवहूतीच्या उदरीं त्याच क्षणीं कन्यारूप संतति जन्मास आली. त्या सर्व कन्यांचे सर्वच अवयव सुंदर होते व त्यांच्या शरिरांना रक्तकमलांप्रमाणें सुगंध येत होता ॥ ४८ ॥ त्या वेळीं ठरल्याप्रमाणें कर्दममुनीनें सर्वसंगपरित्यागाची सिद्धता केली. ती पाहून पतिनिष्ठ व सुंदर अशी ती देवहूति आश्चर्यचकित झाली आणि तिचें अंतःकरण व्याकुळ व खिन्न होऊन गेलें ॥ ४९ ॥ तिच्या डोळ्यांतून अश्रु गळूं लागले; पण तिनें ते आवरून धरिले आणि खालीं मान घालून रत्नासारख्या नखांच्या कांतीनें युक्त अशा आपल्या पायानें पृथ्वीवर रेघा काढीत मधुर शब्दांनीं हळूहळू ती आपल्या पतीशीं बोलूं लागली ॥ ५० ॥

देवहूति म्हणाली,—हे भगवन्, आपण प्रतिज्ञा केल्याप्रमाणें मला सर्व संपादन करून दिलें. तथापि मी आपल्याला शरण आलेली आहें. यास्तव आपण मला अभयदान देणें योग्य आहे ॥ ५१ ॥ हे मुने, आपण ब्रह्मनिष्ठ आहां. आपल्याजवळ माझी इतकीच विनंति आहे कीं, या तुमच्या कन्यांना आतां स्वतःच आपल्याजोगे पति शोधून काढावे लागतील; पण तो विषय सोडला तरी आपण संन्यास घेऊन अरण्यांत गेलां म्हणजे मला फार दुःख होईल. अशा वेळीं मला ज्ञानाचा उपदेश करून माझें तें दुःख दूर करणारा कोणी तरी नको काय ? ५२ ॥ हे नाथ, मीं आजपर्यंत परमेश्वराकडे लक्ष दिलें नाहीं, तर केवळ इंद्रियांना तृप्त करण्यासाठीं विषयोपभोगांतच आसक्त होऊन राहिलें होतें. यास्तव तशा स्थितींत जो काळ गेला, तेवढा पुरे झाला असें मला वाटतें ॥ ५३ ॥ इंद्रियांना संतुष्ट करण्यांतच आसक्त होऊन आपलें खरें स्वरूप न जाणतां अज्ञानावस्थेंत जरी आपली संगति मला घडली आहे, तरी तीपासूनच माझें संसारदुःख दूर होण्याचा मार्ग निघाला पाहिजे ॥ ५४ ॥ जर अज्ञानानें दुर्जनाशीं संगति घडली, तर तिच्यापासून संसारांतील दुःखें भोगावीं लागतात; पण ती संगति अज्ञानानें कां होईना, जर सज्जनाशीं घडली तर तिच्यापासून विषयांवरील आसक्ति सुटून वैराग्य प्राप्त होतें ॥ ५५ ॥ ह्या सृष्टीमध्यें ज्या प्राण्याचें कर्म धर्माच्या उपयोगी पडत नाहीं, वैराग्याचें साधन होत नाहीं,

किंवा श्रीहरीच्या सेवेकडे लागत नाहीं, तो मनुष्य जिवंत असून मेल्यासारखाच होय ! ॥ ५६ ॥ मुने, आपण मोक्ष देण्याला देखील समर्थ आहां, यास्तव आपला समागम घडूनहि जर मला संसारबंधनांतून सुटण्याची इच्छा झाली नाहीं, तर श्रीहरीच्या मायेनें मला पक्केंच फसविलें असें होईल ॥ ५७ ॥

**तेविसावा अध्याय समाप्त**

---

# अध्याय २४ वा

मैत्रेयमुनि म्हणाले,—विदुरा, याप्रमाणें त्या विनयसंपन्न मनुकन्येचें खेदयुक्त भाषण ऐकून त्या दयाळु कर्दममुनीला शुक्लस्वरूपी श्रीहरीनें सांगितलेल्या गोष्टीचें स्मरण झालें आणि तो देवहूतीला म्हणाला ॥ १ ॥

ऋषि म्हणाला, हे राजकन्ये, शुद्धशील अशी तूं असल्यामुळें स्वतःविषयीं अशा रीतीनें खेद बाळगूं नकोस. अविनाशी असा षड्गुणैश्वर्यसंपन्न श्रीहरि तुझ्या उदरीं लवकरच अवतार घेईल ॥ २ ॥ हे मनुकन्ये, तूं पुष्कळ व्रतें आचरण केलीं आहेस. तुझें कल्याण असो. इन्द्रियनिग्रह, स्वधर्म, तपश्चर्या व द्रव्यदान यायोगें तूं भक्तिपूर्वक श्रीहरीची आराधना कर ॥ ३ ॥ अशा रीतीनें तूं आराधना केली असतां तो शुक्लस्वरूपी श्रीहरि, जगांत माझी कीर्ति वाढविण्यासाठीं तुझ्या उदरीं अवतार घेईल व तुला ब्रह्मज्ञानाचा उपदेश करून तुझ्या अन्तःकरणांतील अहंकाररूपी गांठ तोडून टाकील ॥ ४ ॥

मैत्रेयमुनि म्हणाले,—विदुरा, याप्रमाणें कर्दमप्रजापतीनें सांगितलें असतां त्यावर आदरानें पूर्ण विश्वास ठेवून देवहूतीनें निर्विकार आणि जगाला योग्य मार्ग दाखविणारा गुरु जो श्रीहरि त्याची आराधना केली ॥ ५ ॥

त्यानंतर बरेच दिवस लोटले असतां, काष्ठामध्यें जसा अग्नि प्रगट होतो, त्याप्रमाणें भगवान् विष्णूनें कर्दममुनीच्या वीर्याचा आश्रय करून देवहूतीच्या उदरीं अवतार घेतला ॥ ६ ॥ त्या समयीं आकाशांत वाद्यें वाजूं लागलीं, मेघांनीं वृष्टि व गर्जना करण्यास प्रारम्भ केला, गन्धर्व गायन करून ईश्वराची स्तुति करूं लागले आणि अप्सरा आनंदानें नृत्य करूं लागल्या ॥ ७ ॥ देवांनीं उधळलेल्या दिव्य पुष्पांची पृथ्वीवर वृष्टि झाली आणि सर्व दिशा व उदकें स्वच्छ होऊन सर्वांचीं अन्तःकरणेंहि प्रसन्न झालीं ॥८ ॥ तेव्हां ब्रह्मदेव सुद्धां आपल्याबरोबर मरीचिप्रभृति ऋषींना घेऊन सरस्वतीनदीच्या तीरावर असलेल्या त्या कर्दमऋषीच्या आश्रमांत आला ॥ ९ ॥

हे शत्रुनाशका विदुरा, परब्रह्मरूपी श्रीहरीनें लोकांना सांख्यशास्त्राचा उपदेश करण्याकरितां आपल्या सत्त्वगुणरूपी अंशानें देवहूतीच्या उदरीं अवतार घेतला आहे, ही गोष्ट स्वतःसिद्ध ज्ञानी अशा ब्रह्मदेवाला ठाऊक असल्यामुळें, कर्दममुनीच्या मनांत पुढें काय कर्तव्य आहे हें जाणून त्यानें त्याचा आपल्या शुद्ध अन्तःकरणानें गौरव केला आणि मोठ्या प्रफुल्लित अन्तःकरणानें तो देवहूति व कर्दमऋषि यांना म्हणाला ॥ १० ॥ ११ ॥

ब्रह्मदेव म्हणाला,—बा कर्दमा, तूं दुसऱ्याचा गौरव करणारा आहेस आणि ज्या अर्थी माझ्या वचनाला मान देऊन त्याचें तूं उत्तम रीतीनें पालन केलेंस, त्या अर्थी तूं माझी आराधाना निष्कपटपणें केलीस असें मी समजतों ॥ १२ ॥ पुत्रांनीं पित्याची सेवा

करावयाची म्हणजे एवढेंच कीं, त्यानें सांगितलेल्या आज्ञेचा आदरपूर्वक, ठीक आहे, असें म्हणून स्वीकार करावयाचा ॥ १३ ॥ वत्सा कर्दमा, तूं विचारी आहेस. ह्या तुझ्या सुंदर कन्या आपआपल्या वंशानें ह्या सृष्टीची नाना प्रकारें वृद्धि करितील ॥ १४ ॥ यास्तव आतां या आपल्या कन्या मरीचिप्रभृति मोठमोठ्या ऋषींना तूं अर्पण कर. ज्या कन्येचा स्वभाव ज्या ऋषीच्या स्वभावाशीं जुळत असेल व ज्याला जी आवड असेल त्यालाच ती द्यावयाची, असें करून तूं आपल्या कीर्तीचा पृथ्वीवर प्रसार कर ॥ १५ ॥ हे कर्दममुने, पुराणपुरुष विष्णूनें आपल्या मायेच्या योगानें तुझ्या पत्नीच्या उदरीं अवतार घेऊन सर्व प्राण्यांच्या इच्छा पूर्ण करण्यासाठीं कपिल नांवानें देह धारण केलेला आहे ही गोष्ट मी जाणतों ॥ १६ ॥ हे मनुकन्ये देवहूति, कैटभ दैत्याचा वध करणारा आणि भक्तांना अध्यात्मज्ञान आणि आत्मसाक्षात्कार करून देऊन त्यांच्या द्वारा त्यांचीं कर्मवासनारूपी संसाराचीं मुळें उपटून टाकणारा तोच हा श्रीहरि तुझ्या उदरीं प्रविष्ट झाला आहे. ह्याचे केंस सुवर्णासारखे व नेत्र कमलासारखे असून ह्याच्या चरणकमलांवर पद्माचें चिह्न आहे. तो श्रीहरि तुझ्या अंतःकरणांतील अज्ञानरूपी संशयाची गांठ तोडून लोकोद्धारार्थ पृथ्वीवर संचार करील ॥ १७ ॥ १८ ॥ ह्या पुत्रामुळें जगांत तुझी कीर्ति फार वाढेल. तो सिद्धपुरुषांचा अधिपति होईल आणि सांख्यशास्त्रज्ञ पंडितांकडून त्याला फार मान मिळून लोकांत तो कपिल ह्या नांवानें प्रसिद्ध होईल ॥ १९ ॥

मैत्रेयमुनि म्हणाले,– विदुरा, देवहूति व कर्दममुनि ह्यांना याप्रमाणें आश्वासन देऊन सृष्टिकर्ता ब्रह्मदेव नारद व सनत्कुमार यांसह * आपल्या हंसवाहनावर बसून सत्यलोकीं गेला ॥ २० ॥ विदुरा, ब्रह्मदेव निघून गेल्यावर त्याच्या आज्ञेला अनुसरून कर्दममुनीनें त्याच्या सांगण्याप्रमाणें आपल्या कन्या मरीचिप्रभृति प्रजापतींना अर्पण केल्या ॥ २१ ॥ त्यानें आपली कला नांवाची कन्या मरीचिऋषीला दिली, अनसूया अत्रिऋषीला, श्रद्धा अङ्गिराऋषीला व हविर्भू पुलस्त्यऋषीला अर्पण केली ॥ २२ ॥ त्याच्या गति नांवाच्या कन्येचे गुण पुलहऋषीच्या गुणांशीं जमत होते, म्हणून ती त्यानें पुलहाला दिली. गुणसंपन्न अशी क्रिया नांवाची कन्या त्यानें क्रतूला आणि ख्याति भृगूला व अरुन्धती वसिष्ठाला दिली ॥ २३ ॥ तशीच त्यानें शांतिनामक कन्या अथर्वाऋषीला दिली. ह्या शांतीच्या योगानें यज्ञकर्माचा प्रसार होतो. याप्रमाणें कन्यादान होऊन विवाहसंस्कार आटोपल्यावर कर्दममुनीनें त्या महर्षींना व त्यांच्या स्त्रियांना प्रिय वस्तु देऊन संतुष्ट केलें ॥ २४ ॥ विदुरा, याप्रमाणें स्त्रियांची प्राप्ति झाल्यामुळें त्या ऋषींना मोठा आनंद झाला आणि मग कर्दमाला विचारून ते स्त्रियांसह आपआपल्या आश्रमाला निघून गेले ॥ २५ ॥

---

* ब्रह्मदेव कर्दमाच्या आश्रमांत आला त्या वेळीं त्याच्या समागमें मरीचिप्रभृति प्रजापतिहि होते ( वर श्लोक ९ पाहा ). पण सत्यलोकीं परत जातांना त्यानें त्या प्रजापतींच्या विवाहाची योजना करून त्यांना भूतलावर प्रजोत्पत्तीसाठीं ठेविलें आणि नारद व सनत्कुमार इत्यादिक ब्रह्मचाऱ्यांनाच तेवढा तो घेऊन गेला.

इकडे देवश्रेष्ठ अशा श्रीहरीनें आपल्या घरीं अवतार घेतला आहे असें समजल्यावर, कर्दममुनि एकांतांत त्याच्या जवळ गेला आणि त्याला नमस्कार करून म्हणाला ॥ २६ ॥ अहो, ह्या नरकासारख्या संसारांत प्राणी आपआपल्या दुष्कर्मांनीं अतिशय पोळत असतात आणि पुष्कळ काळ लोटल्यावरच त्यांना देवता प्रसन्न होतात ॥ २७ ॥ अनेक जन्म अभ्यास करून भक्तियुगांतील चित्ताची एकाग्रता परिपक्वदशेस आली म्हणजे तिच्या योगानें ज्याच्या चरणांचें दर्शन घेण्याकरितां संन्यासी लोक एकांतस्थानांत प्रयत्न करितात, तोच भक्तकाजकैवारी भगवान् आम्ही केलेल्या अवहेलनांकडे दुर्लक्ष करून आम्हां खेडवळांच्या घरीं आज जन्मास आला आहे ! ॥ २८ ॥ २९ ॥ हे परमेश्वरा, तूं आपल्या भक्तांचा मान वाढविणारा असून त्यांच्यासाठीं सांख्यज्ञानाची रचना करण्याची तुझी इच्छा आहे. याच कारणास्तव ' मी तुझ्या घरीं अवतार घेईन ' असें मला दिलेलें वचन सत्य करण्यासाठीं तूं माझ्या घरीं अवतार घेतलास ॥ ३० ॥ भगवन्, तूं वस्तुतः रूपरहित असतांहि तुझ्या भक्तांना जीं जीं रूपें प्रिय असतात तींच रूपें तुलाहि खरोखर प्रिय होतात ॥ ३१ ॥ प्रकृति, पुरुष आदि तत्त्वांचें ज्ञान करून घेण्याची ज्यांची इच्छा असते, असे विचारी पुरुष तुझ्या पादपीठालाच नित्य वंदन करतात. तुझ्या ठिकाणीं संपत्ति, वैराग्य, कीर्ति, ज्ञान, पराक्रम आणि शोभा हे सहा गुण पूर्ण भरलेले आहेत. परमेश्वरा, अशा तुला मी शरण आलों आहें ॥ ३२ ॥ श्रीहरे, तूं श्रेष्ठ आहेस. सर्व शक्ति तुझ्या स्वाधीन आहेत. प्रकृति, पुरुष, महत्तत्त्व ह्या सर्वांना क्षोभविणारा काल, तसेंच अहंकार, विविध लोक व त्याचे पालक, हे सर्व तूंच आहेस. चिच्छक्तीच्या योगानें तूं सर्व संसाराचा आपल्या ठिकाणीं लय करतोस व आपल्या सर्व शक्तींचें आपल्या इच्छेनें नियंत्रण करितोस. हे कपिलस्वरूपी भगवन्, मीं तुला शरण आलों आहें ॥३३ ॥ तूं माझ्या घरीं अवतरल्यामुळें देव, पितर व मनुष्यें या तीहींच्या ऋणांतून मी मुक्त झालों आहें आणि माझे सर्व मनोरथ पूर्ण झाले आहेत. तूं प्रजांचा पालक आहेस म्हणून मी तुला विनंतिपूर्वक एवढेंच सांगतों. आतां मीं संन्यासमार्ग स्वीकारून दुःखरहित झाल्यामुळें हृदयांत तुझेंच ध्यान करीत पृथ्वीवर फिरणार आहें ॥ ३४ ॥

भगवान् म्हणाले,—कर्दममुने, वैदिक आणि लौकिक अशा भाषणांत माझें वचनच लोकांना प्रमाण आहे. यास्तव पूर्वीं तुला सांगितल्याप्रमाणें माझें वचन खरें करण्यासाठींच तुझ्या घरीं मीं जन्म घेतला आहे ॥ ३५ ॥ प्राण्याला ह्या संसारांत पडण्यास कारण जो लिङ्गदेह त्यापासून सुटण्याची इच्छा करणाऱ्या पुरुषांना आत्मज्ञान होण्यास प्रकृति, पुरुष इत्यादिकांचें ज्ञान असणें अवश्य आहे, म्हणून त्या ज्ञानाचा विस्तार करण्यासाठीं ह्या लोकांमध्यें मीं जन्म घेतला आहे ॥ ३६ ॥ हा आत्मज्ञानाचा सूक्ष्म मार्ग पूर्वीं चालू होता; पण तो बऱ्याच कालापासून नष्ट झाला. तेव्हां त्याचा पुनः प्रसार करण्यासाठीं मीं हा देह धारण केला आहे, असें तूं समज ॥ ३७ ॥ संन्यास घेऊन निघून जाण्यास मी तुला अनुमोदन देतों, तूं खुशाल निघून जा ! मृत्यूला जिंकणें जरी कठीण आहे तरी माझ्या ठिकाणीं सर्व कर्में अर्पण केल्यानें तो तुला सहज जिंकितां येईल;

म्हणून तूं संसार सोडून दे आणि मोक्षप्राप्तीसाठीं माझी भक्ति कर ! ॥ ३८ ॥ स्वयंप्रकाश, आणि सर्व प्राण्यांच्या हृदयांत वास करणारा असा जो मी आत्मा, त्या मला तूं आप त्या स्वरूपांतच अन्तर्मुख होऊन पाहूं लागशील, तेव्हां तुझा सर्व शोक दूर होऊन तूं मोक्षाप्रत प्राप्त होशील ॥ ३९ ॥ आणि मी आपल्या मातेला सर्व कर्मांचा क्षय करणाऱ्या अशा अध्यात्मविद्येचा उपदेश करीन, म्हणजे तीहि ह्या भयावह संसाराला तरून जाईल ! ॥ ४० ॥

मैत्रेय म्हणतात,—याप्रमाणें त्या कपिलमुनीनें केलेलें भाषण ऐकून कर्दमप्रजापतीला आनंद झाला आणि तो त्याला प्रदक्षिणा करून वनांत निघून गेला ॥ ४१ ॥ तेथें त्यानें मौनव्रत स्वीकारून आपल्याला आत्माच एक रक्षक आहे, असा निश्चय केला आणि गृहस्थाश्रमांतील अग्निसेवा करण्याचें व घर करून राहण्याचें सोडून तो सर्वसंगपरित्याग-पूर्वक पृथ्वीवर संचार करूं लागला ॥ ४२ ॥ कार्य व कारण ह्यांहून जें निराळें आहे व ज्याच्यापासून त्रिगुणात्मक सृष्टि प्रकाशमान होते, अशा निर्गुण परब्रह्मस्वरूपाच्या ठिकाणीं कर्दमानें आपलें मन स्थिर केलें; त्याबरोबर त्याला परब्रह्मस्वरूपाचें प्रत्यक्ष ज्ञान झालें ॥ ४३ ॥ तो कर्दमऋषि अहंकार, ममता आणि द्वंद्व ह्यांना सोडून देऊन सर्वत्र समदृष्टि असा झाला. त्यानें आपलें चित्त सर्वथा आत्मस्वरूपीं लाविलें; त्यामुळें त्याची बुद्धि एकाग्र व निश्चल होऊन समुद्राच्या लाटा उसळत नसल्या म्हणजे तो जसा गंभीर दिसतो त्याप्रमाणें तो कर्दममुनिहि अत्यंत शांत वृत्तीचा झाला ॥ ४४ ॥ त्यानें सर्वसाक्षी व सर्वान्तर्यामी अशा भगवान् वासुदेवाच्या ठिकाणीं उत्कट भक्ति ठेविली व त्यामुळें त्याला आत्मसाक्षात्कार होऊन तो सर्व बंधनांपासून मुक्त झाला ॥ ४५ ॥ आणि यच्चयावत् भूत-मात्राच्या ठिकाणीं भगवंताचा वास असून सर्व भूतेंहि भगवंताच्या तशींच आपल्या स्वतःच्या स्वरूपांतहि अभेदानें राहत असतात, असा त्याला प्रत्यय आला ॥४६॥ तेव्हां तो मुनि इच्छा, द्वेष इत्यादि विकारांपासून मुक्त होऊन सर्वत्र समदृष्टीनें पाहूं लागला आणि भगवंताच्या उत्कट भक्तीमुळें त्याला अंतीं विष्णुलोकाची प्राप्ति झाली ॥४७॥

**चोविसावा अध्याय समाप्त**

---

# अध्याय २५ वा

शौनकऋषि म्हणतात,—हे सूता, प्रकृति आदिकरून चोवीस तत्त्वांची गणना करणारा तो सांख्यशास्त्रप्रवर्तक कपिलमुनि जन्मरहित असा परमेश्वरच असून लोकांना आत्मज्ञान करून देण्यासाठींच त्यानें मायेच्या योगानें अवतार घेतला ॥ १ ॥ हा कपिलमुनि सर्व लोकांत श्रेष्ठ आणि सर्व योग्यांमध्यें वरिष्ठ होता. सूता, आम्हीं आजपर्यंत ईश्वराच्या अनेक लीला ऐकिल्या आहेत; तथापि ह्याची कीर्ति ऐकून माझीं इंद्रियें अजूनहि फारशीं तृप्त झालीं नाहींत ॥ २ ॥ हे सूता, भक्तांच्या इच्छेप्रमाणें देहधारण करणारा तो श्रीहरि आपल्या योगमायेच्या योगानें ज्या ज्या लीला करितो, त्या सर्वच वर्णनास योग्य असल्यामुळें मला कथन कर; माझी त्यांच्या ठायीं फारच श्रद्धा आहे. ॥ ३ ॥

सूत म्हणाला,—शौनकमुने, भगवान् मैत्रेयऋषि व्यासांच्या प्रीतींतील होते. विदुरानें केलेला आत्मज्ञानविषयक प्रश्न ऐकून त्यांना फार आनंद झाला आणि विचारलेल्या प्रश्नाप्रमाणें विदुराला ते उत्तर देऊं लागले ॥ ४ ॥

मैत्रेयमुनि म्हणाले,—विदुरा, पिता अरण्यांत निघून गेल्यावर भगवान् कपिलमुनि आपल्या मातेचें समाधान करण्यासाठीं त्या बिंदुसरोवरावरच राहिला ॥ ५ ॥ विदुरा, तो कपिलमुनि तत्त्वज्ञानाचा सिद्धांत प्रतिपादन करणारा असून कर्मशून्य असा तेथें स्वस्थ बसला असतां एकदां देवहूतीला ब्रह्मदेवाच्या भाषणाचें स्मरण झालें आणि ती आपल्या पुत्राला म्हणाली ॥ ६ ॥

हे प्रभो, तूं सर्व जगाला व्यापून राहणारा महासमर्थ आहेस. ह्या इंद्रियांची तृष्णा पुरवितांना मी अगदीं कंटाळून गेल्यें आहें व त्यामुळें या संसाररूपी गाढ अंधकारांत सांपडल्यें आहें ॥ ७ ॥ ह्या संसाररूपी निबिड अंधकारांतून पार जाणें फार कठीण आहे खरें; पण तूंच त्यांतून पार पाडणारी उत्तम दृष्टि असून अनेक जन्मांच्या शेवटीं आज ती मला तुझ्या प्रसादानेंच मिळाली आहे ॥ ८ ॥ जो षड्गुणैश्वर्यसंपन्न ईश्वर सर्व प्राण्यांचें आदिकारण आहे, तोच तूं आहेस. सूर्य आपल्या उदयानें जसा अंधकाराचा नाश करून लोकांना प्रकाश देतो त्याप्रमाणें अज्ञानानेंहि अंध झालेल्या लोकांना भगवान् ज्ञानदृष्टि देतो ॥ ९ ॥ देवा, तूंच ह्या देहादि वस्तूंवर मी व हें माझें असा अभिमान सर्वांना लावून दिला आहेस. तेव्हां त्या अज्ञानाला दूर करण्यास तूंच समर्थ आहेस ॥ १० ॥ कपिला, प्रकृति व पुरुष यांच्या स्वरूपाचें ज्ञान व्हावें या इच्छेनें मी तुला शरण आलें आहें. संसाररूपी वृक्षाला तोडून शरणागतांचें रक्षण करणारा असा तूंच जगामधील सद्धर्म जाणणाऱ्या पुरुषांत श्रेष्ठ आहेस. तुला मी नमस्कार करित्यें ॥ ११ ॥

मैत्रेयमुनि म्हणाले,–विदुरा, आत्मज्ञानी पुरुष ज्याची प्राप्ति करून घेतात, तो हा कपिलच होय. त्यानें याप्रमाणें आपल्या मातेचे निर्दोष असे मनोरथ ऐकून घेतले. ते

मनोरथ पुरुषांची मोक्षाविषयीं प्रीति वाढविणारे असल्यामुळें त्यांचें त्यानें मनःपूर्वक अभिनंदन करून आपल्या हास्ययुक्त मुद्रेनें देवहूतीशीं तो बोलूं लागला ॥ १२ ॥

भगवान् कपिल म्हणाले,—माते, माझ्या मतानें मनुष्यांच्या आत्यंतिक कल्याणाचा उपाय म्हणजे एक परमात्म्याची प्राप्ति करून देणारा भक्तियोगच होय. कारण ह्यामध्यें दुःखाचा तसाच सुखाचाहि सर्वथा अंत होत असतो ॥ १३ ॥ हे निष्पाप माते, पूर्वी जो योग श्रवणेच्छु ऋषींना मीं सांगितला होता, तोच हा सर्वाङ्गपरिपूर्ण असा भक्तियोग तुलाहि आतां मी सांगतों ॥ १४ ॥ ह्या आत्म्याला बंध किंवा मुक्ति प्राप्त होण्याला कारण म्हणजे एक अंतःकरणच होय. * तें विषयांवर आसक्त झालें म्हणजे बंधाला कारण होतें आणि श्रीहरीच्या स्वरूपीं रममाण झालें, तर तेंच मोक्षप्राप्ति करून देतें ॥ १५ ॥ मनुष्याला मी व हें माझें, असा अभिमान उत्पन्न झाला म्हणजे त्याच्या मनांत कामलोभादि षड्रिपु उत्पन्न होतात, पण तेंच मन त्यांचा अभिमान सोडून शुद्ध आणि दुःखरहित व सम झालें म्हणजे ॥ १६ ॥ त्यामध्यें ज्ञान, वैराग्य व भक्ति हीं उत्पन्न होतात. अशा त्या अन्तःकरणाच्या साहाय्यानें पुरुषाला मायेच्या पलीकडे भेदरहित असलेल्या शुद्ध, अद्वितीय, निष्क्रिय, परिणामरहित, सूक्ष्म, उदासीन व स्वयंप्रकाश अशा आत्मस्वरूपाचें प्रत्यक्ष दर्शन होतें आणि त्या वेळीं प्रकृतीचा प्रभाव नष्ट झालेला त्याला दिसतो ॥ १७ ॥ योगाभ्यासी पुरुषांना ब्रह्मप्राप्तीचा उत्तम मार्ग म्हटला म्हणजे जो सर्वान्तर्यामी व षड्गुणैश्वर्यसंपन्न ईश्वर अशा त्या श्रीहरीची भक्ति करणें हाच होय. ह्याच्यासारखा दुसरा अन्य मार्ग नाहीं ॥ १८ ॥ १९ ॥ विषयांवर अत्यंत आसक्ति ठेवणें हेंच आत्म्याचें बळकट बंधन होय, असें विद्वानांचें मत आहे; पण मनुष्यानें तीच आसक्ति जर सत्पुरुषांच्या ठिकाणीं ठेविली तर तीमुळें मोक्षाचें द्वारच उघडल्यासारखें होतें ॥ २० ॥ माते, सत्पुरुष हे सहनशील असून दयाळू असतात, त्यांना शत्रु कोणीच नसतो, ते सर्व प्राण्यांशीं मित्रभावानें वागतात, त्यांची प्रकृति गंभीर असते व सुशीलता हेंच त्यांचें व्रत असतें ॥ २१ ॥ हे माते, सत्पुरुष अनन्यभावनेनें माझी भक्ति करीत असतात व सर्व कर्मे मलाच अर्पण करितात. फार काय सांगावें ? पण माझ्यासाठीं ते आपल्या इष्टमित्रांस व बांधवांसहि सोडून, ॥ २२ ॥ नित्य माझ्या पवित्र कथा स्वतः श्रवण करितात आणि लोकांना सांगतात. त्यांचीं अन्तःकरणें माझ्याकडे लागलेलीं असल्यामुळें निरनिराळ्या तापांची बाधा त्यांना मुळींच होत नाहीं ॥ २३ ॥ हे पतिव्रते, असे ते साधु पुरुष विषयासंबंधाची आसक्ति मुळींच बाळगीत नाहींत. यास्तव त्यांचीच संगति धरण्याची इच्छा तूं कर; कारण विषयासक्तीपासून घडणाऱ्या दोषांचें ते परिमार्जन करणारे आहेत ॥ २४ ॥ साधूंच्या समागमानें मनुष्याला माझ्या कथांचा परिचय घडतो आणि त्यामुळें माझ्या लीलांचें त्याला यथार्थ ज्ञान होतें. असें ज्ञान झालें म्हणजे माझ्या कथा त्यांच्या अन्तःकरणाला व कर्णांना अत्यंत सुखदायक वाटतात आणि त्या कथा सेवन केल्या म्हणजे मोक्षदात्या श्रीहरीच्याविषयीं मनुष्याला लवकरच श्रद्धा, प्रेम व भक्ति हीं

---

* मन एव मनुष्याणां कारणं बंधमोक्षयोः ।

क्रमानें उत्पन्न होतात ॥ २५ ॥ नंतर तो मनुष्य मीं केलेल्या सृष्ट्यादि लीलांचा विचार करूं लागतो व त्यामुळें त्याच्या मनांत माझ्याविषयीं भक्ति उत्पन्न होऊन ह्या लोकांत दिसणाऱ्या उपभोगांचा व स्वर्गादिकांमध्यें असणाऱ्या ऐकीव विषयसुखांचा त्याला तिरस्कार उत्पन्न होतो. अशा रीतीनें वैराग्य उत्पन्न झालें म्हणजे तो आत्मसाधनाला उद्युक्त होऊन योगाभ्यासपूर्वक सरळ योगमार्गांनीं अन्तःकरण एकाग्र करण्याविषयीं यत्न करितो ॥२६ ॥ तात्पर्य, मनुष्यानें मायेच्या गुणांपासून उत्पन्न झालेले भोग भोगण्याचें सोडून दिलें म्हणजे त्याचें वैराग्य वाढून त्याला ज्ञान उत्पन्न होतें आणि त्या ज्ञानानें योगाभ्यासानें व माझ्या ठिकाणीं ठेविलेल्या भक्तीनें त्याला ह्याच देहामध्यें सर्वांच्या अन्तर्यामीं वास करणाऱ्या अशा माझ्या स्वरूपाची प्राप्ति होते ॥ २७ ॥

देवहूति म्हणाली,—कपिला, तुझ्या मोक्षपदाची जेणेंकरून मला प्राप्ति होईल अशी तुझ्यावर ठेवण्याजोगी भक्ति कोणती ? आणि मजसारख्या अबलेला आचरण्यासारखा तिचा विशेष प्रकार कोणता, तें मला सांग ॥ २८ ॥ कपिला, तूं मोक्षरूप आहेस. श्रीहरीची प्राप्ति करून घेण्याचें अचूक साधन म्हणजे योगाभ्यास होय व त्याच्या योगानेंच तत्त्वज्ञान होतें असें तूं पूर्वी सांगितलेंस; पण तो योग कोणत्या प्रकारचा आहे ? व त्याचीं अंगें कोणतीं आहेत ? ॥ २९ ॥ कपिला, मी अबला असून मन्दबुद्धि आहें व हा योगमार्ग मला समजणें फार कठीण आहे; तथापि तूं माझ्यावर कृपा करून तो अशा रीतीनें सांग कीं, मला त्याचा सुखानें बोध होईल ॥ ३० ॥

मैत्रेयमुनि सांगतात,–विदुरा, जिच्या उदरीं आपण अवतार घेतला, त्या आपल्या मातेचा असा अभिप्राय जाणून कपिलमुनीला प्रेमाचें भरतें आलें आणि लोकांमध्यें ज्याला सांख्यशास्त्र म्हणतात, तें चोवीस तत्त्वांचें विवरण करणारें शास्त्र, आणि ईश्वराच्या ठिकाणीं भक्ति दृढ करण्याचा उपाय ह्यांचा त्यानें आपल्या देवहूतीमातेला उपदेश केला ॥ ३१ ॥

भगवान् कपिलमुनि म्हणाले,–प्राण्याला ज्यांच्यामुळें शब्दस्पर्श आदिकरून विषयांचें ज्ञान होतें, त्या इंद्रियांचें मुख्य कर्तव्य वेदांमध्यें सांगितलेल्या कर्मांचें अनुष्ठान करणें हें होय. तीं कर्में करतां करतां मनुष्याचें अन्तःकरण शुद्ध सत्त्वगुणी होऊन सत्त्वगुणात्मक अशा श्रीहरीच्या ठिकाणीं यत्नावांचून इन्द्रियांची निष्काम वृत्ति जडणें ह्यालाच भगवद्भक्ति असें म्हणतात. ही भक्ति अणिमादि सिद्धींपेक्षां अधिक योग्यतेची आहे. कारण जसा जठराग्नि भक्षिलेलें अन्न पचवून नाहीसें करितो त्याप्रमाणें ही भक्ति लिङ्गदेहाचा तत्काळ नाश करित्ये ( आणि लिङ्गदेहाचा नाश म्हणजेच मोक्ष होय ) ॥ ३२ ॥ ३३ ॥ जे भवद्भक्त माझ्या ठिकाणीं आसक्त होऊन माझ्या लीला परस्परांशीं वर्णन करितात व माझ्या सेवेमध्यें निमग्न राहून आपलीं सर्व कर्में मला अर्पण करितात, अशा कित्येक भक्तांना सायुज्यमुक्ति देखील नकोशी वाटते ॥ ३४ ॥ माते, अशा प्रकारच्या माझ्या भक्तांना, प्रसन्नमुख आणि आरक्तनेत्र अशा माझ्या इष्ट वर देणाऱ्या मनोहर

आणि अलौकिक स्वरूपाचें नित्य दर्शन घडतें आणि त्याच्याबरोबर प्रेमळ भाषण करण्याचीहि संधि मिळते ॥ ३५ ॥ माते, माझ्या स्वरूपाचे अवयव मनोहर असून त्यांच्या उत्कृष्ट लीला, हास्य, कटाक्ष व मधुर भाषण ह्या गुणांनीं भक्तांचीं अन्तःकरणें व इन्द्रियें मजकडे लागतात आणि मग त्यांना इच्छा नसतांहि ती भक्ति त्यांना बळेंच माझ्या मोक्षपदावर नेऊन सोडते ॥ ३६ ॥ अज्ञाननिवृत्ति झाल्यावर माझ्या भक्तांना, मायावी अशा मायेनें उत्पन्न केलेलीं माझीं तीं ऐश्वर्यें भोगण्याची इच्छाच होत नाहीं. भक्ति उत्पन्न झाली कीं, तिच्या मागोमाग आपोआप अणिमा, महिमा आदिकरून अष्टसिद्धि पाठीस लागतात; पण त्यांच्या उपभोगाविषयींहि हे निरिच्छ असतात. फार तर काय, विष्णूचीं अत्युत्तम ऐश्वर्यें देखील भोगण्याची त्यांना इच्छा नसते; तथापि श्रेष्ठ अशा माझ्या वैकुण्ठलोकांतील सुखें त्यांना प्राप्त होतातच ॥ ३७ ॥ हे गंभीरस्वरूप माते, ज्यांचा आवडता असा आत्मा, पुत्र, मित्र, गुरु, आप्त, इष्ट व उपास्य देवता हीं सर्व मीच असतों अशा माझ्या भक्तांचा नाश कधींहि होत नाहीं व माझें नित्य चालू असणारें कालचक्रहि त्यांना ग्रासूं शकत नाहीं ॥ ३८ ॥ हा लोक, तसाच परलोक, या दोन्हीं लोकांत फिरणारा लिङ्गदेहविशिष्ट जीव, तसेंच देहासंबंधीं असणारीं जगांतील सर्व ऐश्वर्यें, पशु, गृह इत्यादिकांवरील आणि इतरहि सर्व विषयांवरील आसक्ति सोडून अनन्यभावानें सर्वतोमुख अशा माझेंच जे कोणी भजन करितात, यांना मी या जन्ममरणरूप संसाराच्या पलीकडे नेऊन ठेवितों ॥ ३९ ॥ मी षड्गुणैश्वर्यसंपन्न असून, प्रधान व पुरुष यांचेंहि नियमन करणारा मींच आहे. सर्व प्राण्यांच्या अतरीं मीच वास करितों. अर्थात् माझ्यावांचून दुसऱ्या कोणाकडूनहि प्राण्यांचें जन्ममरणरूपी संसारदुःख निवारण होणें शक्य नाहीं ॥ ४० ॥ ४१ ॥ माते, हा वायु माझ्या भीतीमुळेंच वाहत असतो आणि सूर्य झाला तरी माझ्या भीतीनेंच प्रकाश देतो. इन्द्र वृष्टि करितो, अग्नि जाळण्याचें कार्य करितो व मृत्यु इकडेतिकडे संचार करितो हेंहि सर्व माझ्या भयामुळेंच होय ॥ ४२ ॥ योगी लोक आपल्या कल्याणासाठीं ज्ञान आणि वैराग्य यांनीं युक्त होऊन माझी भक्ति करितात आणि माझ्या चरणांजवळच आश्रय धरून राहतात. कारण माझ्या चरणांजवळ भीतीला मुळींच थारा नाहीं ॥ ४३ ॥ तीव्र भक्तीच्या योगानें माझ्या ठिकाणीं मन स्थिर होणें, हाच ह्या जगामध्यें मनुष्याच्या अंतिम कल्याणाचा उत्कर्ष होय ॥ ४४ ॥

**पंचविसावा अध्याय समाप्त**

---

# अध्याय २६ वा

भगवान् कपिल म्हणतात,—हे माते, आतां तुला प्रकृति आदिकरून तत्त्वांचीं वेगवेगळीं लक्षणें सांगतों. त्यांचें ज्ञान झालें म्हणजे मनुष्य प्रकृतीच्या गुणांपासून मुक्त होतो ॥ १ ॥ माते, आत्मस्वरूपाचें दर्शन करून देणारें आणि अंतःकरणांतील अहंकाररूपी गांठ नष्ट करणारें असें जें हें तत्त्वज्ञान मोक्षाचें कारण आहे असें म्हणतात, तें तुला मी सांगतों ॥ २ ॥ अनादिगुणांपासून अलिप्त आणि प्रकृतीच्याहि पलीकडचा असा जो अंतर्ज्ञानस्वरूपी व स्वयंप्रकाश आत्मा तोच पुरुष होय. त्यानें हें सारें विश्व व्यापिलें आहे ॥ ३ ॥ त्या ह्या विश्वव्यापक पुरुषानें, अव्यक्त व त्रिगुणात्मक अशी जी विष्णूची मायानामक शक्ति, ती सहजगतीनें आपल्याजवळ आली असतां तिचा लीलेनें स्वीकार केला ॥ ४ ॥ ती प्रकृति, सत्त्व रज व तम, ह्या आपल्या तीन गुणांनीं आपल्यासारख्या अनेक प्रकारच्या प्रजा उत्पन्न करिते. तिच्या ठिकाणीं ज्ञानाला आच्छादून टाकणारी शक्ति असल्यामुळें तिचें दर्शन होतांच पुरुषाला तत्काळ आपल्या स्वरूपाचा विसर पडला. याप्रमाणें प्रकृतीचे गुणच वस्तुतः कर्मे करीत असतां त्या प्रकृतीशीं स्वतःचें तादात्म्य आहे असें पुरुषाला वाटूं लागलें व प्रकृतीचें कर्तृत्व तें आपलेंच कर्तृत्व असें तो मानूं लागला ॥ ५ ॥ ६ ॥ तो पुरुष वास्तविक कांहीं करीत नसून प्रकृतीचा खेळ केवळ दुरून पाहात असतो. तो सर्वसमर्थ असा सुखस्वरूपी आत्माच आहे; परंतु प्रकृतीचा खेळ मीच करितों, अशा अभिमानामुळें त्याला संसारप्राप्ति होऊन, कर्मांपासून बंधन व त्यांपासून पारतंत्र्य होत असतें ॥ ७ ॥ शरीर, इंद्रियें व त्यांच्या देवता ह्यांचे धर्म पुरुषाला प्राप्त होण्याचें कारण प्रकृति[१] होय, व सुख आणि दुःख हीं भोगण्याला कारण प्रकृतीहून निराळा असणारा असा पुरुष[२] होय, असें विद्वान् लोक समजतात ॥ ८ ॥

---

१ कारण पुरुष हा निर्विकार असल्यामुळें त्याला कर्तृत्वादि धर्मांचा मुळींच संभव नाहीं. उलट प्रकृतीचा परिणाम जो अहंकार, त्याचे ते धर्म आहेत.

२ कार्यत्व कारणत्व, कर्तृत्व व भोक्तृत्व हे सर्व धर्म वस्तुतः अहंकाराचेच आहेत. तरी कार्यत्व, कारणत्व व कर्तृत्व हे धर्म केवळ जडावरच म्हणजे प्रकृतीचा परिणाम जो अहंकार त्यावरच अनुभवाला येतात. म्हणून त्याचें कारण जड प्रकृति होय व भोग हा धर्मचेतन जीवावर दिसून येतो म्हणून त्याचें कारण पुरुष हें होय, असें सांगितलें आहे. भगवद्गीतेंतमुद्धां ( १३,२० ) " **कार्यकारणकर्तृत्वे हेतुः प्रकृतिरुच्यते ॥ पुरुषः सुखदुःखानां भोक्तृत्वे हेतुरुच्यते** " असेंच दर्शित केलें आहे.

देवहूती म्हणाली,--हे पुरुषोत्तमा, प्रकृतिपुरुषांचीं या विश्वांतील स्थूल व सूक्ष्म अशीं सर्व कार्यें प्रकृतिपुरुषमयच आहेत. त्यामुळें प्रकृति व पुरुष हींच जगाचीं कारणें होत. यास्तव त्यांचें लक्षण काय तें मला सांग ।। ९ ।।

ज्यांमध्यें कोणतेहि विशेष धर्म नाहींत, पण जे विशेष धर्मांचे आधार मात्र आहेत, ज्याच्या ठिकाणीं सत्त्व, रज व तम असे तीन गुण आहेत व जें कोणाचेंहि कार्य नाहीं किंवा इंद्रियांना समजतहि नाहीं, कार्य व कारण हीं ज्याचीं रूपें असून कधींहि नष्ट होत नाहींत, असें जें प्रधान नामक तत्त्व त्यालाच प्रकृति असें म्हणतात ।। १० ।। पांच महाभूतें, पांच तन्मात्रा तसेंच चार अंतःकरणाच्या वृत्ति आणि दहा इंद्रियें मिळून चोवीस तत्त्वांच्या समुदायाला प्रधान किंवा कार्यरूपी ब्रह्म असें म्हणतात ।। ११ ।। पृथ्वी, उदक, तेज, वायु व आकाश ही पांचच महाभूतें होत. त्यांचीं तन्मात्रानामक सूक्ष्म रूपें जीं शब्द स्पर्श, रूप, रस व गंध हीं सुद्धां त्यांच्या संख्येइतकींच म्हणजे पांचच आहेत. असें माझें मत आहे ।। १२ ।। इंद्रियें दहाच होत. कर्ण, त्वचा, दृष्टि, जिव्हा, नासिका, वाणी, हात, पाय, शिश्न हीं नऊ आणि दहावें गुद असें म्हणतात ।। १३ ।। अंतःकरणाचें मन, बुद्धि, अहंकार आणि चित्त असे चार भेद आहेत व संकल्प, निश्चय, अभिमान आणि चिन्ता अशा निरनिराळ्या बोधकवृत्तींवरून ते समजून येतात ।।१४ ।। तत्त्वज्ञानी पुरुषांनीं गणना केलेला सगुण ब्रह्मासंबन्धी तत्त्वांचा असा हा एवढाच समुदाय आहे, असें माझें मत आहे. यानंतर ज्याला काल असें म्हणतात तें पंचविसावें तत्त्व आहे ।।१५।। कित्येक लोक ईश्वराच्या पराक्रमालाच काल असें म्हणतात. ह्या कालापासून प्रकृतिरूप उपाधीमुळें देहावरच ' मी ' असा अभिमान ठेवून मूढ झालेल्या जीवाला भय प्राप्त होत असतें ।। १६ ।। हे मनुकन्ये, प्रकृति म्हणजे तीन गुणांची साम्यावस्था होय. तिच्यामध्यें कोणतेहि विशेष धर्म नसून तिच्यामध्यें ज्याच्यामुळें क्रिया उत्पन्न होतें, त्याला सर्वशक्तिमान् काल असें म्हणतात ।। १७ ।। तोच हा परमेश्वर, आपल्या मायेच्या योगानें प्राण्यांच्या आंत पुरुषरूपानें राहतो आणि बाहेर कालरूपानें राहात असतो ।। १८ ।। जीवांच्या पूर्वकल्पांतील अदृष्टामुळें प्रकृतीच्या सत्त्वादि गुणांत क्षोभ होतो, तेव्हां परमेश्वर स्वतःचें स्थान जी प्रकृति तिच्यामध्यें आपली चैतन्यशक्ति स्थापन करितो आणि मग तिच्यापासून तेजस्वी महत्तत्त्व उत्पन्न होतें. हें महत्तत्त्वच जगाच्या उत्पत्तीला अंकुराप्रमाणें होऊन ह्यापासून जग उत्पन्न होतें; पण ह्याचा नाश किंवा रूपांतर मुळींच होत नाहीं. ह्या महत्तत्त्वामध्यें जें सर्व विश्व सूक्ष्मरूपानें भरलेलें होतें, तें व्यक्त करण्याच्या वेळीं ह्या महत्तत्त्वानें आपल्याला आच्छादन करून टाकणारा जो प्रलयकालचा अंधकार, त्याला आपल्या तेजाच्या योगानें गिळून टाकिलें ।। १९ ।। २० ।। कपिलभगवान् म्हणतात, हे माते, सर्व वेदांमध्यें प्रसिद्ध असलेलें शुद्ध सत्त्वगुणी निर्मल व रागद्वेषादिरहित असें जें परमेश्वराचें वासुदेवनामक स्थान, तेंच हें महत्तत्त्वरूपी चित्त * होय ।। २१ ।।

---

* चित्ताला अधिभूतरूपानें महत्तत्त्व, अध्यात्मरूपानें चित्त व उपास्यरूपानें वासुदेव अशा संज्ञा आहेत.त्याचा अधिष्ठाता क्षेत्रज्ञ होय. हा चतुर्व्यूह उपासनेंतील पहिला व्यूह होय.

जसें उदकाचें स्वरूप पृथ्वीचा संपर्क होण्याच्या पूर्वी मधुर, स्वच्छ व शांत असतें, त्याप्रमाणें चित्ताचेंहि त्याच्या मूळ वृत्तींवरून स्वच्छत्व, निर्विकारित्व व गांभीर्य असें लक्षण केलेलें आहे ॥ २२ ॥ परमेश्वराच्या ज्ञानशक्तीपासून महत्तत्त्व उत्पन्न होतें तें कालशक्तीनें विकार पावूं लागलें, म्हणजे त्यापासून भिन्नभिन्न क्रिया करण्याची शक्ती असलेला तीन प्रकारचा अहंकार उत्पन्न होतो ॥ २३ ॥ ते अहंकाराचे तीन प्रकार म्हणजे सात्त्विक राजस व तामस हे होत. ह्या तीन प्रकारच्या अहंकारांपासून मन, इंद्रियें व महाभूतें उत्पन्न होतात ॥ २४ ॥ हा अहंकार म्हणजेच प्रत्यक्ष सहस्रमुखी अनंत होय असें म्हणतात. भूतें, इन्द्रियें आणि मन हें त्याचें स्वरूप असून तो * संकर्षणनांवाचा पुरुष होय ॥ २५ ॥ देवतारूपानें कर्तृत्व, इन्द्रियांच्या रूपानें ज्ञानसाधनत्व व भूतांच्या रूपानें कार्यत्व हीं किंवा भिन्नभिन्न गुणांप्रमाणें शांत, भयंकर व मूढ हीं त्या अहंकाराचीं लक्षणें सांगितलीं आहेत ॥ २६ ॥ सात्त्विक अहंकार विकार पावला म्हणजे त्यापासून मनोरूपी तत्त्व उत्पन्न होतें व संकल्प आणि विकल्प अशा द्विधा वृत्तींपासून इच्छेचा प्रादुर्भाव होतो ॥ २७ ॥ हें मन सर्व इन्द्रियांचा अधिपति असून ह्याचा वर्ण शरदृतूंतील नील-रंगाच्या कमलाप्रमाणें श्याम आहे. योगीजनांना ह्याची हळूहळू आराधना करितां येते. अनिरुद्ध ÷ या नांवानें त्याची प्रसिद्धि आहे ॥ २८ ॥ हे पतिव्रते, राजस अहंकार विकार पावला म्हणजे त्यापासून बुद्धितत्त्व + उत्पन्न होतें. निरनिराळ्या वृत्तींवरून ह्या तत्त्वाचीं लक्षणें होतात, तीं अशीं :– द्रव्याचें स्वरूप समजण्याचें विशेष ज्ञान असणें. इन्द्रियांना आपापले विषय मिळवून देण्याची कृपा त्यांच्यावर करणें, संशय उत्पन्न होणें, निश्चय करणें, स्मरण देणें व निद्रा आणणें ॥ २९ ॥ ३० ॥ कर्मेन्द्रियें व ज्ञानेन्द्रियें हीं राजस अहंकाराचीं कार्यें होत. कारण, कर्म ही शक्ती प्राणाची आहे व तो प्राण तैजस अहं-काराचें कार्य आहे, म्हणून कर्म करणारीं इन्द्रियें तैजस होत व विज्ञान ही शक्ती बुद्धीची आहे आणि बुद्धि ही तैजस अहंकाराचें कार्य आहे. तेव्हां ज्ञानेन्द्रियें तैजस असलीं पाहिजेत ॥ ३१ ॥ परमेश्वर शक्तीच्या प्रेरणेनें तामस अहंकार विकार पावूं लागला, म्हणजे त्यापासून शब्द हें सूक्ष्मभूत उत्पन्न होतें व त्यापासून आकाश हें महाभूत व शब्दाचा अनुभव देणारें असें कर्णेन्द्रिय उत्पन्न होतें ॥ ३२ ॥ अर्थाचा बोध करणें, आड राहून पाहाणाराचें दर्शक चिन्ह असणें व आकाशाचें सूक्ष्मरूप

* चतुर्व्यूह उपासनेंतील दुसऱ्या व्यूहांत ह्याला, अधिभूतरूपानें, भूतें, इन्द्रियें व मन ह्यांचा समुदाय ही संज्ञा, व अध्यात्मरूपानें अहंकार ही संज्ञा असून त्याची उपास्य-देवता संकर्षण व अधिष्ठाता रुद्र होय.

÷ चतुर्व्यूह उपासनेंतील तिसऱ्या व्यूहांत अधिभूतरूपानें व अध्यात्मरूपानें ह्या मनाची संज्ञा मनच आहे; परंतु उपास्यदेवता अनिरुद्ध व अधिष्ठाता चन्द्र आहे.

+ चतुर्व्यूह उपासनेंतील चौथ्या व्यूहांत या तत्त्वाला अधिभूत व अध्यात्म-रूपानें बुद्धि, ही संज्ञा असून त्याची उपास्यदेवता प्रद्युम्न व अधिष्ठाता ब्रह्मा होय.

असणें हीं शब्दाचीं लक्षणें होत, असें विद्वान् लोक समजतात ॥ ३३ ॥ प्राण्यांना हालचालीसाठीं वाव देणें, बाहेरचे तसेच आंतील व्यवहार करण्यास साहाय्य करणें, प्राण, इन्द्रियें व मन ह्यांचा आश्रय असणें, हीं आकाशाचीं कार्यें असून तींच त्याचींहि लक्षणें होत ॥ ३४ ॥ शब्द हा आकाशाचा विशेष गुण होय. तें आकाश कालाच्या गतीनें विकार पावूं लागलें म्हणजे त्यापासून स्पर्श हें सूक्ष्म भूत उत्पन्न होतें व त्या स्पर्शापासून वायु हें महाभूत उत्पन्न होतें. त्या स्पर्शाचा अनुभव घेणारें इन्द्रिय त्वचा होय ॥ ३५ ॥ मऊपणा, कठिणपणा, थंडपणा, तशीच उष्णता आणि वायूचें सूक्ष्मरूप असणें, हीं स्पर्शाचीं लक्षणें होत ॥ ३६ ॥ झाडें आदिकरून वस्तूंना हालविणें, तृण इत्यादि वस्तूंना एकत्र जमविणें, द्रव्यांचा संयोग करणें, ( सुगंधी पदार्थ नाकाशीं नेणें, शीत व उष्ण पदार्थांचा त्वचेशीं संयोग करणें इत्यादि ), शब्दाला कानाशीं नेणें, इन्द्रियांना आपआपल्या कामांत तत्पर राखणें, हीं वायूचीं कार्यरूप लक्षणें होत ॥ ३७ ॥ स्पर्श हा वायूचा विशेष गुण होय. तो वायु दैवाच्या प्रेरणेनें विकार पावला म्हणजे त्यापासून रूप नांवाचें सूक्ष्मभूत उत्पन्न होतें व त्या रूपापासून तेज आणि रूपाला ग्रहण करणारे चक्षुरिन्द्रियादि हीं उत्पन्न होतात ॥ ३८ ॥ हे पतिव्रते, द्रव्यांना आकार प्राप्त करून देणें, द्रव्यांच्या आधारानें प्रतीतीला येणें, द्रव्यांच्या रचनेप्रमाणें स्वतःची रचना करणें आणि तेजाचा विशेष गुण होऊन राहाणें, हीं रूपनामक सूक्ष्म भूतांचीं लक्षणें होत ॥ ३९ ॥ प्रकाश करणें, पचन करणें, सुकविणें, थंडी नाहींशी करणें, क्षुधा व तृष्णा उत्पन्न करून त्यांच्या निवृत्तीकरितां खाणें व पिणें हीं तेजाचीं कार्यें व तींच लक्षणें होत ॥ ४० ॥ रूप हा तेजाचा विशेष गुण होय. तें तेज दैवाच्या प्रेरणेनें विकार पावलें म्हणजे त्यापासून रस हें सूक्ष्मभूत उत्पन्न होतें व त्या रसापासून उदक व रसाला ग्रहण करणारें जिव्हानामक इन्द्रिय उत्पन्न होतें ॥ ४१ ॥ रस हा मूळचा एकच आहे व तो मधुरच आहे; परंतु त्याचे पृथिव्यादि द्रव्यांच्या विकारामुळें तुरट, कडु, तिखट, आंबट व खारट, असे अनेक भेद होतात ॥ ४२ ॥ भिजविणें, गोळा करणें, तृप्ति करणें, जिवंत ठेवणें, तहान भागविणें, मऊ करणें, ताप दूर करणें व कूपादिकांतील पाणी उपसून काढलें तरी त्यांत तें पुनः जमविणें, हीं पाण्याचीं कार्यें व हींच लक्षणें होत ॥ ४३ ॥ रस हा पाण्याचा विशेष गुण आहे. तें पाणी दैवाच्या प्रेरणेनें जेव्हां विकार पावलें, तेव्हां त्यापासून गन्ध हें सूक्ष्म भूत उत्पन्न झालें व त्या गन्धापासून पृथ्वी व गंधाला ग्रहण करणारें घ्राणेंद्रिय हीं उत्पन्न झालीं ॥ ४४ ॥ गंध मूळचा एकच आहे; परंतु इतर द्रव्याचे अवयव त्यांत मिसळून त्याचे मिश्र ( तिखट, मीठ, मसाला, हिंगाची फोडणी वगैरे देऊन भाजीचा वास येतो तसा ), दुर्गन्ध, मधुर, सुरभि असे अनेक भेद होतात ॥ ४५ ॥ ब्रह्मादि मूर्ति इत्यादिकांनीं आकार प्राप्त करून देणें, आश्रयावांचून स्थिर राहाणें, उदक इत्यादिकांना धारण करणें, आकाशादि तत्त्वांचा भेद करून देणें व निरनिराळ्या प्राण्यांना व त्यांच्या स्त्रीत्व, पुरुषत्व इत्यादि गुणांना व्यक्त करून देणें, हीं पृथ्वीचीं कार्यें होत व हीं कार्येंच तिचीं लक्षणें

होत ॥४६॥ आकाशाचा विशेष गुण जो शब्द तो ज्याचा विषय आहे, त्याला कर्णेन्द्रियें म्हणतात. वायूचा विशेष गुण जो स्पर्श तो ज्याला आहे, त्या इन्द्रियाला त्वचा असें म्हणतात ॥ ४७ ॥ तेजाचा विशेष गुण जें रूप तें ज्याचा विषय आहे, त्या इंद्रियाला चक्षु म्हणतात. पाण्याचा विशेष गुण जो रस, तो ज्याचा विषय आहे, त्या इंद्रियाला जिव्हा समजतात. पृथ्वीचा विशेष गुण जो गंध, तो ज्याचा विषय आहे, त्या इंद्रियाला नासिका किंवा घ्राणेंद्रिय म्हणतात ॥ ४८ ॥

ज्या अर्थी कारणाचा कार्यामध्यें संबन्ध असल्यामुळें त्या कारणाचे गुण कार्यामध्यें दिसून येतात, त्या अर्थी आकाश आदिकरून सर्व शब्दस्पर्शादि तत्त्वांचे विशेष गुण पृथ्वीमध्येंच दिसून येतात * ॥ ४९ ॥ ज्या वेळीं महत्तत्त्व आदिकरून सात तत्त्वें एकमेकांत न मिसळतां निरनिराळीं राहिलेलीं असतात, त्या वेळीं ( त्यांच्यापासून सृष्टि होणार नाहीं म्हणून ) तत्त्वांना क्षोभविणारा काल, पूर्वकल्पांतील प्राण्यांचें अदृष्ट व सत्त्व आदिकरून गुण यांना घेऊन परमेश्वर त्या सातहि तत्त्वांमध्यें प्रवेश करितो ॥५०॥ त्यानें प्रवेश केल्यावर त्या तत्त्वांमध्यें क्षोभ उत्पन्न होऊन तीं एकत्र झालीं आणि त्यांच्यापासून एक अंडें उत्पन्न झालें. त्या अंड्यापासूनच विराट्पुरुषाची उत्पत्ति झाली आहे ॥ ५१ ॥ ह्या अंड्याला विशेष असें नांव आहे व त्यामध्यें हा सर्व लोकांचा पसारा भरलेला आहे. त्याच्याभोंवतीं उत्तरोत्तर दहापटीनें वाढत गेलेलीं अशीं उदक, तेज, वायु, आकाश व अहंकार, यांचीं वेष्टणें असून सर्वांच्या बाहेर प्रकृतीचें वेष्टण आहे. असें हें वेष्टणयुक्त अंडें म्हणजे भगवान् श्रीहरीचेंच स्वरूप होय ॥ ५२ ॥ तें तेजोमय ब्रह्मांड उदकांमध्यें पडलेलें होतें; तेव्हां सर्वशक्तिमान् परमेश्वरानें उठून त्यांत प्रवेश केला आणि त्या अंड्याला अनेक छिद्रें पाडिलीं ॥ ५३ ॥ त्या ब्रह्मरूपी पुरुषाला प्रथम मुख उत्पन्न झालें व नंतर त्या मुखाच्या ठिकाणीं वाणीनामक इंद्रिय उत्पन्न झालें. वाणीसहवर्तमान तिची अधिष्ठात्री देवता जो अग्नि त्यानें ह्या मुखामध्यें प्रवेश केला. नंतर त्याला दोन नाकपुड्या उत्पन्न झाल्या व त्यांत प्राणानें भरलेलें घ्राणेन्द्रिय उत्पन्न झालें ॥५४॥ घ्राणेन्द्रियाच्या मागून त्याची देवता जी वायु ती तेथें उत्पन्न झाली. नंतर त्या पुरुषाला नेत्रांचीं स्थानें व त्यांत चक्षुरिन्द्रिय उत्पन्न होऊन त्याच्यामागून त्याची देवता सूर्य तेथें उत्पन्न झाली. नंतर त्याला कानांचीं विवरें फुटलीं. तेथें कर्णेन्द्रियाच्या देवता दिशा उत्पन्न झाल्या ॥ ५५ ॥ मग त्या विराट् पुरुषाला त्वचा उत्पन्न झाली. त्या त्वचेवर केंस, दाढी,

---

* आकाशाचा गुण शब्द हा एकच आहे. आकशाचें कार्य वायु असून त्यांत तो शब्द व वायूचा स्वतःचा गुण स्पर्श आहे; म्हणून वायूंत शब्द व स्पर्श असे दोन गुण झाले. वायूच्या कार्यांत म्हणजे तेजांत तीन गुण आहेत. वायूंतून आलेले दोन गुण व तिसरा तेजाचा स्वतःचा गुण रूप. ह्याचप्रमाणें पाण्यांत चार गुण आहेत व पृथ्वींत पांच गुण आहेत. द्वितीय स्कंधांतहि हा विषय येऊन गेला आहे.

मिशा आदिकरून उत्पन्न झाल्या. त्यानंतर औषधि उत्पन्न झाल्या आणि मग जननेंद्रिय उत्पन्न झालें ॥ ५६ ॥ त्या विराट्पुरुषाला नंतर वीर्य उत्पन्न झालें व त्याच्यामागोमाग त्याची देवता पाणी, हीं उत्पन्न झालीं. नंतर गुदद्वार व गुदद्वारानंतर अपान इंद्रिय याप्रमाणें होऊन, त्या अपान इंद्रियानंतर लोकांना भय उत्पन्न करणारा असा मृत्यु उत्पन्न झाला ॥ ५७ ॥ मग त्या विराट् पुरुषाला दोन हात फुटले. त्यांच्यापासून त्यांचें इन्द्रियबल व स्वर्गीचा राजा इंद्र हीं देवता उत्पन्न झाली. नंतर त्याला पाय फुटले. त्या पायापासून, त्यांचें इन्द्रिय गति व देवता विष्णु, हीं उत्पन्न झालीं ॥ ५८ ॥ त्या विराट् पुरुषाला त्यानंतर नाड्या उत्पन्न झाल्या आणि मग त्यांचें इंद्रिय जें रक्त तें त्या नेत्रांत येऊन भरलें. नंतर त्यांच्या देवता ज्या नद्या त्या उत्पन्न झाल्या आणि मग उदर उत्पन्न झालें ॥ ५९ ॥ नंतर त्या विराट् पुरुषाला क्षुधा आणि तृषा उत्पन्न झाल्या आणि त्यांच्या ठिकाणीं त्यांची देवता जे समुद्र ते उत्पन्न झाले. नंतर ह्या विराट् पुरुषाला हृदय उत्पन्न झालें आणि हृदयानंतर अंतःकरण उत्पन्न झालें ॥ ६० ॥ मग त्या अंतःकरणापासून त्याची देवता चंद्र हा उत्पन्न झाला नंतर त्यांत बुद्धि व तिची देवता ब्रह्मदेव, तसाच अहंकार व त्याची देवता रुद्र आणि चित्त व त्याची देवता क्षेत्रज्ञ हीं उत्पन्न झालीं ॥ ६१ ॥ याप्रमाणें सर्व देवता उत्पन्न झाल्यावर विराट्पुरुषाला त्या उठविण्याचा यत्न करूं लागल्या. परंतु त्यांना त्याला उठवितां आलें नाहीं, म्हणून आणखी प्रयत्न करून त्याला उठविण्यासाठीं त्यांनीं आपापल्या इन्द्रियांत पुनः एकवार प्रवेश केला ॥ ६२ ॥ अग्नीनें वाणीसह मुखाचा आश्रय केला, तेव्हांहि तो विराट्पुरुष उठला नाहीं. वायूनें घ्राणेन्द्रियासह नाकपुड्यांत प्रवेश केला, तरीहि तो विराट्पुरुष उठला नाहीं ॥ ६३ ॥ सूर्यानें चक्षुरिन्द्रियासह नेत्रस्थानाचा आश्रय केला, तेव्हांही विराट्पुरुष उठला नाहीं. दिशांनीं कर्णेंद्रियासह कर्णविवरांत प्रवेश केला, तरी देखील विराट्पुरुष उठला नाहीं ॥ ६४ ॥ मग औषधींनी रोमांसह त्वचेचा आश्रय केला तरी तो विराट्पुरुष उठेना. तेव्हां पाण्यानें वीर्यासह जननेंद्रियाचा आश्रय केला, तरी सुद्धा विराट्पुरुष उठला नाहींच ॥ ६५ ॥ मृत्यूनें अपानेन्द्रियासह गुदद्वाराचा आश्रय केला व इंद्रानें बलनामक इंद्रियासह हातांचा आश्रय केला, तरी देखील विराट्पुरुष उठूं शकला नाहीं ॥ ६६ ॥ विष्णूनें मग गतीसह पायांचा आश्रय केला व नद्या रक्तासह नाड्यांत शिरल्या, तरी विराट्पुरुष उठला नाहीं ॥ ६७ ॥ नंतर समुद्रानें क्षुधा व तृषा यांसह उदराचा आश्रय केला आणि चंद्रानें मनासह हृदयांत प्रवेश केला. तरींदेखील विराट्पुरुष उठेना ॥ ६८ ॥ तेव्हां ब्रह्मदेवानें बुद्धीसह हृदयांत प्रवेश केला आणि त्याच्यामागून रुद्रानें अहंकारासह हृदयांत प्रवेश केला तरी विराट् पुरुष उठला नाहींच ॥ ६९ ॥ पण शेवटीं चित्ताची अधिष्ठात्री देवता जो क्षेत्रज्ञ, तो जेव्हां चित्तासह हृदयांत शिरला, तेव्हां विराट्पुरुष तत्काल पाण्यांतून उठला ॥ ७० ॥ जसा एखादा मनुष्य निजला म्हणजे त्याला उठविण्यासाठीं प्राण, इंद्रियें, मन व बुद्धि ह्या सर्वांनीं आपली शक्ति खर्च केली तरी क्षेत्रज्ञाच्या

साहाय्यावांचून त्यांना उठवितां येत नाहीं, तशीच ही गोष्ट होय ॥ ७१ ॥ यास्तव, हे माते, मनुष्यानें प्रथम ईश्वराची भक्ति करावी, म्हणजे तिच्या योगानें त्याला वैराग्य उत्पन्न होऊन त्याची बुद्धि योगाभ्यासाकडे प्रवृत्त होईल. तशी ती झाली म्हणजे योगाभ्यासाच्या योगानें त्याला ज्ञान उत्पन्न होतें; मग त्या ज्ञानाच्या योगानें ह्या कार्यकारणात्मक तत्त्वाच्या समुदायांतून क्षेत्रज्ञाचें स्वरूप पृथक् ओळखून त्याचें मनुष्यानें आत्म्यामध्यें चिंतन करावें ॥ ७२ ॥

## सव्विसावा अध्याय समाप्त

# अध्याय २७ वा

भगवान् कपिलमुनि म्हणाले—माते, सूर्याचें प्रतिबिंब पाण्यांत पडलें असतां पाणी हाललें म्हणजे सूर्य हालल्याचा भास होतो, पण खरोखर ज्याप्रमाणें सूर्य हालत नाहीं, त्याप्रमाणें देहांत असणारा जीव देहावर होणाऱ्या प्रकृतीच्या सुखदुःखादिक गुणांनीं लिप्त होत नाहीं. कारण तो स्वतः निर्गुण निर्विकार असून कोणतीहि क्रियाकरीत नाहीं ॥ १ ॥ परंतु तो जीव जेव्हां प्रकृतीच्या गुणांवर आसक्ति ठेवितो, तेव्हां अहंकारामुळें स्वतःचें स्वरूप विसरून जाऊन मीच सर्व कर्में करितों असा तो अभिमान बाळगूं लागतो ॥ २ ॥ मग अभिमानामुळें तो परतंत्र होतो, त्याचें समाधान नाहींसें होतें व देहावरील आसक्तीमुळें घडलेल्या कर्मांच्या दोषांमुळें तो उत्तम, अधम व मिश्र अशा वेगवेगळ्या योनींमध्यें उत्पन्न होऊन संसार-मार्गांत पडतो ॥ ३ ॥ कारण, ज्याप्रमाणें स्वप्नांत दिसणारे पदार्थ खोटे असले, तरी त्यांपासून भय, शोक, मूर्च्छा इत्यादि अनर्थ उत्पन्न होतात, त्याप्रमाणें संसार जरी खोटा आहे, तरी प्राण्यांना विषयांचा ध्यास लागल्यामुळें त्यांची त्यापासून सुटका होत नाहीं ॥ ४ ॥ म्हणूनच दुष्ट इंद्रियांच्या विषयस्वरूपी मार्गांमध्यें गुंतलेलें अंतःकरण मनुष्यानें दृढ भक्तीनें आणि कडकडीत वैराग्यानें हळूहळू आपल्या स्वाधीन करून घेतलें पाहिजे ॥ ५ ॥

यमनियम आदिकरून योगमार्गांनीं अंतःकरण स्वाधीन करून घेण्याचा अभ्यास केला. विश्वासानें माझ्याठिकाणीं दृढ प्रेम ठेविलें आणि माझ्या कथा श्रवण केल्या ॥ ६ ॥ तसेंच सर्व प्राण्यांच्या ठिकाणीं समदृष्टि ठेवून कोणाशीं द्वेष केला नाहीं, कोठेंहि आसक्ति ठेविली नाहीं व ब्रह्मचर्य आणि मौनव्रत धारण करून स्वधर्माचें उत्तम आचरण केलें, ॥ ७ ॥ सहजगत्या मिळेल तेवढ्यांत संतोष मानून व मिताहारपूर्वक त्याचा आश्रय करून ईश्वराचें ध्यान केलें व गंभीर वृत्ति ठेवून सर्वांशीं मित्रभावानें वागलें आणि प्राणिमात्राविषयीं दयायुक्त राहून धैर्य खचूं दिलें नाहीं, ॥ ८ ॥ तसेंच हा देह व ह्याचे संबंधीं पुत्र, मित्र, स्त्री, ह्यांवर मी व माझी, असा दुरभिमान न ठेवितां प्रकृति व पुरुष यांचें सत्यस्वरूप समजण्याचें साधन तत्त्वज्ञानद्वारा प्राप्त करून घेतलें ॥ ९ ॥ आणि त्या ज्ञानाच्या योगानें जाग्रति आदिकरून अवस्था नष्ट झाल्या, म्हणजे आपोआप भेदबुद्धीचा नाश होतो; व जसें नेत्रेंद्रियानें आकाशांतील सूर्याला आपण पाहातों त्याप्रमाणें अहंकारानें युक्त अशा जीवात्म्याच्या योगानें योग्याला परमात्म्याची प्राप्ति होऊन आत्मदर्शन होतें ॥ १० ॥ आणि मग देहादि उपाधींनीं रहित मिथ्याभूत अहंकारामध्यें सद्रूपानें भासणाऱ्या आणि जगाचें कारण जी प्रकृति तिला आधारभूत असून त्या सर्व मिथ्याभूत प्रपञ्चाला प्रकाशित करणाऱ्या अशा त्या विश्वव्यापक अद्वय परमात्म्याच्या स्थानाला तो योगी प्राप्त होतो

॥ ११ ॥ सूर्याचें प्रतिबिंब पाण्यांत पडून त्याचा कवडसा भिंतीवर पडतो व त्या कवडशाकडे पाहून पाण्यांतील सूर्यप्रतिबिंबाकडे आपलें लक्ष जातें, आणि मग त्या पाण्यांतील सूर्यबिंबा-वरून आकाशांतलें खऱ्या सूर्यबिंबाचें ज्ञान होतें; ॥ १२ ॥ त्याप्रमाणेंच भूतें, इन्द्रियें आणि मन यांमध्यें अहंकाराचें प्रतिबिंब पडलें असून, त्या अहंकारामध्यें आत्म्याचें प्रतिबिंब पडलेलें असल्यामुळें भूतादिकांतील प्रतिबिंबाच्या योगानें, ज्यांत ब्रह्मवस्तूचें प्रति-बिंब पडलें आहे, असा त्रिगुणात्मक अहंकार प्रथम लक्षांत घेतला जातो आणि नंतर त्या ब्रह्मप्रतिबिंबयुक्त अहंकाराच्या योगानें सत्यज्ञानस्वरूप अशा आत्म्याचें ज्ञान होतें ॥ १३ ॥ माते, आकाशादि पंचमहाभूतें, शब्दादि पंच सूक्ष्मभूतें, इन्द्रियें, मन, बुद्धि, अहंकार या सर्वांचा निद्रावस्थेंत अव्यक्त प्रकृतीचा ठिकाणीं लय होतो. परंतु त्या वेळीं तो जागृत असून निरहंकार असतो ॥ १४ ॥ तसेंच निद्रावस्थेंत असतांहि अहंकार नष्ट झाला असतां, एखाद्या द्रव्यलोभी पुरुषास आपलें द्रव्य नष्ट झालें असतां जणू काय आपणच नष्ट झालों असें वाटतें, त्याप्रमाणेंच स्वतः अविनाशी असतांनाहि आपणच नष्ट झालों असें जो निष्कारण मानितो, तोच साक्षीभूत आत्मा होय. विवेकी पुरुष याप्रमाणें विचार करितो आणि अहंकारानें युक्त अशा कार्यकारणात्मक द्रव्यसमूहाचा प्रकाशक व सर्वांना साक्षीभूत असा जो आत्मा त्याची प्राप्ति करून घेतो ॥ १५ ॥ १६ ॥

देवहूति म्हणाली,—हे सर्वज्ञ प्रभो, देहेंद्रियादिरूप प्रकृति पुरुषाला केव्हांहि सोडून राहात नाहीं, कारण त्या दोघांचा एकमेकांस आश्रय असून दोघेहि नित्य आहेत ॥ १७ ॥ ज्याप्रमाणें गन्ध आणि भूमि, किंवा रस आणि उदक, यांचें एकमेकांपासून स्वतंत्र असें अस्तित्व शक्य नाहीं, त्याप्रमाणें प्रकृति आणि पुरुष हीं देखील एकमेकांना सोडून राहाणें शक्य नाहीं ॥ १८ ॥ वस्तुतः पुरुष हा कर्तुत्वरहित आहे, तेव्हां ज्या प्रकृतीच्या गुणांमुळें त्याला संसारबंध प्राप्त होतो, ते गुण विद्यमान असतां त्याला मोक्षपद कसें बरें मिळूं शकेल ? ॥ १९ ॥ तत्त्वज्ञानाच्या विचारानें एखाद्या पुरुषाचें संसाररूप हें प्रचंड भय नष्ट झालें, तरी ज्या प्रकृतीच्या गुणांमुळें हा संसार मूळ उत्पन्न झाला, ते गुण विद्यमान राहिल्यामुळें तें भय पुनः प्राप्त होतेंच ॥ २० ॥

देवहूतीची ही शंका ऐकून भगवान् कपिलमुनि म्हणाले,—माते, फलाशारहित स्वधर्माचें आचरण करावें, अंतःकरण निर्मळ ठेवावें, चिरकाल माझ्या कथा श्रवण कराव्या आणि त्या कथाश्रवणानें वृद्धिंगत झालेली अशी दृढ भक्ति माझ्या ठिकाणीं ठेवावी ॥ २१ ॥ प्रकृति आणि पुरुष यांच्या यथार्थ स्वरूपाचें ज्ञान करून घ्यावें, तीव्र वैराग्य धारण करावें आणि तपश्चर्या व अष्टाङ्ग योग या साधनांनीं आत्मस्वरूपाचें ध्यान करण्याचा प्रबल अभ्यास करावा; ॥ २२ ॥ म्हणजे प्रतिदिवशीं हळूहळू पुरुषाची ही प्रकृति क्षय पावूं लागते आणि अरणिनामक काष्ठ अग्नीला उत्पन्न करून जसें स्वतः त्याच्यायोगानें जळून नष्ट होतें, त्याप्र-माणें स्वतःपासून उत्पन्न झालेल्या तत्त्वसमुदायाच्या ज्ञानाच्या योगानेंही प्रकृतिसुद्धां नाहींशी होते ॥ २३ ॥ प्रकृतीचे भोग भोगीत असतांच तिच्या ठिकाणीं संसारदुःखाला कारणीभूत असे अनेक दोष आढळून येतात; ते दोष दिसूं लागले म्हणजे पुरुषाला तिचा वीट येतो

व तो तिच्यावरील आसक्ति सोडून देऊन आत्मस्वरूपीं रममाण होतो. अशा त्या स्वतंत्र ईश्वरस्वरूप झालेल्या त्या पुरुषाचें ती प्रकृति मग कांहीं सुद्धां अहित करूं शकत नाहीं ॥ २४ ॥ ज्याप्रमाणें निजलेल्या मनुष्याला स्वप्नांत भय व शोक इत्यादि अनेक अनर्थ उत्पन्न होतात, पण तेच जागेपणीं त्याला मुळींच मोह उत्पन्न करूं शकत नाहींत ॥ २५ ॥ त्याप्रमाणें मनुष्याला तत्त्वांचें ज्ञान झालें व तो माझ्या ठिकाणीं अंतःकरण ठेवून आत्मस्वरूपांत रममाण होऊं लागला, म्हणजे प्रकृति त्याला कधींहि अपाय करूं शकत नाहीं ॥ २६ ॥ याप्रमाणें पुष्कळ जन्मांचा काल लोटल्यावर मनुष्याची आत्मस्वरूपीं प्रीति जडून जेव्हां त्याला ब्रह्मलोकासुद्धां सर्व लोकांविषयीं पूर्ण वैराग्य उत्पन्न होतें ॥ २७ ॥ तेव्हां माझ्या भक्ताला आत्मस्वरूपाचें यथार्थ ज्ञान होऊन आत्मदर्शनाच्या योगानें त्याचे सर्व संशय दूर होतात, आणि मग तो याच लोकीं असतांहि ज्ञानयुक्त होऊन माझ्या अत्युत्तम अनुग्रहामुळें निरतिशयानन्दस्वरूप अशा माझ्या मोक्षनामक पदाला सहज प्राप्त होतो, तेथें प्राप्त झाल्यावर लिङ्गदेहाचा नाश होत असल्यामुळें योगी पुरुषाला पुनः संसारांत परत यावें लागत नाहीं ॥ २८ ॥ २९ ॥ माते, मोक्षप्राप्तीला एक मोठें विघ्न असतें, तें विघ्न म्हणजे अणिमादि सिद्धि होत. त्या सिद्धि योगाभ्यासानें पूर्णपणें प्राप्त होत असतात. त्यांच्या प्राप्तीला योगाशिवाय दुसरें साधन नाहीं. त्या सिद्धींत योग्याचें मन गुंतलें नसलें म्हणजे जेथें मृत्यूचा गर्व चालत नाहीं, अशा माझ्या अविनाशी पदाला तो योगी प्राप्त होतो ॥ ३० ॥

**सत्ताविसावा अध्याय समाप्त**

---

# अध्याय २८ वा

भगवान् कपिलमुनि म्हणाले,—हे राजकन्ये, ज्या योगाच्या* आचरणानें आपलें मन प्रसन्न होऊन सन्मार्गालाच लागतें, त्या भक्तियुक्त योगाचें लक्षण मी तुला सांगतों ॥ १ ॥ योगाभ्यासी पुरुषानें शक्त्यनुसार स्वधर्म आचरावा, आणि अधर्म किंवा परधर्म यांपासून दूर असावें. तसेंच दैवानें जें मिळेल तेवढ्यावर संतुष्ट असावें व आत्मज्ञानी पुरुषांच्या चरणाचें पूजन करावें ॥ २ ॥ धर्म, अर्थ, काम ह्या गृहस्थधर्माकडे प्रवृत्ति होऊ नये, मोक्षधर्मांच्या ठिकाणीं प्रीति धरावी, परिमित व शुद्ध अन्नाचें सेवन करावें आणि कोणापासूनहि उपद्रव होणार नाहीं, अशा एकांतवासांत नित्य रहावें ॥ ३ ॥ हिंसा करूं नये, सत्य बोलावें, चोरी करूं नये, अवश्य तेवढ्याच वस्तूंचा स्वीकार करावा, ब्रह्मचर्य व तप यांचें आचरण करावें, देह व अन्तःकरण हीं शुचिर्भूत ठेवावीं व वेदाध्ययन व परमेश्वरपूजन करीत असावें, ॥ ४ ॥ व्यर्थ भाषण करूं नये, चांगलें आसन सिद्ध करून शरीर स्थिर करावें, प्राणायामानें हळूहळू प्राणवायूचा जय करावा आणि मनाच्या योगानें इन्द्रियांना विषयांपासून सोडवून त्यांची हृदयांत स्थापना करावी ॥ ५ ॥ शरिरामध्यें मूलाधारचक्र आदिकरून जीं प्राणाचीं स्थानें आहेत, त्यांपैकीं कोणत्या तरी एका ठिकाणीं मनासह प्राणवायु स्थिर करावा. वैकुण्ठवासी श्रीहरीच्या लीलांचें हृदयांत पूर्णपणें ध्यान करावें आणि अन्तःकरण आत्मस्वरूपीं लीन करून तेथें तें एकाग्र करावें ॥ ६ ॥ या आणि अशाच प्रकारें दुसऱ्याहि उपायांनीं, दुष्ट आणि विषयरूपी आडमार्गाकडे नित्य धावणाऱ्या मनाला बुद्धीच्या साहाय्यानें साधक पुरुषानें हळूहळू परमेश्वरस्वरूपीं लावावें. त्यासाठीं प्रथम मनाला स्वाधीन करून घ्यावें आणि आळस टाकून त्या उद्योगाला लागावें ॥ ७ ॥ योगाभ्यासी पुरुषानें आपलें आसन पवित्र स्थळीं मांडावें, आसनाचा जय करून त्यावर सुख होईल असें स्वस्तिकासन घालून बसावें, आणि आपलें शरीर सरळ ठेवून प्राणायामाचा अभ्यास करावा ॥ ८ ॥ पूरक, कुम्भक आणि रेचक ÷ ह्या क्रमानें किंवा उलटक्रमानें, म्हणजे रेचक, कुम्भक व पूरक अशा क्रमानें, सारांश ज्या कोणत्याहि रीतीनें आपलें मन चाञ्चल्य सोडून देऊन स्थिर होईल अशा प्रकारच्या रीतीनें प्राणाचा मार्ग शुद्ध करावा ॥ ९ ॥

---

* सबीज आणि निर्बीज असा दोन प्रकारचा योग आहे. विषयांपासून इंद्रियांना काढून घेऊन त्यांना आत्मस्वरूपाकडे वळवणें म्हणजे योग. ही गोष्ट केवळ तत्त्वज्ञानाच्या जोरावर करणें हा निर्बीज योग आणि परमेश्वरभक्तीच्या साहाय्यानें ती करणें म्हणजे सबीज योग होय.

÷ पूरक म्हणजे वायु फुप्फुसांत घेणें, कुम्भक म्हणजे तो तेथें कोंडून स्थिर ठेवणें आणि रेचक म्हणजे तो पुनः बाहेर सोडून फुप्फुसें रिकामीं करणें. प्राणायामाला आरंभ

वायूच्या साहाय्यानें अग्नींत तापविलेलें लोखंड जसें निर्मळ होतें, तसें योग्यानें प्राणायामाच्या योगानें आपला प्राणवायु स्वाधीन केला म्हणजे त्याचें मन लवकरच शुद्ध होतें ॥ १० ॥ माते, योग्यानें प्राणायामानें आपले वातपित्तादि दोष नाहींसे करावे, धारणेच्या योगानें पापें जाळून टाकावीं, प्रत्याहाराच्या योगानें विषयसंबन्ध तोडून टाकावे आणि ध्यानाच्या योगानें रागलोभादि दुर्गुण नाहींसे करावे ॥ ११ ॥ योगाभ्यासानें मन जेव्हां शुद्ध व निर्मळ होईल, तेव्हां योग्यानें नासिकेच्या अग्राकडे आपली दृष्टि ठेऊन श्रीहरीच्या मूर्तीचें ध्यान करावें ॥ १२ ॥ श्रीहरीच्या मूर्तीचें स्वरूप ध्यानांत आणतांना अशी कल्पना करावी कीं, त्याचें मुखकमल प्रसन्न आहे, त्याचे नेत्र कमळाच्या गाभ्याप्रमाणें किंचित् तांबूस आहेत, त्याच्या अंगाचा वर्ण निळ्या कमलाच्या पानाप्रमाणें श्यामल असून त्यानें आपल्या हातांत शंख, चक्र व गदा हीं आयुधें धारण केलेलीं आहेत ॥ १३ ॥ त्यानें सुंदर कमळाच्या केसराप्रमाणें पिंवळ्या रंगाचें वस्त्र परिधान केलें आहे व त्याच्या वक्षःस्थलावर श्रीवत्सचिन्ह असून, कंठामध्यें तेजःपुञ्ज कौस्तुभमणि लटकत आहे ॥१४॥ त्याच्या गळ्यांत पायांपर्यंत लोंबणारी वनमाला असून तिच्या सभोंवार मधुपानानें मत्त झालेले भ्रमर मधुर गुंजारव करीत आहेत, व त्यानें अतिशय मूल्यवान् असे हार, कडीं, मुगुट, बाहुभूषणें आणि नूपुरेंहि धारण केलीं आहेत ॥ १५ ॥ त्याच्या कमरेंत कमरपट्टा असल्यामुळें तो फारच शोभत आहे. भक्तांच्या हृदयकमलांत त्याचें आसन असून तो अत्यंत सुंदर, गंभीर व मनाला आणि नेत्रांना आनंद उत्पन्न करणारा आहे; ॥ १६ ॥ तो आपल्या भक्तांकडे प्रेमळ दृष्टीनें पाहात असून सर्व लोक त्याला निरंतर नमस्कार करीत आहेत व तो बालरूप असून आपल्या भक्तांवर कृपा करण्यास अगदीं उत्सुक आहे ॥ १७ ॥ तसेंच त्याची कीर्ति वर्णनीय व पवित्र असून, तो, बलि, नल, धर्म इत्यादि पुण्यश्लोक पुरुषांची कीर्ति वाढविणारा आहे. हे माते, अशा प्रकारच्या श्रीहरीची मूर्ति, योग्यानें मनांत धारण करावी व तीवरून मन चळलें नाहीं तोंपर्यंत तिचें परिपूर्ण स्वरूपांत ध्यान करावें ॥ १८ ॥ माते, भगवन्मूर्तीचें ध्यान करावयाचें तें, ती मूर्ति उभी राहिलेली आहे, चालती आहे, बसलेली, निजलेली, हृदयगुहेंत वास करणारी अथवा मनोहर लीला करणारी आहे, अशी आपल्या अन्तःकरणांत कल्पना करावी व त्या श्रीहरीचें शुद्ध भक्तियुक्त अन्तःकरणानें ध्यान करावें ॥ १९ ॥ नंतर त्या मूर्तीवर लक्ष्य स्थिर राहूं लागलें आणि त्याचे सर्व अवयव एकाच समयीं ध्यानांत येऊं

करण्यापूर्वी प्रथम पूरक कीं रेचक करावयाचा, हें प्रत्यक्ष सुखकारक काय होईल तें पाहून ठरवावें. पूरकानंतर कुंभक व त्यानंतर रेचक हा क्रम सरळ आहे. याच्या उलट क्रम म्हणजे रेचक आधीं, मग कुंभक आणि मग पूरक असा धरिल्यास कुंभक म्हणजे बहिः कुंभक समजला पाहिजे. शक्य तितका वायु बाहेर टाकल्यावर तो कांहीं काळ तसाच राहून आंत न घेणें म्हणजे बहिःकुंभक होय. आरंभीं पूरक केला किंवा रेचक केला तरी शेवटीं एकच क्रम येतो.

लागले, म्हणजे योग्यानें आपलें अन्तःकरण तेथून सोडवून श्रीहरीच्या निरनिराळ्या अवयवांवर लावावें ॥ २० ॥ साधक पुरुषानें प्रथम आपल्या हृदयांत श्रीहरीच्या चरण-कमलांचें ध्यान करावें आणि ते करतांना त्या चरणकमलांवर वज्र, अंकुश, ध्वज, कमल, हीं चिन्हें आहेत, त्याच्या बोटांचीं नखें उंच, आरक्त व सुशोभित आहेत आणि त्या नखांच्या किरणांनीं साधक पुरुषाच्या हृदयांतील सर्व अन्धकार अगदीं नाहींसा होऊन गेला आहे, अशी मनांत भावना ठेवावी ॥ २१ ॥ श्रीहरीचें चरणकमल क्षालन केलेल्या उदकापासून उत्पन्न झालेली श्रेष्ठ नदी भागीरथी, तिचें पवित्र उदक मस्तकावर धारण केल्यामुळें प्रत्यक्ष शंकरहि कृतकृत्य झाले, तें पदकमल म्हणजे ध्यान करणाऱ्या पुरुषाच्या अंतःकरणांतील पापरूपी पर्वतावर फेंकलेलें जणू काय वज्रच होय. अशा त्या चरणकमलांचें योगाभ्यासानें प्रथम चिरकाल ध्यान करावें ॥ २२ ॥ नंतर भगवंताच्या गुढघ्यांचें ध्यान करावें आणि अशी भावना करावी कीं, देवांनींहि नेहमीं वंदित केलेली अशी कमलनयना मोक्षदायक लक्ष्मीच भगवंताचे ते गुढघे आपल्या मांडीवर घेऊन कान्तिमय कोमल हस्तांनीं चुरीत आहे ॥ २३ ॥ नंतर गरुडाच्या खांद्यांवर बसलेल्या अशा श्रीहरीच्या सुंदर मांड्यांचें ध्यान करावें, आणि असें मनांत आणावें कीं, त्या मांड्या बलाचा आधार असून त्यांची कांति जवसाच्या फुलासारखी श्यामल आहे. नंतर योग्यानें कटि-प्रदेशाचें ध्यान करावें व तें करतांना कटिप्रदेशाच्या सभोंवतीं घोट्यांपर्यंत लोंब-णारा पिंवळा पीतांबर भगवन्तानें परिधान केलेला असून त्या पीताम्बरावर घातलेला कमरपट्टा फारच शोभायमान दिसत आहे, अशी कल्पना करावी ॥ २४ ॥ त्यानंतर भुवनसमुदायाला आधारभूत असलेल्या उराच्या मध्यभागीं शोभणाऱ्या भगवंता-च्या नाभिविवराचें ध्यान करावें. त्या नाभीपासूनच स्वयंभू ब्रह्मदेवाचें उगमस्थान असें सकललोकरूपी कमळ उत्पन्न झालें. नाभिकमलानंतर भगवंताच्या दोन स्तनांचें ध्यान करावें आणि ते पाचेच्या उत्तम मण्यांसारखें असून गळ्यांतील निर्मल हाराच्या कान्तीनें ते गौरवर्ण दिसत आहेत, अशी भावना ध्यान करतांना मनांत ठेवावी ॥ २५ ॥ स्तनांच्या ध्यानानंतर, भगवंताच्या वक्षस्थलाचें ध्यान करावें. ज्याला सर्वलोक नमस्कार करितात अशा श्रेष्ठ श्रीहरीचें वक्षःस्थल म्हणजे महालक्ष्मीचें वसतिस्थानच होय. भक्तांच्या मनाला आणि नेत्रांना तें अत्यंत समाधान उत्पन्न करणारें आहे. कौस्तुभमण्यालाहि विशेष शोभा आणणाऱ्या अशा श्रीहरीच्या कंठाचें मनांत ध्यान करावें ॥ २६ ॥ नंतर ज्या बाहूंच्या आश्रयानें सर्व लोकपाल राहातात, अशा त्या परमेश्वराच्या बाहूंचें ध्यान करावें, व त्या वेळीं, समुद्रमंथनाच्या प्रसंगीं मंदरपर्वताच्या परिभ्रमणामुळें त्या बाहूंतील भूषणें अधिक उज्ज्वल झालीं आहेत, अशी कल्पना करावी. तसेंच मग ज्याचें तेज शत्रूंना सहन करवत नाहीं. अशा त्या श्रीहरीच्या सुदर्शनचक्राचें आणि त्याच्या कमलासारख्या हातावर राज-हंसाप्रमाणें शोभणाऱ्या शंखाचें ध्यान करावें ॥ २७ ॥ नंतर शूर शत्रूच्या रक्तपंकानें भरलेल्या भगवान् श्रीहरीच्या आवडत्या कौमोदकी नामक गदेचें स्मरण करावें. मग भ्रमर-समूहाच्या गुंजारवानें निनादित झालेल्या कंठांतील वनमालेचें ध्यान करावें व त्याच्या

कण्ठांतील जीवाचें निर्मळ तत्त्व जो कौस्तुभमणि, त्याचें स्मरण करावें ॥ २८ ॥ नंतर आपल्या भक्तांविषयीं करुणा उत्पन्न झाल्यामुळें ज्यानें जगांत अवतार धारण केला आहे अशा भगवंताच्या उत्तम नासिकायुक्त मुखकमळाचें योग्यानें ध्यान उत्तम प्रकारें करावें, आणि तें करतांना कानांतील चकचकीत मकराकार कुंडलें हालत असल्यामुळें त्याच्या निर्मळ कपोलांवर विशेष कांति आली आहे अशी भावना धरावी ॥ २९ ॥ भ्रमर आपल्या सान्या वैभवानें ज्याची नित्य सेवा करीत असतात, व जें दोन मत्स्यांनीं आश्रय केलेलें आहे, अशा त्या लक्ष्मीचें निवासस्थान असलेल्या कमलाला, भगवंताचें मुखकमळ मागें सारणारें असून त्याचे नेत्र कमलासारखे व त्याच्या भुवया अत्यंत तेजस्वी आहेत, अशी कल्पना करावी व आळस टाकून भगवंताच्या या मुखाचें योग्यानें ध्यान करावें, कारण योगानें शुद्ध झालेल्या मनांतच तें प्रगट होणारें आहे ॥ ३० ॥ मुखकमलानंतर श्रीहरीच्या नेत्रकटाक्षांचें ध्यान अत्यंत प्रेमानें आपल्या हृदयांत करावें; व भक्तांवर अत्यंत दया करून त्याच्या अतिभयंकर अशा तिन्ही प्रकारच्या तापत्रयांची शांति करण्यासाठीं तो भगवान् आपले कृपाकटाक्ष त्यांच्यावर सोडीत आहे, व मंदहास्याच्या योगानें ज्याच्या हृदयांतील प्रसन्न भावना द्विगुणित झालेली आहे, अशी भावना मनांत धरावी ॥ ३१ ॥ नंतर सर्व दुःखें दूर करणाऱ्या अशा त्या भगवान् श्रीहरीच्या हास्याचें ध्यान करावें. ( कारण तें हास्य नम्र झालेल्या लोकांना दुःसह शोक प्राप्त होऊन त्यांच्या डोळ्यांतून अश्रूंचे समुद्र उत्पन्न झाले, तरी त्यांना सुकवून टाकितें. ) हास्यानंतर श्रीहरीच्या भ्रुकुटिमंडलाचें ध्यान करावें व मुनिजनांना मदन पीडा देऊं लागला असतां त्याला मोहित करण्याच्याच हेतूनें कीं काय, भगवंतानें हें भ्रुकुटिमंडल आपल्या मायेच्या योगानें निर्माण केलें आहे, अशी कल्पना करावी ॥ ३२ ॥ नंतर आपल्या शरिरांतील हृदयरूपी विवरामध्यें वास करणारा असा तो श्रीहरी मोठ्यानें हंसत आहे आणि हांसतांना त्याच्या अधरोष्ठाची कांति दन्तावर पडल्यामुळें कुन्दाच्या कळ्यांसारखी ती बारिक दन्तपंक्ति तांबूस दिसत आहे, अशी कल्पना करून त्या हास्याचें ध्यान करावें. हें हास्य ध्यानाचा विषय असल्यामुळें त्यावर एकाग्रतेनें व प्रेमयुक्त भक्तीनें योग्यानें आपलें अंतःकरण स्थिर ठेवावें. दुसरीकडे पाहाण्याची इच्छा धरूं नये ॥ ३३ ॥ या रीतीनें ध्यान केलें म्हणजे त्या साधकाचें ईश्वरावर प्रेम जडेल, भक्तीमुळें त्याच्या अंतःकरणाला द्रव उत्पन्न होईल, आनंदानें त्याच्या अंगावर रोमाञ्च उभे राहतील, उत्कण्ठेनें उत्पन्न झालेल्या आनन्दाश्रूंनीं वारंवार आनंदसागरांत तो मग्न होईल, आणि मग भगवन्ताला वश करून घेण्याचें साधन अंतःकरणरूपी गळ, त्यालाहि भगवन्मूर्तीपासून हळूहळू सोडवील * ॥ ३४ ॥ परमानंदाचा अनुभव झाला म्हणजे मनाला

---

* भक्तियुक्त योगसाधनानें अशी सुलभरीतीनें समाधि लागून चित्ताचाहि लय होतो, असा हा सबीज योगाचा प्रकार सांगितला आहे.

ध्याता, ध्यान व ध्येय या त्रिपुटीचा लय होऊन सर्व एकाकार होतें.

विषयांचा कंटाळा येतो, मग ध्यानाचा विषय नाहींसा होऊन मन अनाश्रित बनतें आणि तें ब्रह्मस्वरूपांत लय पावतें. अशा रीतीनें मन नाहींसें झालें म्हणजे सत्त्वादि गुणांचे प्रवाह जे देहादिक उपाधि ते आपोआपच नष्ट होतात, आणि ज्याप्रमाणें काष्ठें गेलीं म्हणजे अग्नि मोठ्या अग्निस्वरूपाला जाऊन मिळतो, त्याप्रमाणें साधन पुरुष आत्मस्वरूपाला प्राप्त होऊन तें अखंड आत्मस्वरूपच सर्वत्र भरलेलें आहे असें त्याला दिसतें ॥ ३५ ॥ अशा रीतीनें अंतःकरणाचा शेवटीं लय झाला म्हणजे योगी त्या ब्रह्मस्वरूपांत लय पावतो. तें ब्रह्मस्वरूप सुख आणि दुःख यांच्या पलीकडे असल्यामुळें, त्या परमात्म-तत्त्वाचा साक्षात्कार झाला म्हणजे सुखदुःखाचें जें भोक्तृत्व पूर्वीं तो स्वतःच मानीत होता, तें आतां अविद्येमुळें उत्पन्न झालेल्या अहंकाराकडेसच तो लावूं लागतो ॥ ३६ ॥ ज्याप्रमाणें एखादा मनुष्य मद्याच्या मदानें धुंद झाला असतां आपल्या कमरेला वस्त्र आहे किंवा नाहीं हें पाहात नाहीं, त्याप्रमाणें पूर्ण स्थितीला पोंचलेल्या सिद्धाला सुद्धां देह बसला आहे कीं उभा आहे, एका जाग्यावरून दैवयोगानें दुसरीकडे गेला आहे, कीं कांहीं दैवयोगानें पुनः जाग्यावर आला आहे, ह्या गोष्टीचें मुळींच भान राहात नाहीं. तो स्वस्वरूपाला प्राप्त झालेला असतो ॥ ३७ ॥ माते, देहाच्या उत्पत्तीचें कारण जें कर्म तें जोंपर्यंत असतें, तोंपर्यंत दैवाच्या आधीन असलेला देह इंद्रियांसहवर्तमान निश्चयानें जिवंतच असतो. पण ज्याला समाधीपर्यंत योग सिद्ध झाला, त्या पुरुषाला आत्मतत्त्वाचें ज्ञान झालेलें असल्यामुळें तो पुत्र, स्त्री, धन इत्यादिक प्रपंचासहवर्तमान असलेली देहावरील अहंममता सोडून देऊन त्याला स्वप्नतुल्य मानितो, आणि त्या देहाचा पुनः अभिमानयुक्त स्वीकार करीत नाहीं ॥ ३८ ॥ मनुष्याचें पुत्रावर किंवा द्रव्यावर अतिशय प्रेम असलें तरी तो त्या दोहोंहूनहि निराळा आहे, असेंच प्रत्यक्ष अनुभवास येतें. त्याप्रमाणें देह, इंद्रियें इत्यादिकांहून द्रष्टा पुरुष निराळा आहे असेंच समजलें पाहिजे ॥ ३९ ॥ जसें कोलीत, ठिणग्या, हीं अग्नीच होत, असें मानितात, किंबहुना अग्नीपासून उत्पन्न झालेल्या धुराला हि अग्नि समजतात, तथापि अग्नि ह्या सर्वांहून निराळाच असतो, किंवा विझविलेल्या काष्ठाहूनहि तो भिन्नच असतो ॥ ४० ॥ त्याप्रमाणें भूतें, इंद्रियें आणि अंतःकरण ह्यांहून त्यांचा द्रष्टा निराळा, जीवसंज्ञक पुरुषाहून ब्रह्मसंज्ञक पुरुष निराळा व प्रकृतीहून तिचा प्रवर्तक पुरुष निराळा आहे ॥ ४१ ॥ जसें उद्भित्, जरायुज, अण्डज व स्वेदज असे भूतांचे चार भेद आहेत, तरी महाभूतरूपानें तीं सर्व एकच होत, त्याप्रमाणें आत्मा सर्व प्राण्यांच्या ठिकाणीं आहे आणि सर्व प्राणी आत्म्याच्या ठिकाणीं आहेत, असें एकनिष्ठ भक्तीच्या योगानें अभेदरूपानें पाहावें ॥ ४२ ॥ जसें अग्नी मूळचा एक असतांहि तो प्रगट होण्याचें स्थान जीं काष्ठें त्यांच्या गुणभेदामुळें तो अनेक प्रकारचा दिसतो, म्हणजे काष्ठ वाटोळें असलें तर अग्नि वाटोळा व काष्ठ लांब असलें तर तो

लांबट भासतो, त्याप्रमाणें देहामध्यें प्रकट होणारा आत्मा देहांच्या विविधपणामुळें नाना प्रकारचा भासतो ॥ ४३ ॥ कपिलभगवान् म्हणतात, माते, ही विष्णूची कार्यकारणात्मक शक्ती समजण्याला अतिशय कठीण आहे, तरी त्या देवाच्या प्रसादानेंच हिला जिंकून पुरुषानें आत्मस्वरूपाची प्राप्ति करून घ्यावी ॥ ४४ ॥

## अठ्ठाविसावा अध्याय समाप्त

---

# अध्याय २९ वा

देवहूति म्हणाली–हे कपिलमुने, ह्या प्रकृत्यादि तत्त्वांचें वास्तविक स्वरूप ज्याच्या योगानें मनुष्याला समजतें, अशी जी प्रकृति, पुरुष व महत्तत्त्वादि तत्त्वें, त्यांचीं लक्षणें सांख्यशास्त्रांत जशीं सांगितलीं आहेत, तशीं तीं तूं मला सांगितलींस. त्यांचें मूळ भक्तियोगानेंहि समजतां येतें असें म्हणतात; यास्तव त्या भक्तियोगाचा प्रकार आतां मला सविस्तर कथन कर ॥ १ ॥ २ ॥ हे भगवन्, ज्याच्या श्रवणानें मनुष्याला सर्वतोपरि वैराग्य उत्पन्न होईल, अशा अनेक प्रकारच्या संसारांतील जन्ममरणरूप गति जीवसमुदायाला कशा कशा प्राप्त होतात, तेंहि तूं मला सांग ॥ ३ ॥ कपिला, ज्याच्या भक्तीमुळें सर्व लोक पुण्याचें आचरण करितात आणि जो सामान्य लोकांचा तसाच ब्रह्मादिक देवांचाहि नियन्ता आहे, त्या परमेश्वरस्वरूपी काळाचें स्वरूप मला स्पष्ट करून सांग ॥ ४ ॥ अज्ञानामुळें लोक मिथ्याभूत देहादिकांवर अभिमान ठेवितात; त्यामुळें त्यांच्या बुद्धि कर्ममार्गामध्यें अत्यंत गढून जाऊन ते कर्मे करतात व थकून जाऊन ह्या संसाररूपी अन्धकारामध्यें चिरकालपर्यंत घोरत पडतात. अशा लोकांना भक्तियोग, अष्टाङ्गयोग व ज्ञानयोग हे प्रकाशित करून देणारा सूर्यच असा तूं अवतरला आहेस ॥ ५ ॥

मैत्रेयमुनि म्हणाले—विदुरा, याप्रमाणें मातेचें मधुर भाषण श्रवण करून कपिलमहामुनीला संतोष वाटला आणि त्याच्या मनाला दयेचा पाझर आला. तिच्या भाषणाचा गौरव करून ते देवहूतीला म्हणाले ॥ ६ ॥

कपिलभगवान् म्हणाले—माते, भक्तियोग आचरण करण्याचे अनेक मार्ग असल्यामुळें तो अनेक प्रकारचा झाला आहे; कारण मनुष्यांच्या स्वभावभूत गुणांच्या वृत्ति निरनिराळ्या असतात, म्हणून त्यांचे अभिप्रायहि भिन्न भिन्न प्रकारचे होतात ॥ ७ ॥ क्रोधी मनुष्य मजविषयीं मी निराळा व परमेश्वर निराळा, अशी भेदबुद्धि, क्रूरपणा, ढोंग किंवा मत्सरबुद्धि यांपैकीं एखाद्याचा अवलंब करून माझी भक्ति करतो, तो तामस भक्त होय ॥ ८ ॥ भेददृष्टि ठेवणारा जो पुरुष विषयसुख, कीर्ति किंवा ऐश्वर्य मिळविण्याच्या इच्छेनें मूर्ति इत्यादिकांच्या ठिकाणीं माझी आराधना करील, तो राजस भक्त होय ॥ ९ ॥ जो भेदबुद्धि ठेवणारा पुरुष केवळ पापक्षयासाठीं किंवा ईश्वरार्पणबुद्धीनें कर्तव्य म्हणूनच माझी भक्ति करील, तो सात्त्विक भक्त होय ॥ १० ॥* माते, जशी गंगेच्या पाण्याची गति समुद्राकडे असते, त्याप्रमाणें सर्वांच्या बुद्धीमध्यें राहणारा उत्तम पुरुष जो मी, त्या माझे

---

* हिंसा, दंभ आणि मत्सर यांनीं प्रेरित झालेले तामसभक्तीचे तीन प्रकार; विषय, सुख व ऐश्वर्य यांनीं प्रेरित अशी तीन जातींची राजस भक्ति आणि पापक्षय, वेदाज्ञा व कर्तव्यबुद्धि यांनीं प्रेरित ती तीन प्रकारची सात्त्विक भक्ति. सर्व मिळून भक्तीचे नऊ भेद

केवळ गुणच श्रवण करून, कोणत्याहि फलाची इच्छा व भेदबुद्धि न ठेवितां माझी भक्ति करणें, हेंच निर्गुण अशा भक्तियोगाचें लक्षण आहे ॥ ११ ॥ १२ ॥ अशी निर्गुण भक्ति करणारे माझे भक्त माझ्या सेवेवांचून दुसऱ्या कशाची सुद्धां इच्छा करीत नाहींत. त्यांना मी सालोक्य, * सार्ष्टि, सामीप्य व सारूप्य अशा ह्या चार प्रकारच्या मुक्ति दिल्या, तरी त्यांचा ते स्वीकार करीत नाहींत ॥ १३ ॥ हा भक्तियोग नांवाचा अत्यन्त श्रेष्ठ योग आहे असें म्हणतात. ह्याच्या साहाय्यानें मनुष्य सत्त्व, रज व तम ह्या तीन गुणांचें कार्य जो संसार त्याचें उल्लंघन करून माझ्या स्वरूपाला प्राप्त होतो ॥ १४ ॥ कपिलमुनि म्हणतात, माते, आतां हा भक्तियोग उत्पन्न होण्याचीं साधनें कोणतीं तें सांगतों. निरिच्छपणें उत्तम रीतीनें स्वधर्माचें आचरण करावें, फारशी हिंसा[1] न करितां प्रतिदिवशीं परमेश्वरावर निष्कामबुद्धीनें श्रद्धा ठेवून भक्तिमार्गाच्या पञ्चरात्र इत्यादि शास्त्रांत सांगितलेल्या पद्धतीनें पूजा करावी ॥ १५ ॥ माझ्या मूर्ति इत्यादि स्थानांचें दर्शन करावें, त्यांना स्पर्श करून त्यांची पूजा आणि स्तुति करावी आणि त्यांना वंदन करावें. प्राणिमात्रांच्याहि ठिकाणीं हीं परमेश्वराचींच स्वरूपें आहेत असा भाव ठेवून अन्तःकरण गंभीर राखावें आणि कोणत्याहि विषयावर आसक्ति ठेवूं नये ॥ १६ ॥ सत्पुरुषांचा चांगल्या रीतीनें आदर करावा, अनाथांवर दया करावी, आपल्याशीं समानशील असणाऱ्या लोकांशीं मैत्री ठेवावी आणि अहिंसा, सत्य इत्यादि यम व जपादि नियम यांचें पालन करावें ॥ १७ ॥ तसेंच आत्मस्वरूपाचें प्रतिपादन करणाऱ्या अशा शास्त्रांचें नित्य श्रवण करावें, माझ्या नामांचें उत्तम प्रकारें सदोदित कीर्तन करावें, कुटिलपणा करूं नये, सत्पुरुषाची संगति धरावी आणि मनांतील सर्व अहंकार सोडून द्यावा ॥ १८ ॥ माते, ह्या गुणांनीं आपलें मन शुद्ध करून जो माझ्या भागवतधर्माचें आचरण करितो, त्या पुरुषाचें निर्मळ अन्तःकरण माझे गुण कानीं पडतांच मजवर अनायासानें आसक्त होतें ॥ १९ ॥ जसें वायूच्या योगानें वाहून येणारा गन्ध आपल्या पुष्पादि स्थानावरूनच घ्राणेंद्रियाला आकर्षून घेतो, त्याप्रमाणें भक्ताचें अंतःकरण निर्विकार होऊन भक्तियोगांत रममाण होऊं लागलें म्हणजे तें परमेश्वराला वश करून घेतें ॥२०॥ माते, मी सर्व प्राण्यांचा आत्मा असल्यामुळें सर्व भूतांमध्यें नेहमीं आहेंच; असें असतांना मनुष्यानें माझी अवज्ञा करून मूर्तीची पूजा करणें म्हणजे माझा उपहास करणें होय ॥२१॥ सर्वसमर्थ असा मी सर्व भूतांमध्यें आत्मरूपानें वास करीत असतांना जो

---

झाले. ह्या नऊ भक्तीचे प्रत्येकीं आणखी श्रवण, कीर्तन, स्मरण, चरणसेवा, अर्चन, वंदन, दास्य, सख्य, आणि आत्मनिवेदन हे नऊ नऊ भेद आहेत. मिळून एकंदर भक्तीचे प्रकार ८१ होतात ( श्रीधर ).

* **सालोक्य** : मजबरोबर एका लोकीं राहणें; **सार्ष्टि** : माझ्यासारखीं ऐश्वर्यें भोगणें, **सामीप्य** : माझ्याजवळ असणें; **सारूप्य** : माझ्यासारखें रूप असणें.

१ म्हणजे यज्ञाव्यतिरिक्त हिंसा टाळून यज्ञांतील हिंसा ती हिंसा नव्हे असा धर्मशास्त्राचा समज आहे.

मनुष्य माझा अपमान करून मूर्खपणानें मूर्तीची पूजा करितो, तो भस्मामध्येंच होम करितो असें म्हटलें पाहिजे * ॥ २२ ॥ जो मानी पुरुष प्राण्यांवर वैरभाव ठेवून आपला आत्मा निराळा व दुसऱ्याचा आत्मा निराळा, अशी भेददृष्टि ठेवितो व दुसऱ्याच्या शरिरांत तरी मींच राहणारा असल्यामुळें दुसऱ्याचा द्वेष करतांना माझ्याशींच द्वेष करितो, त्याचें मन कधींहि शांति पावत नाहीं ॥ २३ ॥ हे निष्पाप माते, मनुष्यानें लहानमोठीं पुष्कळ द्रव्यें जमवून त्या सामग्रीच्या योगानें माझ्या प्रतिमेची पूजा केली, तरी, तो जर इतर प्राण्यांची अवहेलना करीत असेल तर त्या पूजेच्या योगानें मला मुळींच संतोष होत नाहीं ॥ २४ ॥ मी ईश्वर सर्व प्राण्यांच्या अन्तरामध्यें वास करणारा आहें, ह्या गोष्टीचें मनुष्याला जोंपर्यंत हृदयांत ज्ञान झालें नाहीं, तोंपर्यंत त्यानें स्वतःचीं वर्णाश्रमविहित अशीं कर्में करून मूर्ति इत्यादिकांच्या ठिकाणीं माझी पूजा करावी ॥ २५ ॥ परंतु जो मनुष्य आपल्यामध्यें आणि दुसऱ्यामध्यें स्वल्पसें तरी अन्तर मानितो, त्या भेददृष्टि मनुष्याला मी मृत्युस्वरूपी असें मोठें भय उत्पन्न करितो; म्हणून मनुष्यानें सर्व प्राणिमात्रांचे ठायीं माझें वास्तव्य आहे अशी भावना ठेवून दान, सत्कार, मैत्री व समदृष्टि ह्या साधनांच्या योगानें माझी आराधना करावी ॥ २६ ॥ २७ ॥ हे मङ्गलस्वरूपी माते, ( मान किंवा मैत्री, कमी अधिक प्रमाणानें कोणाशीं कसकशी करावी तें समजण्यासाठीं एकंदर पदार्थांच्या योग्यतेचें तारतम्य सांगतो, तें ऐक. ) निर्जीव प्राण्यांपेक्षा सजीव प्राणी श्रेष्ठ होत. त्यांच्यापेक्षां प्राणवायूच्या आधारानें जीवन पावणारे गवत इत्यादि पदार्थ अधिक योग्यतेचे होत. त्यांच्यापेक्षां सूर्यकमळ, पुष्पें इत्यादि ज्ञानवान् पदार्थ विशेष योग्यतेचे होत. त्यांच्यापेक्षां इन्द्रियरूपी साधनांनीं उदकाचें शोषण, प्राशन वगैरे करून जीवन करणारे वृक्ष व सामान्य जीवजंतु श्रेष्ठ होत ॥ २८ ॥ त्यामध्यें स्पर्श जाणणाऱ्या जीवांपेक्षां रस जाणणारे मत्स्य इत्यादि जीव श्रेष्ठ असून त्याहूनहि गंध जाणणारे भ्रमर इत्यादि जीव अधिक योग्यतेचे होत. त्यांहून शब्द जाणणाऱ्या सर्पादि जीवांची योग्यता विशेष आहे ॥ २९ ॥ त्यामध्येंहि रूपांचा भेद जाणणारे जीव वरिष्ठ पदवीचे असून ज्यांच्या मुखांत खालीं व वर दांत आहेत, असे जीव त्यांहूनहि वरचे समजावे. त्यांतहि अनेक पायांचे गोम इत्यादि जीव श्रेष्ठ असून चार पायांचे सिंह, हरिण इत्यादि त्यांहून उच्च होत आणि त्यांच्याहूनहि दोन पायांचे मनुष्यादि प्राणी अधिक श्रेष्ठ होत ॥ ३० ॥ दोन पायांच्या प्राण्यांपेक्षां ब्राह्मणादि चार वर्ण श्रेष्ठ असून त्या वर्णांत ब्राह्मण उत्तम होय. ब्राह्मणांमध्यें सुद्धां वेदपाठी वरच्या पदवीचा असून वेदार्थ जाणणारा त्याच्यापेक्षांहि अधिक योग्यतेचा होय ॥ ३१ ॥

* ज्वालायुक्त अशा अग्नींत आहुति टाकिली तरच ती सफल होते, भस्मांत टाकिली तर निष्फळ होते. तशी सर्वत्र समदृष्टि न ठेवतां केवळ मूर्तीची पूजा करीत राहणें निष्फळ होय.

अर्थ जाणणाऱ्यापेक्षां विचारपूर्वक संशय दूर करणारा श्रेष्ठ असून स्वतःचीं शास्त्रोक्त कर्में करणारा तर त्याहून अधिक योग्यतेचा होय; पण त्यापेक्षां सर्व संगपरित्याग करून राहणारा व स्वतः आचरण केलेल्या धर्माच्या फलाची इच्छा न करणारा पुरुष श्रेष्ठ होय. ॥ ३२ ॥ वैराग्यशील पुरुषापेक्षांहि जो स्वतःचीं सर्व कर्में, त्या कर्मांचीं फलें, व आपलें शरीरहि मला अर्पण करून माझ्याविषयीं मुळींच भेद ठेवीत नाहीं, तो श्रेष्ठ पुरुष होय. माते, ज्यानें स्वतःचा आत्मा व कर्में मला अर्पण केलीं, ज्याला कोणत्याहि प्रकारचा अभिमान नाहीं, व जो सर्वत्र समदृष्टि ठेवितो अशा पुरुषापेक्षां अधिक योग्यतेचा दुसरा श्रेष्ठ प्राणी माझ्या पाहण्यांत नाहीं ॥ ३३ ॥ हे देवहूति, ह्या सर्व प्राणिमात्रांच्या हृदयांत जीवकलेच्या रूपानें सर्वशक्तिमान् भगवानच वास करीत आहे, अशी बुद्धि ठेवून, त्यांचा मनुष्यानें योग्य आदर करावा आणि त्यांना वंदन करावें ॥ ३४ ॥ हे मनुकन्ये, भक्तियोग आणि अष्टाङ्गयोग हे तुला मीं निवेदन केले. ह्या दोहोंपैकीं कोणाचेंहि अनुष्ठान केलें तरी मनुष्य परमेश्वरस्वरूपाला प्राप्त होतो ॥ ३५ ॥ माते ! प्रकृति, पुरुष आणि अन्य तत्त्वें, हीं सर्व परिपूर्ण अशा षड्गुणैश्वर्य परब्रह्मयाचींच स्वरूपें आहेत व ह्यांनाच दैव असें म्हणतात आणि ह्या दैवापासूनच जन्म, मरण इत्यादि विविध गति प्राण्यांना मिळत असतात ॥ ३६ ॥ पदार्थांना भिन्न भिन्न स्वरूपें प्राप्त होण्याला कारणीभूत अशा परमेश्वरी स्वरूपालाच काल असें म्हणतात. ह्या कालापासूनच महत्तत्त्व आदिकरून तत्त्वांना आणि त्यांच्या अभिमानानें भेददृष्टि ठेवणाऱ्या प्राण्यांना भय उत्पन्न होतें ॥ ३७ ॥ सर्व पदार्थांचा आश्रयभूत असा जो काल, तो सर्व प्राण्यांच्या अंतरांमध्यें प्रवेश करून भूतांच्याच योगानें भूतांचा संहार करीत असतो, तोच हा काल प्राण्यांना आपल्या स्वाधीन ठेवणाऱ्या ब्रह्मदेव आदिकरून देवांवरहि वर्चस्व चालवितो. यज्ञांचें फल देणारा हाच असून विष्णु हें त्याचें नांव आहे ॥ ३८ ॥ त्याला कोणी आवडताहि नाहीं, तसेंच त्याला कोणी बांधवहि नाहीं. हा सर्वसंहार करणारा काल स्वतः सावध राहून सावध न राहाणाऱ्या लोकांमध्यें प्रवेश करतो आणि त्यांचा संहार करितो ॥ ३९ ॥ ह्या कालाच्या भीतीनें वायु वाहतो व सूर्य प्रकाश देतो. इन्द्र ह्याच्या भयानेंच वृष्टि करितो आणि नक्षत्रांचा समुदाय त्याच्या भीतीमुळेंच उदय पावतो ॥ ४० ॥ वनस्पति, औषधि व लता ह्या कालाच्या ताब्यांत असल्यामुळेंच आपापल्या ऋतूंत पुष्पें आणि फलें प्रसवतात ॥ ४१ ॥ त्याच्याच भीतीनें नद्या वाहतात, समुद्र आपल्या सीमेपेक्षां अधिक वाढत नाहीं व त्याच्या भयानेंच अग्नि प्रदीप्त होऊन पर्वतांसह पाण्यांत बुडून जात नाहीं ॥ ४२ ॥ ह्या आज्ञेवरूनच प्राण्यांना राहण्याकरितां आकाश जागा देतें व भूर्भुवादिक सात आवरणांनीं वेष्टित अशा लोकरूप आपल्या शरिराचा महत्तत्त्व विस्तार करितें ॥ ४३ ॥ ही स्थावर-जंगमात्मक सृष्टि ज्याच्या नियंत्रणांत आहे, ते सत्त्वादि तीन गुणांचे अभिमानी ब्रह्मादिक

देव, प्रत्येक युगांत जगाची उत्पत्ति, पालन व संहार करण्यासाठीं प्रवृत्त होतात, ते या कालाच्या भीतीनेंच ॥ ४४ ॥ तो काल जगाचा नाश करितो; परंतु त्याचा स्वतःचा नाश होत नाहीं. तो जगाला उत्पन्न करितो; पण स्वतः उत्पन्न होत नाहीं. तो विकाररहित असून लोकांच्या योगानें लोकांना उत्पन्न करितो व मृत्युरूपानें प्रत्यक्ष मृत्यूचा देखील संहार करितो ॥ ४५ ॥

## एकोणतिसावा अध्याय समाप्त

---

# अध्याय ३० वा

कपिलमहामुनि म्हणाले,—हे माते. काल मोठा बलाढ्य आहे. त्याच्यामुळें ह्या लोकांना अनेक अवस्था प्राप्त होतात. पण मेघ जसे वायूच्या योगानें इकडेतिकडे भ्रमण करीत असतांहि त्यांस वायूच्या पराक्रमाचें ज्ञान होत नाहीं, त्याप्रमाणें ह्या कालाचा प्रचंड प्रभाव लोकांना मुळींच समजत नाहीं. मनुष्य आपल्या सुखासाठीं मोठ्या प्रयासानें जी जी वस्तु संपादन करीत असतो, त्या त्या वस्तूचा हा सर्वसमर्थ काल नाश करीत असतो. असें झालें म्हणजे त्या वस्तूकरितां मनुष्य शोक करूं लागतो ॥ १ ॥ २ ॥ कारण आपला देह, स्त्रिया, पुत्र, आप्त इत्यादिक परिवारसुद्धां नश्वर असतांहि मन्दबुद्धि मनुष्य त्या देहाच्या संबन्धानें प्राप्त झालेलें घर, शेत, द्रव्य इत्यादिकांना अज्ञानानें शाश्वत मानीत असतो ॥ ३ ॥ ह्या संसारामध्यें प्राणी ज्या ज्या योनींत जन्माला येतो, त्या त्या योनींमध्यें त्याला सुखच वाटत असतें. वैराग्य मुळींच होत नाहीं ॥ ४ ॥ प्राणी प्रत्यक्ष नरकांत जरी राहत असला, तरी त्याला नरकसेवनानेंहि तेथें सुख वाटत असल्यामुळें त्याला आपण हा देह सोडून जावें, अशी इच्छा त्याला सहसा होत नाहीं. कारण तो ईश्वराच्या मायेनें पूर्ण मोहित झालेला असतो ॥ ५ ॥ स्वतःचें शरीर, स्त्री, पुत्र, घर, पशु आणि बन्धु यांच्याविषयीं त्याच्या मनांत मनोराज्यें चालत असून तो आपल्याला फार धन्य मानीत असतो ॥ ६ ॥ ह्या परिवाराचें पोषण कसें करावें, अशा चिन्तेनें त्याचें सर्वाङ्ग जळत असून त्याच्या अन्तःकरणांत वाईट विचार चालत असतात व तो मूर्ख तशा स्थितींतहि एकामागून एक अशीं सारखीं पापें करीतच असतो ॥ ७ ॥ व्यभिचारिणी स्त्रियांनीं एकांतस्थळीं पसरलेल्या मायाजालानें व बालकांच्या मधुर भाषणांच्या योगानें त्याचें अंतःकरण व इंद्रियें मोहित होतात ॥ ८ ॥ तरी गृहावर आसक्ति ठेवणारा पुरुष, कुटिल व्यवहारांनीं युक्त व दुःखांनीं भरलेल्या अशा आपल्या घरांत राहूनच आळस न करितां आलेल्या दुःखाचा प्रतिकार करीत त्यांतच सुख मानून राहतो ॥ ९ ॥ तो मोठमोठ्या घातुक कर्मांच्या योगानें इकडून तिकडून द्रव्य संपादून त्याच्या योगानें आपल्या स्त्रीपुत्रादिकांचें पोषण करितो; पण त्याला स्त्रीपुत्रादिकांनीं उपभोगून राहिलेल्या वस्तूंचाच उपभोग मिळत असल्यामुळें त्यांच्या पोषणानें त्याला स्वतः शेवटीं अधोगतीला जावें लागतें ॥ १० ॥ तो उपजीविकेसाठीं जो कांहीं व्यापारधंदा करितो, त्यांत तोटा झाला तरी तो पुनः तसा व्यापार करीतच राहतो व असें होतां होतां त्यांचा धंदा बुडत जाऊन लोभ मात्र अधिक वाढत जातो. त्याच्यांत शक्ति मुळींच राहत नाहीं. पण पूर्णपणें लोभाच्या आधीन झाल्यामुळें दुसऱ्याच्या द्रव्याचा अपहार करण्याची त्याला इच्छा होते ॥ ११ ॥ त्याचें भाग्यच हीन असल्यामुळें त्यानें कितीहि उद्योग केले तरी ते निष्फळ होतात, त्याची संपत्ति नाहीशी होते व त्याला कुटुम्बाचें पोषण करण्याचें

सामर्थ्य न राहिल्यामुळें, त्याच्या बुद्धीला मोह पडून तो कांहीं तरी विचार करीत उसासे टाकीत बसतो ॥ १२ ॥ अशा रीतीनें त्याच्या हातून आपल्या कुटुम्बाचें पोषण होईनासें झालें म्हणजे शेतकरी लोक जसे म्हाताऱ्या बैलाच्या खाण्यापिण्याची निगा ठेवीत नाहींत, त्याप्रमाणें त्याचे स्त्रीपुत्रादिक त्याचा पूर्वीप्रमाणें मान ठेवीत नाहींतसे होतात. इतकें झालें तरी त्याला मात्र वैराग्य उत्पन्न होत नाहीं. वार्धक्यानें त्याचें स्वरूप विद्रूप होतें व आज मरतो कीं, उद्यां मरतो अशा मरणोन्मुखस्थितीला येऊन तो पोंचतो. त्याच्या शरिरांत अनेक रोग उत्पन्न होतात, जठराग्नि प्रदीप्त राहत नाहीं व त्यामुळें आहार मंद होतो. त्याचा व्यवहार कमीकमी होऊं लागतो आणि मग त्यानें स्वतः ज्यांचें पूर्वी पोषण केलेलें असतें ते स्त्रीपुत्रादिक त्याचें कसें तरी पोषण करीत असतात. घर राखण्यासाठीं पाळलेल्या कुत्र्याच्या अंगावर भाकरीचा तुकडा टाकावा, त्याप्रमाणें स्त्रीपुत्रांनीं तिरस्कार-पूर्वक जवळ आणून ठेविलेलें अन्न खाऊन तो घरांत पडलेला असतो ॥ १३ ॥ १४ ॥ ॥ १५ ॥ प्राणवायु शरिरांतून निघून जात असल्यामुळें त्याचे डोळे बाहेर येत असतात. वायूच्या मार्गभूत अशा नाड्या कफानें दाटून येतात, खोकला आणि श्वास ह्या दोन्हींमुळें त्याला फार परिश्रम होतात आणि त्याच्या घशांत घुरघुर ध्वनि होऊं लागतो ॥ १६ ॥ अशा रीतीनें मृत्यूच्या पाशांत पूर्णपणें सांपडून तो निजलेला असतां त्याच्या सभोंवतीं त्याचे आप्त रडत असतात व ते त्याला हाका मारून बोलविण्याची खटपट करीत असतात; पण त्याला बोलवत नसतें ॥ १७ ॥ याप्रमाणें आपल्या कुटुम्बाचें पोषण करण्यांत ज्यानें आपलें शरीर लाविलें व इंद्रियें स्वाधीन करून घेतलीं नाहींत, त्या मनुष्याला अंतकाळीं अतिशय वेदना होतात. त्याची बुद्धि नष्ट होते व तो आपले स्त्रीपुत्रादिक रडत असतां मरण पावतो ॥१८॥ त्या वेळीं कावरेबावरे डोळे करून आलेले दोन भयंकर यमदूत त्याच्या दृष्टीस पडतात व त्यांना पाहून तो घाबरून जाऊन मलमूत्रोत्सर्ग करितो ॥ १९ ॥ जसे राजाचे दूत अपराधी मनुष्याला बांधून नेतात, त्याप्रमाणें ते दोघे यमदूत यातनेसाठीं तयार केलेल्या शरिरांत प्राण्यास घालून व त्याचा गळा पाशांनीं आंवळून, बलात्कारानें पुष्कळ लांब रस्त्यावर त्याला घेऊन जातात ॥ २० ॥ ते यमदूत त्याला मोठमोठ्या शिक्षांचें भय घालीत असल्यामुळें त्याचें हृदय फाटून जाऊन त्याच्या अंगाला कंप सुटतो. वाटेंत कुत्रीं त्याला फाडून खात असतातच. अशा स्थितींत त्याला आपण केलेल्या पापाचें स्मरण होऊन फार दुःख होतें ॥ २१ ॥ भूक आणि तहान यांनीं तो व्याकुळ होऊन जातो. सूर्य, वणवा आणि वायु ह्यांच्या उष्णतेनें रस्त्यावरील वाळू तापलेली असल्यामुळें तेथें बसण्यास जागा व पिण्यास पाणीहि त्याला मिळत नाहीं. चालतांना भाजून जाऊन तो अत्यंत अशक्त होतो व त्याच्यानें चालवत नाहीं; तरी यमदूत त्याच्या पाठीवर कोरडे ओढीत असल्यामुळें तो मोठ्या कष्टानें कसाबसा चालत असतो ॥ २२ ॥ थकून गेल्यामुळें तो वाटेंत जागोजाग पडतो व त्याला मूर्च्छाहि येते; पण तो पुनः उठतो. अशा रीतीनें यमदूत त्याला अंधाऱ्या व कठीण रस्त्यानें चालवीत यमपुरीला घेऊन जातात ॥ २३ ॥ यमनगरी पृथ्वीपासून नव्याण्णव हजार

योजनें लांब आहे. तेथें जीवाला चार किंवा सहा घटिकांत ते यमदूत घेऊन जातात आणि तेथें पोंचल्यावर त्याला विविध यातना भोगाव्या लागतात ॥ २४ ॥ त्याच्याभोंवतीं जळकीं लाकडें बांधून त्याचे अवयव पेटवून देतात व स्वतःच तोडलेलें किंवा क्वचित् दुसऱ्यानेंहि तोडून दिलेलें स्वतःचें मांस त्याला खावें लागतें ॥ २५ ॥ यमाच्या घरांतील कुत्रे आणि गिधाडें त्या प्राण्यांचीं आंतडीं, तो जिवंत असतांच बाहेर ओढून काढितात आणि सर्प, विंचू, डांस आदिकरून प्राणी त्याला चावून पीडा देतात ॥ २६ ॥ तेथें यमदूत ह्या प्राण्याचे क्रमानें अवयव तोडतात, हत्ती आदिकरून प्राण्यांकडून त्याच्या शरिराचे तुकडे करितात, पर्वताच्या शिखरावरून त्याला खालीं लोटितात, पाण्यांत बुडवितात आणि खाड्यांतहि पुरतात ॥ २७ ॥ तो जीव पुरुष असो किंवा स्त्री असो, एकमेकांच्या आसक्तीमुळें तामिस्र, अंधतामिस्र, रौरव आदि नरकांतील यातना स्वतःच निर्माण करतो व यमलोकीं त्या भोगितो. माते, ह्या लोकांतच स्वर्ग आणि नरक आहे असें विद्वान् लोक म्हणतात. नरकांत ज्या यातना आहेत त्या ह्या पृथ्वीवर देखील दिसून येतात ॥ २८ ॥ २९ ॥ माते, याप्रमाणें प्राणी कुटुम्बभरण करीत असो किंवा आपलें स्वतःचें उदरंभरण करीत असो, त्याला आपलें कुटुम्ब आणि उदर या दोन्हींना ह्या लोकींच सोडून देऊन परलोकीं जावें लागतें आणि तेथें स्वतः केलेल्या पापाचें फल भोगावें लागतें ॥ ३० ॥ प्राण्यांचा द्रोह करून जीव ज्या शरिराचें पोषण करितो, तें आपलें शरीर ह्या लोकांतच त्याला सोडावें लागतें आणि आपलें पाप मात्र वाटेंत उपयोगासाठीं बरोबर घेऊन त्याला एकट्याला अंधतामिस्र नरकांत पडावें लागतें ॥ ३१ ॥ हे देवहूति, पुरुषानें आपल्या कुटुम्बपोषणासाठीं जें जें पाप केलें असेल, तें तें त्याचें प्रारब्ध त्याच्या जवळ आणून पोंचवीत असतें आणि मनुष्याचें द्रव्य नाहींसें झालें असतां जसा तो उद्विग्न होतो, त्याप्रमाणें नरकांत गेल्यावर विचारमूढ होऊन तो त्या पापाचें फल भोगूं लागतो ॥ ३२ ॥ जो जीव केवळ अधर्मानेंच आपल्या कुटुम्बाचें पोषण करण्यांत निमग्न असतो, त्याला नरकांतील शेवटचें स्थान जो अंधतामिस्र नांवाचा नरक त्यांतच पडावें लागतें ॥ ३३ ॥ मनुष्यशरिराच्या खालच्या प्रतीच्या ग्रामसूकर आदिकरून योनींमध्यें जन्म घेणें म्हणजे त्या एक प्रकारच्या यातनाच होत. त्या क्रमाक्रमानें भोगून प्राणी शुद्ध होतो आणि पुनः ह्या मनुष्यदेहाला प्राप्त होतो ॥ ३४ ॥

**तिसावा अध्याय समाप्त**

---

# अध्याय ३१ वा

भगवान् कपिलमुनि म्हणाले—माते, प्राण्याला शरीर प्राप्त होण्याला कारण त्याचें पूर्वजन्मींचें कार्य होय.त्याचा प्रेरक परमेश्वरच असून त्याच्या फलप्राप्तीची वेळ आली म्हणजे जीव त्या पुरुषाच्या वीर्यकणाच्या आधरानें स्त्रीच्या उदरांत प्रवेश करितो ॥ ॥ पहिल्या रात्रीं पुरुषाचें रेत आणि स्त्रीचें रुधिर यांचें मिश्रण होतें, त्याला 'कलल' असें म्हणतात. पांच रात्रीं लोटल्यावर त्याचा एक बुडबुडा तयार होतो. दहा दिवसांनीं त्याचा बोरासारखा कठिण गोळा तयार होतो व त्याच्यापुढें म्हणजे एक महिन्याच्या आंत मांसाच्या पिण्डासारखा त्याचा आकार होतो व जर तें रेत पक्ष्याच्या योनीमध्यें असेल तर त्याचें अण्डें होतें ॥ २ ॥ एका महिन्यानें त्याला मस्तक उत्पन्न होतें, दोन महिन्यांनीं हात, पाय आदिकरून अवयव उत्पन्न होतात, तीन महिन्यानंतर नखें, लव, हाडें आणि त्वचा हीं उत्पन्न होतात आणि तो गर्भ जर पुरुषाचा असेल तर लिङ्ग आणि स्त्रीचा असेल तर योनिच्छिद्र अशीं उत्पन्न होतात. ॥ ३ ॥ चार महिन्यांनीं त्या गर्भांत मांसादिक सप्त धातु उत्पन्न होतात व पांच महिन्यांनीं क्षुधा, तृषा ह्यांची उत्पत्ति होऊन, सहा महिन्यांनीं तो गर्भ आवरणानें वेष्टिलेला असा उजव्या कुशींत फिरूं लागतो ॥४ ॥ नंतर ज्या अन्नोदकांचें माता भक्षण व प्राशन करीत असेल त्यांच्या योगानें त्या गर्भाच्या सप्त धातु उत्तरोत्तर वाढत जातात. मातेचें उदर म्हणजे विष्ठा आणि मूत्र यांनीं भरलेला एक खड्डाच होय. त्यांतच त्या प्राण्याची उत्पत्ति होत असते. त्यांत राहणें त्याला आवडत नसतें; पण करतो काय ? निरुपायास्तव तेथेंच तो पडून राहतो ॥ ५ ॥ तेथील भुकेलेले कृमि त्याच्या सर्वांगाला वारंवार टोंचीत असतात, त्यामुळें प्राण्याला फार क्लेश होऊन क्षणोक्षणीं तो मूर्च्छित होतो ॥ ६ ॥ कडु, तिखट, उष्ण, खारट, रूक्ष, आंबट आदिकरून जे जे पदार्थ माता भक्षण करिते, ते ते ह्या प्राण्याच्या अंगाला लागतात व यांचा स्पर्श ह्याच्या सर्वाङ्गाला वेदना देऊं लागतात ॥ ७ ॥ ह्याच्यावर प्रथम गर्भाशयाचें आवरण असून बाहेरून आणखी आंतड्यांचें वेष्टन असतें;त्याची पाठ आणि मस्तक द्रोणासारखीं वांकलेलीं असतात व तो कुशींत डोकें ठेवून तेथें पडून असतो ॥ ८ ॥ पिंजऱ्यांतील पक्ष्याप्रमाणें तेथें त्याला आपले अवयव देखील हलविण्याचें सामर्थ्य नसतें. अशा वेळीं दैवाच्या योगानें स्मरणशक्ति प्राप्त होऊन त्या योगानें त्याला शेकडों जन्मांत केलेलीं कर्मे आठवतात. त्याला तेथें लांब उच्छ्वास न टाकतांच राहावें लागत असल्यामुळें त्या स्थितींत त्याला सुख मिळत असेल काय ? ॥ ९ ॥ सातव्या महिन्याला आरंभ झाल्यावर त्याला ज्ञान उत्पन्न होतें; पण प्रसूतिवायूच्या योगानें तो सारखा कांपत असतो. त्यामुळें त्या उदरांत उत्पन्न झालेल्या विष्टेंतील किड्याप्रमाणें तो एका ठिकाणीं स्थिर न राहतां इकडेतिकडे फिरत असतो ॥ १० ॥ त्याला त्या वेळीं देह व आत्मा ह्या दोन्हींचें ज्ञान झालेलें असतें, त्यामुळें त्याला आपल्या

स्थितीबद्दल पश्चात्ताप होतो. सप्त धातूंच्या बंधनानें बद्ध झाल्यामुळें तो भिऊन जातो आणि हात जोडून ज्या परमेश्वरानें आपल्याला उदरांत घातलें, त्या परमेश्वराची सगद्गदित वाणीनें स्तुति करूं लागतो ॥ ११ ॥

जीव म्हणतो मला दुष्टाला अशा प्रकारची गर्भवासरूप गति ज्यानें दिली व शरण आलेल्या पृथ्वीचें रक्षण करण्याच्या इच्छेनें ज्या परमेश्वरानें अनेक अवतार धारण केले, त्या परमेश्वराच्या, सर्वतोपरि अभय देणाऱ्या अशा पृथ्वीवर चालणाऱ्या, चरणकमलाला, मी शरण आलों आहें ॥ १२ ॥ परमेश्वरा, मातेच्या शरिरांत भूतें, इंद्रियें व अंतःकरण ह्या रूपानें परिणाम पावलेल्या मायेचा आश्रय केल्यामुळें माझें स्वरूप कर्मांनीं वेढून गेलें व मी या ठिकाणीं बांधल्यासारखा होऊन पडलों आहें. यास्तव अत्यंत शुद्ध, विकार न पावणाऱ्या, अखंड ज्ञानानें युक्त आणि सर्वतोपरी होरपळलेल्या हृदयांतच ज्यांचें निश्चित ज्ञान होतें, त्या तुला मीं नमस्कार करतों ॥ १३ ॥ परमेश्वरा, पंचमहाभूतांपासून उत्पन्न झालेल्या शरीरांत मी आच्छादिलेला आहें; पण वस्तुतः त्या शरिरापासून मीं वेगळाच आहें. अज्ञानामुळेंच इंद्रियें, सत्त्वादि गुण, शब्दादि विषय व चिदाभास हीं माझीं स्वरूपें झालीं आहेत, तथापि त्यांच्या योगानें ज्याच्या माहात्म्याचा लोप होत नाहीं, अशीं जीं प्रकृति व पुरुष त्यांच्याहिपेक्षां श्रेष्ठ असा जो सर्वज्ञ पुरुष, त्याला मीं नमस्कार करितों ॥ १४ ॥ परमेश्वराच्या मायेच्या योगानें प्राण्याला स्वरूपाची विस्मृति झाली म्हणजे तो सत्त्व, रज व तम ह्या तीन गुणांच्या स्वाधीन होऊन जीं कर्में करितो, तींच त्याला ह्या संसाररूपी मार्गांत बंधन पावण्याला कारण होतात व मग तो संसारांत क्लेश भोगीत फिरूं लागतो. अर्थात् त्या परमेश्वराच्या अनुग्रहावांचून दुसऱ्या कोणत्या उपायानें प्राण्याला आपल्या स्वरूपाची पुनःप्राप्ति होईल बरें ? ॥ १५ ॥ मला जें हें सध्यां त्रिकालज्ञान झालें आहे तें त्या परमेश्वराशिवाय दुसरा कोणता पुरुष उत्पन्न करून देईल बरें ? तें ज्ञान देणारा ईश्वर, स्थावरजंगमात्मक सृष्टीमध्यें अन्तर्यामिरूपानें आपला अंश ठेवून राहत असतो. यास्तव जीवरूपानें कर्ममार्गांत येऊन पोचलेले आम्ही त्रिविध तापाच्या नाशासाठीं त्या परमेश्वराचें भजन करितों ॥ १६ ॥ परमेश्वरा, मातेचें उदर म्हणजे रक्त, विष्ठा व मूत्र यांची विहीरच होय. या उदररूपी गुहेंत जठराग्नीच्या योगानें माझा देह अतिशय संतप्त झाला असून येथून बाहेर पडण्याच्या आशेनें मी आपले महिने मोजीत राहिलों आहें; माझी बुद्धि अगदीं दीन झाली आहे. तरी हे देवा, देहधारी मी येथून केव्हां बाहेर पडेन बरें ? ॥ १७ ॥ हे ईश्वरा, तूं फार दयाळू व अनाथांचें रक्षण करणारा आहेस. ज्या तूं केवळ दहा महिन्यांच्या ह्या जीवाला एवढें ज्ञान प्राप्त करून दिलेंस, त्या तुला केवळ स्वतःच्या या कृतीनेंच संतुष्ट झालें पाहिजे. कारण या तुझ्या उपकारांबद्दल हात जोडून प्रार्थना करण्यापलीकडे कोणी झालें तरी दुसरें काय करूं शकेल ? ॥ १८ ॥ परमेश्वरा, हा सप्त धातूंच्या बन्धनांनीं बांधला गेलेला दुसरा पशु, पक्षी इत्यादि जीव केवळ स्वतःच्या शरिरामध्यें उत्पन्न होणारीं सुखःदुखें मात्र जाणतो; पण तूं दिलेल्या बुद्धीच्या योगानें माझ्या

शरिरांत शम, दम आदिकरून गुण प्राप्त झाले आहेत व त्यामुळें अहंकाराच्या आश्रयानें राहणारा जीव जसें तुझें रूप प्रत्यक्ष पाहतो, त्याप्रमाणें मीहि अनादि भगवंताला हृदयांत आणि बाहेर जणू काय साक्षात् पाहत आहें ॥१९॥ हे विश्वव्यापका परमेश्वरा, ह्या गर्भवासामध्यें मी पराकाष्ठेच्या दुःखानें राहत आहें,तरी त्या गर्भातून बाहेर पडण्याची मला इच्छा होत नाहीं कारण बाहेर संसाररूपी अंधारी विहीर आहे. जीव तेथें प्राप्त झाला कीं, देवा,नसता भ्रम उत्पन्न करणारी तुझी माया त्याला व्यापून टाकिते,आणि तिच्या मागोमाग हें संसारचक्रहि त्याच्या मागें लागतें ॥ २० ॥ यास्तव देवा, मी तेथेंच राहीन आणि हृदयांत तुझ्या चरणांचें ध्यान करून मी आपलें दुःख विसरून जाईन. मग स्वतःलाच साहाय्यकारी करून स्वतःचा या संसाररूपी अज्ञानांतून उद्धार करीन व तेणेंकरून ह्या गर्भवासरूप अनेक छिद्रांनीं भरलेल्या दुःखामध्यें मला पुनः यावें लागणार नाहीं ॥ २१ ॥

कपिलमहामुनि म्हणाले–माते,याप्रमाणें आपल्या बुद्धीचा निश्चय करून दहा महिन्यांचा तो गर्भस्थ जीव परमेश्वराची स्तुति करीत आहे, तोंच खालीं तोंड करून असलेल्या त्याला प्रसूतिवायु बाहेर पाडण्यासाठीं ढकलूं लागतो ॥ २२ ॥ प्रसूतिवायूनें ढकलल्यावर तो जीव व्याकुळ होतो, त्याचा उच्छ्वास बंद होतो, स्मृति नष्ट होते आणि खालीं मस्तक करून मोठ्या कष्टानें तो एकाएकीं बाहेर पडतो ॥ २३ ॥ बाहेर येऊन भूमीवर पडला असतां विष्ठेंतील किड्याप्रमाणें तो रक्तांत व मूत्रांत लोळूं लागतो आणि गर्भवासांत असतांना त्याला जें उत्तम ज्ञान होतें तें नष्ट झाल्यामुळें, त्याची स्थिति फार चमत्कारिक होऊन तो अतिशय रडूं लागतो ॥ २४ ॥ तेव्हां त्या बालकाचें पोषण करणाऱ्या लोकांना त्याच्या मनांतील अभिप्राय समजत नाहीं. त्यामुळें त्याला हवें असेल तें त्याला प्राप्त होत नाहीं व नको असलेल्याचा प्रतिकारहि करतां येत नाहीं ॥ २५ ॥ त्याला घाणेरड्या अंथरुणावर निजवितात. त्यांत घामापासून उत्पन्न होणारे ढेंकूण, पिसा इत्यादि प्राणी त्याला चावतात; पण त्याला आपलें अंग खाजविण्याचें सामर्थ्य नसतें. त्याच्यानें बसवत नाहीं, उठवत नाहीं, फार काय, पण हालवत सुद्धां नाहीं ! ॥ २६ ॥ गर्भांत उत्पन्न झालेलें त्याचें ज्ञान बाहेर आल्याबरोबर नष्ट झालेलें असतें, त्यामुळें तो रडत असतो. अशा स्थितींत मोठे किडे लहान किड्यांना जसे टोंचतात, त्याप्रमाणें डांस, माशा, ढेंकूण आदिकरून प्राणी त्याच्या कोमल शरिराला दंश करीत असतात ॥ २७ ॥ ह्याप्रमाणें बाल्यावस्थेंतील, तसेंच तिच्या पुढील अर्धवट तरुण अवस्थेंतील दुःख भोगिल्यावर, आपल्याला पाहिजे ती वस्तु न मिळाल्यामुळें प्राणी शोकानें व्याकुळ होतो आणि अज्ञानामुळें अतिशय क्रोधी बनतो ॥ २८ ॥ नंतर तारुण्यांत प्राण्याला कामपीडा होऊं लागते. त्याच्या शरिराबरोबर अहंकार व क्रोध हेहि वृद्धिंगत होतात व तो त्यामुळें इतर कामी जनांशीं वैरभाव करूं लागून स्वतःच्या नाशाची जणूं सिद्धताच करितो ॥ २९ ॥ त्या अज्ञानी मनुष्यांची बुद्धि अगदीं बिघडून जाते, तो भलभलते आग्रह धरितो आणि वास्तविक पंचमहाभूतांपासून उत्पन्न झालेल्या देहावर मी व माझा असा अभिमान सतत बाळगूं लागतो ॥ ३० ॥ अज्ञान व पूर्वजन्मार्जित कर्म या दोहोंच्या बन्धनांनीं जखडलेला

ह्या देह प्राप्त झाला असतां तो गर्भवासादि अनेक दुःखें देत असतो. असें असतांहि प्राणी त्याच्याच संगोपनाकरितां कर्में करीत असतो व त्या कर्मानें बद्ध होऊन पुनः संसारांत येऊन पडतो ॥ ३१ ॥ प्राणी जर शिश्न व उदर यांच्या तृप्तीसाठीं अनेक दुष्ट उद्योग करून त्यांच्या मार्गांत रमूं लागेल, तर त्याला पूर्वीं सांगितल्याप्रमाणें नरकांत पडावें लागतें. कारण दुष्ट मार्गांत पडणाऱ्यांच्या संगतीमुळें सत्य, शुद्धता, दया, मौन, बुद्धि, संपत्ति, लज्जा, कीर्ति, सहनशीलता, इन्द्रियनिग्रह, मनोनिग्रह व ऐश्वर्य हे गुण अगदीं नाहींसे होतात ॥ ३२ ॥ ३३ ॥ त्या मूर्ख लोकांमध्यें शांति मुळींच नसते. त्यांची बुद्धि अगदीं आकुंचित असते. स्त्रियांना ते खेळांतील हरिणासारखे झालेले असल्यामुळें त्यांची कींव करावी; पण त्यांच्याशीं संगति अगदीं करूं नये ॥ ३४ ॥ स्त्रियांच्या संगतीनें किंवा त्यांचा समागम करणाऱ्या विषयलंपट पुरुषांच्या संगतीनें जसा ह्या पुरुषाला मोह आणि बन्ध प्राप्त होईल, तसा इतर कोणाच्याहि संगतीनें होणार नाहीं ॥ ३५ ॥ पाहा, प्रत्यक्ष तो ब्रह्मदेव देखील आपल्या कन्येचें रूप पाहून वेडा झाला आणि तिनें हरिणीचें रूप धारण केलें आहे असें पाहून निर्लज्जपणें आपणहि हरिण झाला आणि तिच्या मागून धावूं लागला ॥ ३६ ॥ ही जर प्रत्यक्ष ब्रह्मदेवाची स्थिति, तर, त्यानें उत्पन्न केलेल्या मरीचिप्रभृति प्रजापतींची, त्या प्रजापतींनीं उत्पन्न केलेल्या कश्यप आदिकरून ऋषींची आणि त्यांपासून उत्पन्न झालेल्या मनुष्य इत्यादिकांची काय कथा ? ह्या जगांत स्त्रीरूपमायेनें ज्याची बुद्धि मोहित झाली नाहीं, असा नारायण ऋषीवांचून कोणता पुरुष आहे ? ॥ ३७ ॥ माते, ह्या माझ्या स्त्रीरूप मायेचें सामर्थ्य पाहा ! ती नुसत्या आपल्या भ्रकुटिविक्षेपानें दशदिशा जिंकिणाऱ्या महावीरांचीहि पायमल्ली करून सोडते ॥ ३८ ॥ याकरितां माझ्या सेवेच्या योगानें आत्मस्वरूपाचा लाभ करून घेऊन योगाचें उत्तम फल प्राप्त करून घेण्याची इच्छा ज्याला असेल, त्या पुरुषानें ह्या स्त्रियांची संगति केव्हांच करूं नये. कारण स्त्रिया म्हणजे मुमुक्षु पुरुषाला नरकांत नेण्याचें द्वारच होत, असें विद्वान् लोक म्हणतात ॥ ३९ ॥ देवानें निर्माण केलेली प्रत्यक्ष माया म्हणजे स्त्री होय. ही हळूहळू पुरुषाजवळ येत असते; पण तोंडावर गवत पसरलेल्या विहिरीवर पाय दिला असतां जशीं प्राणाशीं गांठ पडते, त्याप्रमाणें स्त्री म्हणजे आपला मृत्यूच आहे असें समजावें ॥ ४० ॥ ( स्त्रीसंबंधानें पुरुषानें जशी बुद्धि धरावी म्हणून सांगितलें, तीच बुद्धि स्त्रीनें पतीसंबंधानें धरिली पाहिजे. पति तरी मायेनेंच केलेला. स्त्री आणि पति हे दोन्ही जीवच होत. ) पूर्वजन्मींच्या स्त्रीविषयक आसक्तीमुळेंच जीवाला या जन्मीं स्त्रीत्व आलेलें असतें. यास्तव पुरुषरूप धारण केलेल्या ज्या माझ्या मायेला तो जीव मोहामुळें पति असें समजतो, तिला त्यानें वास्तविक गवतानें आच्छादिलेल्या खड्डयाप्रमाणें आपला घात करणाराच समजलें पाहिजे ॥ ४१ ॥ जसें पारधी अरण्यांत हरणाला मोह घालण्याकरितां मधुर गायन करितो, त्याप्रमाणें आपल्याला भुरळ पाडण्याकरितांच दैवानें पति, अपत्यें, गृह आदिकरून वस्तु प्राप्त करून दिल्या आहेत. ह्या केवळ जीवाचा घात करण्यासाठींच होत असें समजावें ॥ ४२ ॥ माते, जीवाचा उपाधि जो लिङ्गदेह त्याच्या योगानें

जीवाला एका लोकांतून दुसऱ्या लोकीं जातां येतें. तेथें तो जीव आपल्या कर्मांचीं फलें भोगीतच असतो आणि एकामागून एक अशीं सारखीं कर्में करितो ॥ ४३ ॥ ह्या आत्म्याच्या अनुरोधानें चालणारा जीवाचा उपाधि लिङ्गदेह व भूतें, इंद्रियें व मन या स्वरूपाचा स्थूल देह, या दोन्हीं देहांचीं कार्यें बंद होणें म्हणजेच जीवाचें मरण होय आणि ते दोन्ही देह पुनः प्रगट होऊन कार्यप्रवृत्त होणें म्हणजे त्याचा जन्म होय ॥४४॥ घटापटादि भिन्न भिन्न वस्तूंच्या अनुभवाचें स्थान जें शरीर त्याची वस्तूला पाहण्याची शक्ति नष्ट झाली म्हणजे लिङ्गदेह आपलें काम करण्यास अयोग्य ठरतो व या स्थितीलाच जीवाचें मरण असें म्हणतात. तसेंच हें स्थूल शरीर मी आहें असा जीवाला अभिमान उत्पन्न होऊन तें शरीर विषयांचें ग्रहण करूं लागलें म्हणजे जीव जन्मास आला असें म्हणतात ॥ ४५ ॥ याला उदाहरण, मनुष्याचे नेत्रगोलक बिघडून पदार्थांना पाहण्याची त्यांची शक्ति जेव्हां नष्ट होते, तेव्हां चक्षुरिन्द्रियाचीहि शक्ति नष्ट होते आणि ह्या दोघांची शक्ति नष्ट झाली म्हणजे पाहणाऱ्या जीवाचीहि पाहण्याची शक्ति नष्ट झाली असें होतें ॥ ४६ ॥

यास्तव मनुष्यानें मरणाचें दुःख करूं नये, जीवन कसें चालेल याबद्दल दैन्य करूं नये व जीवनासाठीं व्याकुळहि होऊं नये, तर धैर्यानें जीवाच्या गतीचें ज्ञान करून घेऊन सर्वसंगपरित्यागपूर्वक पृथ्वीवर संचार करावा ॥ ४७ ॥ योगाभ्यास व वैराग्य यांनीं युक्त अशी आपली बुद्धि मनुष्यानें केली म्हणजे ती उत्तम प्रकारें विचार करण्यास योग्य होईल. मग विचारशील अशा त्या बुद्धीच्या साहाय्यानें मायेनें निर्मिलेल्या ह्या जगामध्यें आपलें शरीर ठेवून त्यानें खुशाल संचार करावा ॥ ४८ ॥

**एकतिसावा अध्याय समाप्त**

---

# अध्याय ३२ वा

---

कपिलमुनि देवहूतीला म्हणाले,—परंतु जो पुरुष घरांतच राहून गृहस्थधर्माचेंच आचरण करितो, आणि गृहस्थाश्रम धर्मापासून भोग्य वस्तु आणि ऐश्वर्य यांची प्राप्ति करून घेतो, तो पुनःपुनः त्याच धर्माच्या आचरणांत सांपडतो ॥ १ ॥ आणि भोग्य वस्तूंनीं तो मोहून गेल्यामुळें भागवतधर्मापासून पराङ्मुख होऊन केवळ देव आणि पितर यांची मात्र यज्ञयागादिकांच्या साधनानें श्रद्धापुरःसर पूजा करतो ॥ २ ॥ मग त्या श्रद्धेमुळें त्याची बुद्धि सहजच व्यापून जाते आणि तो पुरुष पितर आणि देव यांचीं व्रतें तेवढीं करून यज्ञांत सोमपान करतो. माते, असा पुरुष चंद्रलोकास जाऊन यज्ञाचें फळ भोगतो आणि तें संपल्यावर पुनः या मृत्युलोकांत येऊन पडतो ॥ ३ ॥ गृहस्थाश्रमी लोकांना प्राप्त होणारे जे हे चंद्रादि लोक आहेत, ते अक्षय नाहींत. भगवान् श्रीविष्णु जेव्हां आपल्या शेषशय्येवर शयन करतात, तेव्हां ते चंद्रादि लोक लय पावतात ॥ ४ ॥ पण जे धैर्यशाली पुरुष विषयांवरील आसक्ति सोडून, कर्मांचाहि त्याग करतात आणि अत्यंत शांतवृत्तीनें होऊन अन्तःकरणाची शुद्धि करतात, त्यांचें स्वधर्माचरण भोग्यवस्तु आणि ऐश्वर्य यांच्या प्राप्तीसाठीं नसतें; ते निवृत्तीमुळें प्राप्त झालेलें पुण्य तेथें भोगितात व धर्मांत रमून जाऊन देहादिकांवरील माझेंपण सोडतात आणि निरहंकार होऊन आपल्या निष्काम कर्माचरणाच्या सामर्थ्यानें चित्तशुद्धि करितात. त्यामुळें देहत्यागानंतर ते स्थावरजंगमाचें मूळ कारण आणि त्याची उत्पत्ति व लय करणारा असा जो परिपूर्णस्वरूपी परमात्मा त्याच्याच सूर्य-लोकाच्या मार्गानें जाऊन पोंचतात ॥ ५ ॥ ६ ॥ ७ ॥ ब्रह्मदेवाचे दोन परार्ध लोटल्यावर त्याचा जो प्रलयकाल येतो, त्या काळापर्यंत हिरण्यगर्भरूपानें परब्रह्माचें ध्यान करणारे हे पुरुष त्या हिरण्यगर्भाच्याच लोकांत वास करतात ॥ ८ ॥ त्या वेळीं त्रिगुणात्मक असा तो श्रेष्ठ ब्रह्मदेव आपल्या अधिकाराचा परार्धनामक कालपावेतों अनुभव घेऊन, पृथ्वी आदिकरून भूतें, मन, इन्द्रियें, अहंकार इत्यादिकांनीं युक्त अशा या ब्रह्मांडाची आवरा-आवर करून अव्यक्त अशा ईश्वरस्वरूपांत विलीन होऊन जातो ॥९॥ तेव्हां ते वैराग्यशील योगी, प्राण आणि मन यांच्यावर विजय मिळवून इतक्या दूरवर जाऊन ब्रह्मलोकीं भगवंताचें ध्यान करीत राहिलेले असतात, तेहि त्या ब्रह्मदेवाबरोबर अमृतब्रह्मरूपी अशा त्या श्रेष्ठ आदिपुरुषांत अंतर्धान पावतात. त्यापूर्वी मात्र त्यांना तसें करतां येत नाहीं. कारण तोंपर्यंत त्यांचा अभिमान नष्ट झालेला नसतो ॥ १० ॥ यास्तव, हे तेजस्वी माते, सर्व प्राण्यांच्या अंतःकरणांत वास करणाऱ्या त्या परमात्म्यालाच तूं भक्तिपूर्वक शरण जा. त्याचा महिमा तूं माझ्यापासून ऐकिला आहेसच ॥ ११ ॥ ब्रह्मदेवालाहि पुनर्जन्म आहे. तो स्थिरचरसृष्टीच्या आधीं उत्पन्न झाला असला व वेदज्ञान त्याच्या उदरांत सांठविलेलें असलें, तरी मी सृष्टिकर्ता आहें, या अभिमानामुळें आणि परमात्म्यापासून आपण वेगळे

आहों, या बुद्धीमुळें त्याच्या निष्काम कर्माला न जुमानतांहि तो सर्व ऋषि, योगी, सनत्कुमारादि योगमार्गप्रवर्तक सिद्ध पुरुष, यांसहवर्तमान सगुण ब्रह्मस्वरूपी आदिपुरुषाला प्रथम प्राप्त होतो आणि मग ईश्वरस्वरूपी काळाच्या योगानें जेव्हां सत्त्वादि तीन गुणांचें मिश्रण होऊं लागतें, तेव्हां तो पुनः पूर्वीप्रमाणेंच उत्पन्न होतो ॥ १२ ॥ १३॥ ॥ १४ ॥ आपल्या निष्काम धर्माचरणामुळें ते मरीचिप्रभृति ऋषि कांहीं काळ ब्रह्मदेवा-बरोबर तेथील ऐश्वर्याचा उपभोग घेतात; परंतु सत्त्वादि गुणांचें पुनः परस्पर मिश्रण होऊं लागलें म्हणजे तेहि फिरून जन्मास येतात ॥ १५ ॥ पण जे कोणी कर्माच्या ठिकाणीं आसक्त राहून, ज्यांचा निषेध केलेला नाहीं अशीं काम्य कर्में व विविध अशीं नित्य कर्में सर्वतोपरि श्रद्धा ठेवून नित्य करतात, त्यांचें मन रजोगुणानें भारून गेलेलें असतें. ते भोगासक्त होऊन इंद्रियांच्या स्वाधीन होतात आणि गृहादिकांच्या ठिकाणीं मनःपूर्वक आनंद मानून प्रत्यहीं पितरांची उपासना करतांना आढळतात ॥ १६ ॥ १७ ॥ त्यांची दृष्टि धर्म, अर्थ आणि काम या तीनच पुरुषार्थांवर असल्यामुळें संसारनाश करणाऱ्या आणि वर्णनीय पराक्रमी अशा भगवान् मधुसूदनाच्या कथांकडे ते पाठ फिरवितात ॥ १८ ॥ खरोखरच असे पुरुष म्हणजे अत्यंत अभागी होत. भगवंताच्या अमृतासमान मधुर कथा सोडून जे अकल्याणकारक अशा कथाच ऐकत बसतात, ते विष्ठा भक्षण करणाऱ्या डुकरां-प्रमाणेंच होत ॥ १९ ॥ ते सूर्याच्या दक्षिणायन मार्गानें पितृलोकास जातात, आणि नंतर उत्तरक्रियेपर्यंतचे सर्व संस्कार करीत असल्यामुळें आपल्या पुत्रादिकांच्याच वंशांत पुनः जन्मास येतात ॥ २० ॥ हे साध्वि देवहूति, पितृलोकीं गेल्यावर त्यांनीं येथें संपादन केलेल्या पुण्याचें फल भोगिलें म्हणजे देव त्यांच्या उत्कर्षाचें साधन नाहींसें करतात, व अशा रीतीनें अनाथ होऊन ते फिरून मृत्युलोकीं येऊन पडतात ॥ २१ ॥ हे देवहूति, यास्तव तूं मोठ्या प्रेमानें त्या परमश्रेष्ठ भगवंताचेंच भजन कर. भक्तीला खरा आश्रय त्यांच्याच गुणांचा असून, त्याच्या चरणकमलाचें जितकें वर्णन करावें तितकें थोडेंच होणारें आहे ॥ २२ ॥ भगवान् वासुदेवाच्या ठिकाणीं प्रेमयुक्त भक्ति ठेविली असतां, विषयांविषयीं तत्काळ वैराग्य उत्पन्न होऊन ब्रह्मसाक्षात्कार करून देणारें असें ज्ञानहि प्राप्त होतें ॥ २३॥ माते, विषय तेथून सर्व सारखेच असतात, परंतु इंद्रियांच्या आवडीनिवडी-प्रमाणें अमुक प्रिय आणि अमुक अप्रिय असें मनुष्य म्हणतो; पण भक्त जेव्हां अशा प्रकारचा भेदभाव धरीत नाहींसा होतो, ॥ २४ ॥ तेव्हांच त्याच्या शुद्ध झालेल्या अंतः करणाच्या योगानें गुणांपासून अलिप्त असलेल्या व सर्वत्र समस्वरूपानें दिसणाऱ्या आत्म-स्वरूपाचें त्याला दर्शन होतें, आणि ज्यांत त्याज्य किंवा ग्राह्य असा भेद नाहीं असें आनंदस्वरूपच आपण आहों असा त्याचा निश्चय होतो ॥ २५ ॥

हे माते, परब्रह्म जें म्हणतात तें केवळ ज्ञानस्वरूपी असून एकच आहे; पण पाहणारा, पाहण्याची वस्तु आणि दर्शनाची क्रिया अशा विविध भावनांमुळें तेंहि विविध आहे असें मानतात व कोणीं त्याला ब्रह्म, तर कोणी परमात्मा, तसेंच कोणी ईश्वर, तर कोणी पुरुष आणि कोणी भगवान्, अशा नांवानें त्याचें वर्णन करितात ॥ २६ ॥ खरें

म्हटलें तर, या जगांत भक्तियोग, हठयोग इत्यादि विविध योगांचें आचरण करणाऱ्या योग्याला उत्तम असें फळ प्राप्त करून घ्यावयाचें म्हणजे एवढेंच कीं, त्यांनीं विषयासक्ती-पासून आपली पूर्णपणें सुटका करून घेणें होय. ॥२७॥ [ संसार प्रत्यक्ष दिसत असल्यामुळें त्याची निवृत्ति कशी होईल असें म्हणण्याचें कारण नाहीं. ] कारण मनुष्याचीं इंद्रियें बहिर्मुख असल्यामुळें, केवळ ज्ञानस्वरूप आणि निर्गुण असें परब्रह्म तेवढें वास्तविक असतां, शब्द आदि करून विविधगुणांनीं युक्त अशा पदार्थांच्या रूपानें जें भासतें, तें केवळ भ्रमानें होय ॥२८॥ त्याप्रमाणें अहंकाररूपी महत्तत्त्व सत्त्वादि गुणांच्या योगानें तीन प्रकारचें, तसेंच पंचमूतांच्या दृष्टीनें पांच प्रकारचें आणि इंद्रियें व मन यांच्या योगानें अकरा प्रकारचें प्रत्ययास येतें; किंवा त्या अहंकारादिकांच्या योगानें स्वयंप्रकाश जीव, ब्रह्मांड व जग हीं भासमान होतात, त्याप्रमाणें ज्ञानस्वरूपी ब्रह्महि एक असतां शब्दादिकांच्या योगानें विविध भासतें ॥ २९ ॥ ज्यानें भक्ति, श्रद्धा, योगाभ्यास आणि वैराग्य यांच्या साहाय्यानें आपलें मन एकाग्र केलेलें असतें, त्या विरक्त पुरुषाला हें सर्व विश्व ब्रह्ममयच दिसतें ॥ ३० ॥ माते, याप्रमाणें ब्रह्मसाक्षात्कार करून देणारें हें ज्ञान मीं तुला सांगितलें. हें ज्ञान झालें म्हणजे प्रकृति आणि पुरुष यांचे वास्तविक स्वरूप जाणतां येतें ॥ ३१ ॥ माते, निर्गुण ब्रह्मविषयक केवळ ज्ञानयोग आणि माझ्यावरील निष्ठाच ज्यांत प्रमुख आहे असा भक्तियोग, या उभयतांचेंहि कार्य एकच असून तें म्हणजे भगवंताची प्राप्ति हेंच होय ॥ ३२ ॥ निरनिराळ्या इन्द्रि-यांचीं द्वारें निरनिराळीं असल्यामुळें ज्याप्रमाणें अनेक गुणांनीं युक्त असा एकच पदार्थ नाना प्रकारांनीं अनुभवास येतो, त्याप्रमाणें भगवान् वस्तुतः एकच असून अनेक शास्त्र-मार्गांमुळें त्याचें ज्ञान भिन्न भिन्न प्रकारें होत असतें ॥ ३३ ॥ विहिरी, तलाव इत्यादि लौकिक कृत्यें, यज्ञयागादि वैदिक कर्में, तशींच दानें, तपश्चर्या, वेदाध्ययन, मनोजय, इन्द्रिय-नियमन, कर्मांचा त्याग, अष्टाङ्गयोग, तसाच भक्तियोग; त्याप्रमाणें प्रवृत्ति आणि निवृत्ति हीं दोन लक्षणें असलेला धर्म, आत्मतत्त्वाचें ज्ञान आणि तीव्र वैराग्य, या साधनांनीं भग-वंताची सारखीच प्राप्ति होते. मग कोणी त्याला सगुण मानो वा कोणी निर्गुण मानो ॥ ३४ ॥ ३५ ॥ ३६ ॥ माते, याप्रमाणें चार प्रकारचा भक्तियोग आणि प्राण्यांच्या अंतर्यामीं नित्य धांवत असणारा, पण ज्यांची गति कळून मात्र येत नाहीं असा काळ, यांचें स्वरूप मीं तुला स्पष्ट करून सांगितलें ॥ ३७ ॥ तसेंच अज्ञानानें केलेल्या कर्मांमुळें जीवाला ज्या अनेक प्रकारच्या गति प्राप्त होतात त्याहि, हे माते, मीं तुला समजावून दिल्या. या गतीला जीव एकदां लागला म्हणजे त्याला स्वतःचें स्वरूप समजत नाहींसें होतें ॥ ३८ ॥ माते, हा जो भक्तियोग आहे तो दुष्टाला केव्हांहि सांगू नये. तसेंच जो कोणी उर्मट, गर्वानें मौन धरणारा, दुष्टाचरणी किंवा वरकरणी धर्माचें ढोंग करणारा असेल त्यालाहि तो सांगू नये ॥ ३९ ॥ घरदाराविषयीं अत्यंत आसक्ति ठेवणारा लोभी, माझी भक्ति न करणारा, तसाच माझ्या भक्तांचा द्वेष करणारा

जो कोणी असेल त्यालाहि हा भक्तियोग सांगू नये ॥ ४० ॥ पण माझ्यावर श्रद्धा ठेवणारा, नम्र, निर्मत्सरी, सर्वांशीं स्नेहानें वागणारा, गुरुजनादिकांची सेवा करण्यांत आनंद मानणारा, अंतर्बाह्य वैराग्यशील, शांत अंतःकरणाचा, कोणाचा हेवा न करणारा व शुद्ध मन असलेला असा जो कोणी माझा भक्त असेल आणि ज्याला मी सर्व प्रियवस्तूंमध्यें अत्यंम प्रिय वाटतो, त्याला हें तत्त्वज्ञान अवश्य सांगावें ॥ ४१ ॥ ४२ ॥ हे माते, जो पुरुष हें तत्त्वज्ञान श्रद्धापुरःसर एकवार तरी ऐकेल किंवा माझ्या ठिकाणीं मन ठेवून दुसऱ्याला तें सांगेल, तो माझ्या पदाला जाऊन पोंचेल यांत शंका नाहीं ॥ ४३ ॥

**बत्तिसावा अध्याय समाप्त**

---

# अध्याय ३३ वा



कर्दमऋषीची पत्नी व कपिलाची माता अशा त्या देवहूतीनें याप्रमाणें भाषण श्रवण केलें असतां तिचें अज्ञानरूप आवरण नाहींसें झालें आणि तत्त्वरूपी विषयानें युक्त असलेल्या सांख्यशास्त्राचा प्रवर्तक असा जो कपिलमहामुनि त्याला नमस्कार करून ती त्याची स्तुति करूं लागली ॥ १ ॥

देवहूति म्हणाली—हे भगवन् कपिलमुने, साक्षात् तुझ्या उदरापासून निघालेल्या कमलांत निर्माण झालेल्या ब्रह्मदेवाला सुद्धां उदकामध्यें शयन करणारें, महाभूतें, इंद्रियें, विषय आणि मन यांनीं व्यापिलेलें, सत्त्वादि गुणांच्या प्रवाहानें युक्त आणि सर्व विश्वाचें बीज अशा तुझ्या व्यक्तस्वरूपाचें मनानें ध्यानच करावें लागलें (तें त्याच्या डोळ्यांना कांहीं प्रथम दिसलें नाहीं ) ॥ २ ॥ परमेश्वरा, असा तो तूं आपल्या सत्त्वादि गुणांच्या प्रवाहाच्या योगानें आपल्या शक्तीचे विभाग करितोस. तूं वास्तविक कोणतीहि क्रिया करीत नाहींस; तुझा संकल्प कधींहि व्यर्थ जात नाहीं व तूंच सर्व जीवांचा नियामक आहेस. तुझ्या शक्ति अगणित असून, त्यांचा तर्क देखील कोणाला होणार नाहीं. या जगाची उत्पत्ति, स्थिति व लयहि तूंच त्याच्या साहाय्यानें करितोस ॥ ३ ॥ हे प्रभो, प्रलयकालीं हें सर्व जग तुझ्या उदरामध्यें राहिलें होतें आणि त्या वेळीं मायेच्या योगानें लहान बालकाचें रूप धारण करून तूं पायाचा आंगठा मुखांत घालून वटवृक्षाच्या पानावर शयन केलें होतेंस; असा जो तूं, त्या तुला मीं आपल्या उदरांत कसें बरें धारण केलें ? ॥ ४ ॥ हे प्रभो, शरीर धारण करण्यामध्यें तुझा उद्देश एवढाच असतो कीं, दुष्टांचा संहार करावा व आपली आज्ञा पाळणारांचा उत्कर्ष करावा. तूं पूर्वी वराह इत्यादि अवतार जसे धारण केलेस, त्याप्रमाणें हाहि अवतार लोकांना आत्मज्ञान करून देण्यासाठीं धारण केला आहेस ॥ ५ ॥ हे भगवन्, तुझ्या नामश्रवणानें, कीर्तनानें, तसेंच तुला नमस्कार करण्यानें, फार काय पण एखादे वेळीं तुझें केवळ स्मरण केल्यानें प्रत्यक्ष चांडाळाला देखील सोमयाग करणाऱ्याची योग्यता प्राप्त होते. मग तुझें प्रत्यक्ष दर्शन ज्याला खरोखर घडेल त्याची योग्यता काय सांगावी ? ॥ ६ ॥ अहो ! ज्याच्या जिव्हेच्या अग्रावर तुझें केवळ नांव वास करतें, असा मनुष्य चांडाळ असला तरी त्या तुझ्या नामाच्या योगानें थोर योग्यतेचा होतो; मग तुझें नाम ग्रहण करणारे, जे श्रेष्ठ आर्य, त्यांना तर खरोखर तपश्चर्या केली, अनेक होम केले, अनेक यज्ञ केले, अनेक अवभृथ स्नानें केलीं, वेदांचें यथासांग अध्ययन केलें व अध्यापन केले असें सर्व प्रकारचें श्रेय प्राप्त होतें ॥ ७ ॥ कपिलमुने, तूं श्रेष्ठ असून पुरुषरूपी साक्षात् परब्रह्म आहेस. अन्तःकरण अन्तर्मुख केलें म्हणजे त्यांत मनुष्याला तुझें ध्यान करितां येतें. तूं आपल्या ज्ञानरूपी तेजानें मायेच्या

गुणांचा ओघ नाहींसा केलेला आहेस. आपल्या उदरामध्यें वेद धारण करणारा विष्णु तूंच आहेस. तुला मी नमस्कार करितें ॥ ८ ॥

मैत्रेयमुनि म्हणाले,—विदुरा, याप्रमाणें देवहूतीनें सर्वश्रेष्ठ भगवान् कपिल-महामुनीची स्तुति केली असतां, तो सद्गदित होऊन गंभीर वाणीनें मातेला सांगूं लागला ॥ ९ ॥

कपिल महामुनि म्हणाले,—माते, मीं सांगितलेला योगमार्ग हा आचरण करण्यास फार चांगला आहे. ह्या मार्गानें तूं आचरण केलेंस तर तुला लवकरच श्रेष्ठ अशी जी जीवनमुक्तांची स्थिति ती प्राप्त होईल ॥ १० ॥ ब्रह्मज्ञानी पुरुषांनीं ज्याचा आदर केला आहे, असें हें माझें मत आहे. ह्यावर तूं श्रद्धा ठेव. ह्याच्याच योगानें संसारपाश तोड-णाऱ्या मला तूं प्राप्त होशील. ह्या माझ्या मताला जे जाणत नाहींत, ते या संसारांतच पडतात ॥ ११ ॥

मैत्रेयमुनि म्हणाले,–विदुरा, याप्रमाणें भगवान् कपिलमहामुनींनीं त्या महासाध्वी देवहूतीला आपलें आत्मविषयक ज्ञान सांगितल्यावर ब्रह्मज्ञानी झालेल्या आपल्या मातेचें अनुमोदन घेऊन ते आपल्या इच्छित प्रदेशीं निघून गेले ॥ १२ ॥ नंतर ती देवहूतिसुद्धां पुत्रानें सांगितलेल्या योगशास्त्राच्या विधीनें योगाभ्यास करून सरस्वती नदीचा पुष्पमुकुटच कीं काय अशा त्या आपल्या बिन्दुसरोवरावरील आश्रमांत स्वस्थ चित्तानें राहिली ॥१३॥ त्या ठिकाणीं नित्य त्रिकाळ स्नानमुळें तिचे कुरळे केंश पिंगट वर्णाचे आणि जटायुक्त होऊन गेले. उग्र तपश्चर्येच्या योगानें कृश झालेल्या आपल्या शरिरावर ती फाटकींच वस्त्रें धारण करीत असे ॥ १४ ॥ तिच्या गृहस्थाश्रमांतील अनुपम ऐश्वर्य, प्रजापति कर्दम-ऋषीनें आपल्या तपश्चर्येच्या व योगाभ्यासाच्या सामर्थ्यानें निर्मिलें होतें. विमानांत बसून विहार करणाऱ्या देवांना देखील, तें आपल्याला मिळावें असें वाटत होतें ॥१५॥ सोन्याच्या टोपणांचे हस्तिदंती पलंग, दुधाच्या फेसारखे शुभ्र असे त्यावरील बिछाने, सोन्याचीं आसनें व त्यांवरील मऊमऊ आस्तरणें अशी सामग्री तिच्या त्या गृहस्थाश्रमाची असून; उंची पाचूच्या शिलांनीं व स्फटिकांनीं बांधलेल्या त्या घराच्या भिंतींमध्यें रचिलेल्या सुन्दर पुतळ्यांच्या हांतांत दिलेले रत्नांचे दिवे शोभत होते ॥ १६ ॥१७ ॥ तिच्या घराजवळील उपवनांत पुष्पयुक्त असे अनेक कल्पवृक्ष होते. त्यांत पक्ष्यांची जोडपीं प्रेमळ शब्द करीत असत व मकरन्द प्राशन करून उन्मत्त झालेले भ्रमर गुंजारव करीत आणि त्यामुळें तें उपवन रमणीय झालें होतें ॥ १८ ॥ अशा त्या उपवनांत कमलांनीं सुवासित झालेल्या-एखाद्या पुष्करिणींत उतरून देवहूति कर्दममुनीबरोबर क्रीडा करीत असतां देवांचे सेवकहि तिच्या ऐश्वर्याची स्तुति करीत असत ॥ १९ ॥ तें तिचें ऐश्वर्य पाहून इंद्राच्या स्त्रियांना देखील, असें सुख आपल्याला मिळावें असें वाटत असे. असें तें सर्व सुख पुत्राच्या विरह-दुःखामुळें तिनें सोडून दिलें आणि म्लान वदन करून ती उदासवृत्तीनें तेथें राहूं लागली ॥ २० ॥ पति अरण्यांत निघून गेला आणि पुत्राचाहि वियोग झाला, त्यामुळें ती फारच

व्याकुळ झाली आणि तिला जरी तत्त्वज्ञान झालें होतें, तरी वासरूं नाहींसें झालें म्हणजे प्रेमळ गाईची जशी दीन स्थिति होते, त्याप्रमाणें तिची स्थिति होऊन गेली ॥ २१ ॥ वत्सा विदुरा, आपला पुत्र जो भगवान् कपिलरूपी श्रीहरी, त्याचा तिला निदिध्यास लागला व त्यामुळें सुखसंपत्तीनें भरलेल्या आपल्या घरावरील इच्छा तिनें सोडून दिली ॥ २२ ॥ आणि पुत्रानें उपदेश केल्याप्रमाणें प्रसन्नमुख अशा षड्गुणैश्वर्यसंपन्न परमेश्वराच्या समग्र स्वरूपाचें आणि मग प्रत्येक अवयवाचें असें आपल्या अंतःकरणांत ती ध्यान करीत राहिली ॥२३॥ अखंड भक्तीचा प्रवाह व कडकडीत वैराग्य आणि योग्य प्रकारच्या आचरणानें उत्पन्न झालेलें ब्रह्मप्राप्ति करून देणारें ज्ञान, हीं तिचीं साधनें होतीं ॥२४॥ त्या साधनांच्या साह्यानें तिचें अंतःकरण अत्यंत शुद्ध झालें आणि मायेच्या गुणांनीं रचिलेल्या देहादिकांचा भास आत्मसाक्षात्कारामुळें नष्ट होऊन ती सर्वव्यापी अशा आत्मस्वरूपाचें चिंतन करूं लागली ॥२५॥ सर्व जीवांचा आधार जो ब्रह्मस्वरूपी भगवान् त्याच्या ठिकाणीं तिनें आपली बुद्धि लाविल्यामुळें तिचा जीवभाव समूळ नष्ट झाला होता व तिचे सर्व क्लेशहि नाहींसे होऊन तिला आनंद प्राप्त झाला होता ॥ २६ ॥ तिची निरंतर समाधि लागत असल्यामुळें गुणांच्या योगानें उत्पन्न होणारा अहंममतारूपी भ्रम तिच्या ठिकाणीं मुळींच राहिला नाहीं. मनुष्य जागा झाला म्हणजे स्वप्नांत पाहिलेल्या गोष्टी जसा विसरून जातो, त्याप्रमाणें ती त्या वेळीं आपल्या देहाला विसरून गेली ॥ २७ ॥ तिच्या शरिराचें संरक्षण दुसऱ्यांकडूनच होत होतें * तरी रोगाचा तेथें संभवच नसल्यामुळें तें कृश झालेलें नव्हतें; पण त्यावर मलाचे थर बसल्यामुळें धुरानें व्याप्त झालेला अग्नि जसा शोभतो, त्याप्रमाणें तें शोभत होतें ॥ २८ ॥ तिची बुद्धि श्रीहरीच्या ठिकाणीं लागली, त्यामुळें तिचें शरीर तपश्चर्या व योग यांची मूर्तिच बनलें होतें. तिचे केंस मोकळे पडलेले असत व अंगावर वस्त्र मुळींच नव्हतें. सारांश, तिला आपल्या शरिराचें भानहि राहिलेलें नव्हतें ॥ २९ ॥ विदुरा, याप्रमाणें कपिलानें उपदेशिलेल्या मार्गानें आचरण करून त्या देवहूतीनें सर्वश्रेष्ठ, सर्वान्तर्यामी व नित्यमुक्त अशा भगवत्स्वरूपाची प्राप्ति अल्प काळांतच करून घेतली ॥ ३० ॥ हे वीरा विदुरा, ज्या ठिकाणीं तिला अशी सिद्धि प्राप्त झाली, तें पुण्यकारक क्षेत्र सिद्धपद ह्या नांवानें त्रैलोक्यांत प्रसिद्ध आहे॥२९॥ हे गंभीर स्वभावाच्या विदुरा, त्या देवहूतीनें योगाभ्यास करून आपल्या शरिरांतील सप्तधातुरूप मल नाहींसे केले आणि त्यामुळें त्या शरिराची सर्व नद्यांत श्रेष्ठ अशी एक नदी झाली. तिच्या तीराचें सेवन करून सिद्ध लोक सिद्धि प्राप्त करून घेतात ॥ ३२ ॥ तो महायोगी भगवान् कपिलमुनि देखील आपल्या मातेची अनुज्ञा घेऊन पित्याच्या आश्रमांतून निघाला व ईशान्य दिशेला गेला ॥ ३३ ॥ त्या वेळीं सिद्ध, चारण, गंधर्व, मुनि व अप्सरा यांनीं त्याची स्तुति केली व समुद्रानेंहि त्याची पूजा करून त्याला राहण्यासाठीं स्थान दिलें ॥ ३४ ॥ तेथें सांख्यशास्त्रवेत्ते त्याचा गौरव करीत असून तो तिन्ही लोकांच्या कल्याणासाठीं योगमार्गाचा आश्रय करीत एकाग्रचित्त होऊन राहिला

आहे ॥ ३५ ॥ हे निष्पाप विदुरा, तूं मला जें जें विचारिलेंस तें तें तुला मीं याप्रमाणें सांगून कपिल व देवहूति यांचा पवित्र संवादहि सांगितला ॥ ३६ ॥ हे कपिलमुनींनी सांगितलेलें आत्मज्ञानाचें रहस्यरूप शास्त्र जो श्रवण करितो, किंवा दुसऱ्याला सांगतो,त्याचें मन श्रीविष्णूवर जडून त्याला त्या श्रीहरीच्या चरणकमलाची प्राप्ति होते ॥ ३७ ॥

**तेहेतिसावा अध्याय समाप्त**

## तिसरा स्कंध समाप्त